

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत







## शिक्षण
## आणि
## समाजपरिवर्तन
## विशेषांक

जर दैवाचे काही फासे जरा वेगळे पडते
तर असतो मी उभा तिथे रे आज उभा तू जेथे.

**(There, but for better luck, goes myself.)**

सप्टेंबर - ऑक्टोबर - नोव्हेंबर - डिसेंबर २००३




अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

" शैक्षणिक पुनर्घटनेचे हे कार्यक्रम यशस्वी होण्यासाठी आपल्याला विकासाची नवी कार्यपद्धती अवलंबावी लागणार आहे. आतापर्यंत अनेक कारणांमुळे प्रगतीत अडथळे आलेले असले, तरी पैसा कमी पडला म्हणून प्रगतीला वेग आला नाही हे कारण तितकेसे खरे नाही, हे आपण विसरता कामा नये. केंद्रशासन, राज्यशासने, राजकीय नेते, शिक्षक, विद्यार्थी आणि जनता हा समाजातील प्रत्येक घटक कमीअधिक प्रमाणामध्ये या अपयशाला जबाबदार आहे. यापैकी प्रत्येक घटक दुसऱ्याला जबाबदार धरून स्वतः मोकळा होण्याचा प्रयत्न करीत असतो. परंतु त्यामुळे मूळ प्रश्न सुटत नाही. केवळ शिक्षणशास्त्रात सुधारणा करून ही समस्या सोडविता येणार नाही. शैक्षणिक विकासातील मुख्य अडथळे पुढीलप्रमाणे आहेत : १. औपचारिक शिक्षणपद्धतीच्या परंपरागत पद्धतीचे वर्चस्व; २. शैक्षणिक संरचनांची एकरूपता, गतिहीनता आणि साचेबंदपणा; ३. सूक्ष्म पातळीवरील शिक्षणकक्षांची उपेक्षा; ४. शासकीय यंत्रणेवर पूर्णपणे अवलंबन आणि लोकांच्या सहभागाचा अभाव; ५. आवश्यक कठोर निर्णय करण्यात राजकीय आणि शैक्षणिक नेतृत्वाला आलेले अपयश; ६. चुकीचे अग्रक्रम; आणि ७. आवश्यक अशा सामाजिक आणि राजकीय शक्ती विकसित करण्यातील अपयश. या सर्व प्रश्नांकडे पुरेसे लक्ष दिल्याशिवाय, कोणतीही लक्षणीय प्रगती होणार नाही.

शासकीय यंत्रणेवर अवलंबून राहणारा आणि निवडक नि मर्यादित प्रवेशावर भर देणारा जुना दृष्टिकोन टाकून देऊन, आपले प्रश्न अल्पावधीत सोडविण्यासाठी प्रचंड कार्यक्रम संघटित करणे आवश्यक आहे. लोकांच्या शिक्षणातील आपली योग्य भूमिका पार पाडण्यासाठी सरकारवर दडपण आणण्याकरिता जनआंदोलन उभारणे जरूरीचे आहे. शिक्षणपद्धतीत आणि त्या पद्धतीबाहेरही विराट सुधारणा मोहीम प्रवर्तित करायला हवी. त्याचप्रमाणे शिक्षणक्षेत्रातील कार्यकर्ते सहभागी होऊ शकतील असा नियोजनबद्ध नि सुसूत्र कार्यक्रम विकसित करणेही अगत्याचे आहे. समर्पित भावनेने सतत परिश्रम करायला उद्युक्त करणारे वातावरण निर्माण होण्यासाठी शिक्षणपद्धतीचा मूलभूत दृष्टिकोन बदलला पाहिजे. या सर्व कार्यक्रमात सर्वात खालच्या पातळीवरील कार्य सर्वात महत्त्वाचे आहे. लोकांमध्ये जी जागृती दिसून येत आहे तिचा पुरेपूर लाभ घेऊन जनशिक्षण आणि जनसंघटन साध्य करण्यासाठी असंख्य सेवाभावी कार्यकर्ते पुढे आले पाहिजेत. असे किती कार्यकर्ते आपण तयार करतो यावरच या कार्यक्रमाचे यश अवलंबून राहणार आहे. "

Education for Our People : A Policy Frame (१९७८-१९८७) या निवेदनातील हे शेवटचे परिच्छेद आहेत. त्या निवेदनाचा मूळ आराखडा जे.पी. नाईक यांनी केला होता. विचारशीलांच्या सुमारे २५० गटात त्याची चर्चा झाली होती. त्याला जयप्रकाश नारायण यांचा सविस्तर पुरस्कार आहे व भारतातील सुमारे चाळीस विविध क्षेत्रातील मान्यवर व्यक्तींच्या त्यावर सह्या आहेत.

**त्या निवेदनाशी मी तेव्हाही संपूर्ण सहमत होतो व आजही आहे.**

**त्यातील शेवटच्या पाच ओळी सतत अस्वस्थ करतात.**

**- देवदत्त दाभोलकर**

या निवेदनाचा मथितार्थ 'नवभारत'च्या जानेवारी २००३ च्या अंकात आलेला आहे. निवेदनाचा संपूर्ण अनुवाद 'भारतीय जनतेचे शिक्षण' या शीर्षकाखाली इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ एज्युकेशन, पुणे २९ या संस्थेने प्रसिद्ध केला आहे.

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५६ । अंक १२ । वर्ष ५७ । अंक १-२-३
सप्टेंबर-ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर २००३
भाद्रपद-अश्विन-कार्तिक-मार्गशीर्ष शके १९२५
वार्षिक वर्गणी २०० रुपये.
या अंकाची विशेष किंमत रु. ८०/-

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संपादक सहमत असतीलच, असे नाही.

## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल असा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
कार्यकारी संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री. ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).



अनुक्रमणिका






## अनुक्रमणिका

# अतिथी संपादकीय

एप्रिल ते डिसेंबर २००३ या काल-खंडातील विलंबित अंकांचे 'अतिथी संपादन' करण्यासाठी मी पुढे झालो आणि नंतर 'देवदूत जेथे पाऊल टाकायला कचरतात...' या उक्तीचा अनुभव आला. संपादक मंडळाच्या सदस्यांनी मी मागितले ते सर्व सहकार्य मला वेळोवेळी दिले आहे. परंतु सर्व उणिवा मात्र माझ्यामुळेच राहिल्या आहेत, हे मला नमूद केलेच पाहिजे. आता सप्टेंबर २००४ अखेर हे काम पूर्ण करीत आहे.

हा अंक जवळजवळ वर्षाच्या विलंबाने प्रसिद्ध होत असल्यामुळे कालविपर्यासाच्या खुणा आढळतील.

कोणालाही या अंकातील लेखांविषयी लेखकांशी प्रत्यक्ष चर्चा करावी असे वाटत असल्यास मला कळवावे. तशी रचना करता येईल. मुदत ३१ जानेवारी २००५ पर्यंत.

मुखपृष्ठाची संकल्पना माझी आहे. त्या मागची कल्पना हे मलाही तसे गूढच आहे. परंतु या संकल्पनेला आकार देण्याचे काम नितीन सोहनी यांनी केले आहे.

या विशेषांकाचे 'अतिथी संपादकीय' मुखपृष्ठावर सुरू होते व अंतिम पृष्ठावर संपते.

मुखपृष्ठावरील 'ग'ची बाधा झालेला मोठा 'ज्ञ' मीच आहे. कवितेच्या दोन ओळी या 'There, but for better luck goes myself' या एका इंग्रजी वचनाचा मी केलेला भावानुवाद आहे. आपण सर्वचजण ही भावना विसरतो. वरिष्ठ वर्णातील विवेकानंद, गांधीजी, विनोबा यांसारखे अपवाद वगळले तर आपण सर्वच जण विसरतो. दलितांतीलही आंबेडकरांसारखे अपवाद सोडले तर आता सुस्थितीत आलेले दलितही विसरतात. आपण आपल्या बुद्धिमत्तेने पुढे आलो असा प्रकट वा सूक्ष्म अहंकार आपल्याला असतो, परंतु मेंदूचा मूळ बुद्धिमत्तेचा कस ही आपली स्वतःची 'आपकमाई' नाही, 'वापकमाई' नाही, घराण्याचीही कमाई नाही, ती ईश्वरदत्त (वाटल्यास 'निसर्गदत्त' म्हणावे) देणगी, वरदान आहे हे आपण विसरतो. ज्यांना दुर्दैवाने ही देणगी मिळाली नाही त्यांच्यासाठी आपल्या ह्या क्षमतेचा विनियोग करणे ही खरी विश्वस्तवृत्ती आहे. ही कसोटी स्वतःला लावताना माझे मन कचरते. इतरांना लावण्याचा तर मला अधिकारच नाही. परंतु वस्तुस्थिती यामुळे व यामुळेच बदलत नाही.

अंतिम पृष्ठावर शैक्षणिक समस्यांवर या अंकावर आधारित एका कार्यक्रमाचा निर्देश आहे. त्याचे फलित त्याला मिळणाऱ्या प्रतिसादावर अवलंबून राहील. माझ्या दृष्टीने 'मानवी ऊर्जेचा शोध - शैक्षणिक क्षेत्रातील प्रयोगशीलता' या संकल्पनेचा तोही एक दिशादर्शक (किंवा 'ही दिशा नव्हे' असे दाखविणारा) एक प्रयोग आहे. त्याचाही परामर्श यथाकाल घेतला जाईलच.

इत्यलम्।

विभाग पहिला

# चिरंतन

**संगच्छध्वम् ।**

*एकसाथ चला.*

**संवदध्वम् ।**

*परस्परांशी सुसंवाद करा.*

**सं वो मनांसि जायताम् ।**

*तुमची मने सुसंवादी असोत.*

**यानि अस्माकं सुचरितानि तानि त्वया उपास्यानि । नो इतराणि ।**

*आमच्यातील जे चांगले असेल त्याचे अनुसरण करा.*
*इतर गोष्टींचे करू नका.*

अनुक्रमणिका

# आचार्य भागवत यांचे शैक्षणिक स्वप्न

## चित्रा नाईक

आचार्यांच्या प्रयाणाची वार्ता मला दि.९ जानेवारीस दौऱ्याहून परत आल्यावर समजली. बराच वेळ काही सुचले नाही. नंतर आठवण आली की, आचार्यांनी मराठी गीतांजलीची एक प्रत मला दिली होती. ती हुडकून काढली. १९५४ च्या जूनमध्ये मी साताऱ्यास असताना ती प्रत आचार्य घेऊन आले होते. इंग्रजी गीतांजली मी कॉलेजमध्ये शिकत असतानाच वाचली होती; पण बंगाली भाषा शिकून ती बंगालीतून वाचण्याची मला खूप हौस होती. आचार्य बंगालीतून एकेक कविता वाचून दाखवत आणि मराठी गीतांजलीवरून मी तिचा अर्थ समजावून घेई. शिकवताना आचार्य रंगून जात. रवीन्द्रांच्या काव्यातील लयबद्ध पंक्ती त्यांच्या वाणीतून ऐकताना मी इतकी भारावून जात असे की, मराठी भाषांतरावरचे माझे लक्ष उडून जाई आणि त्या बंगाली काव्याच्या स्रोतात मी जणू लुप्त होत असे. मृत्यूवर आचार्यांचे किती उत्कट प्रेम होते तेही त्यावेळी प्रत्ययाला आले. मृत्यूने त्यांची संगत त्यांच्या कारावासापासूनच धरलेली. एकदा जेव्हा ते 'जात्री आमी ओरे' वाचत होते तेव्हा शेवटच्या कडव्यातली त्यांची तन्मयता अद्याप माझ्या कानात घुमते आहे :

**"अरे, मी यात्रेकरू आहे**
**कोण्या दिवसाचे शेवटी**
**कुठल्या घरी मी पोचणार आहे कोण जाणे !**
**कोणता अनादिकाल आपल्या**
**स्निग्ध नेत्रांनी त्या ठिकाणी**
**माझी अपेक्षा करील कोण जाणे !"**

यात्रेकरू आचार्यांचा जुना रस्ता आता संपला. जीवनाची आनंदयात्रा संपली. आता जीवनाच्या सीमेपली-कडच्या चिरयात्रेचा नवा रस्ता! पण तीदेखील आनंदयात्राच. कारण आचार्यांच्या लेखी जीवन-मरणात काही विरोध नव्हता. मृत्यू हा जीवन-प्रवाहाचाच एक भाग. अनिवार्य आणि उपकारक भाग म्हणून जीवनावरचे प्रेम जितके उत्कट तितकेच मृत्यूवरही ते असावे, ह्या रवीन्द्रनाथांच्या तत्त्वाशी आचार्य एकरूप झाले होते. ही त्यांची वृत्ती त्यांना जशी जीवनानंदात मोकळेपणाने भाग घेण्याला उद्युक्त करत असे तशीच जीवनासक्तीपासून त्यांचा बचावही करत असे.

काही कारणांमुळे मी एकदा अस्वस्थ होते. अशा वेळी आचार्यांचे पत्र आले. ते मी अद्याप जतन करून ठेवले आहे. त्यांनी लिहिले होते - मी जीवनाचा एक निष्पाप उपासक आहे. जीवनाचा प्रवाह नेहमी पुढेच जात असतो यावर माझा दृढ विश्वास आहे. आपणदेखील जीवनाच्या पुढे जाण्याच्या शक्तीवर विश्वास ठेवावा; मागे पाहू नये. मागचे केव्हाच मागे पडून गेले आहे, असे मानावे!

हे सर्वकाही गेली अनेक वर्षे मनावर कोरले गेले आहे. आचार्य देह सोडून गेले खरे; परंतु त्यांची स्नेहपूर्ण वाणी अद्याप कानात घुमते आहे. आचार्यांच्या सहवासात जे कोणी आले त्यांच्या अंतःकरणात त्या वाणीचे ध्वनि-प्रतिध्वनी असेच अखंड होत राहणार. जीवन-मरणाच्या सीमा त्या ध्वनि-प्रतिध्वनीत अंधुक होत जाणार, आभासमय वाटणार. आचार्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या प्रभावाचे हेच वैशिष्ट्य. आचार्यांचा स्नेह उबदार हवेसारखा होता. तो सुखवीत असे, परंतु त्यात कोणी गुरफटून जात नसे. कोणी गुरफटू नये याविषयी तेही दक्ष असत.

आचार्यांचे जीवनविषयक तत्त्वज्ञान आणि शैक्षणिक तत्त्वज्ञान यात फरक नव्हता. भारतीय शिक्षण हे जीवन-विद्या असले पाहिजे, हे त्यांच्या शिक्षणविचाराचे प्रमुख सूत्र त्यांच्या भाषणातून व लेखनातून नेहमी स्पष्ट होत असे. प्रत्येक माणसाला समाधानी व समृद्ध जीवन प्राप्त करून देणे हे शिक्षणाचे साध्य आहे, आणि त्यासाठी माणसाचे शरीर, बुद्धी व हृदय यांत सुसंवाद साधला पाहिजे, हा दृष्टिकोण ते आवर्जून मांडत. जीवनाची भौतिक परिस्थिती बदलली तरी चांगले जीवन बनविण्यासाठी जी मूल्ये असावी लागतात ती सर्व काळी-सर्व स्थळी सारखीच असतात, हा त्यांचा सिद्धांत होता. व्यक्तिगत व सामाजिक समस्यांचा विचार कसा करावा हे समजाऊन सांगण्यासाठी आचार्य जसा तैत्तिरीय उपनिषदाचा आधार घेत तसाच दुसरीकडे जॉन ड्युईच्या तत्त्वज्ञानाचा असाच संदर्भ ते दाखवून देत. समाजजीवनाच्या स्थैर्यासाठी आणि प्रगतीसाठी आपले सगळे जीवन अर्पण

अनुक्रमणिका







करण्यात व्यक्तीला कृतार्थता वाटली पाहिजे, यावर आचार्यांचा भर असे. कारण व्यक्ती मर्त्य असली तरी समाज अमर आहे. तो सुरक्षित राहावा, पुरोगामी राहावा यासाठी प्रत्येक समाजघटकाने चिंतनशील राहिले पाहिजे. समाजाचा नैतिक व भौतिक विकास तत्परतेने केला पाहिजे ही त्यांची धारणा. सामाजिक विकासासाठी तत्पर असणाऱ्या व्यक्तींचाही आपोआप विकास होत असतो. त्या प्रक्रियेतूनच व्यक्तीला अतितृष्णेच्या आणि संकुचिततेच्या भिंती फोडून खऱ्या अर्थाने स्वतंत्र होता येते.

पाश्चात्त्य जीवनमूल्यांत आणि भारतीय जीवन मूल्यांत तत्त्वतः विरोध नाही, हे आचार्य नेहमी स्पष्ट करून सांगत. मौनी विद्यापीठासाठी मुद्रालेख शोधून काढण्याची जबाबदारी सर्वांनी त्यांच्यावर टाकली. पुष्कळ विचाराअंती त्यांनी 'शान्तोऽयमात्मा' हे वैदिक वचन निवडले, त्याचबरोबर 'ज्ञान, सेवा, त्याग' ह्या शांतीच्या साधनांचाही समावेश मुद्रालेखामध्ये करण्यात आला. आपल्याभोवती पसरलेल्या विशाल जीवनाविषयीची द्वैतभावना नाहीशी झाली की हृदयाला शांती मिळते, ही कल्पना मुद्रालेखामध्ये सामावलेली आहे, अशी मीमांसा आचार्य करत. अद्वैत ही प्राचीन महर्षींनी भारताला दिलेली सर्वश्रेष्ठ देणगी आहे, हे समजावून सांगताना ते म्हणतात, "अद्वैत म्हणजे जीवनाचे अद्वैत. आपल्याभोवती पसरलेले विशाल विश्वजीवन हे आपल्या जीवनाशी सर्व बाजूंनी जोडले आहे; आपला आणि त्याचा विरोधाचा वा वैराचा संबंध नाही; आपण विश्वाएवढे विशाल आहोत; आणि विश्व आपल्यातच भरून राहिले आहे ही अनुभूती म्हणजेच अद्वैताची अनुभूती होय." मांडूक्य उपनिषदात 'शांतम्, शिवम्, अद्वैतम्' असे आत्मस्वरूपाचे वर्णन आहे. व्यक्तिजीवन हे शांतीप्रधान, कल्याणस्वरूपी आणि सर्व प्रकारच्या द्वैतभावनेपासून मुक्त असले पाहिजे, असे विवेचन करून त्यांनी पुढे म्हटले आहे, "प्लेटोने सत्यम्, शिवम्, सुन्दरम् अशी जीवनाची तीन प्रमुख मूल्ये मानली आहेत; आणि त्यातही त्याने शिवम्ला सर्वोच्च स्थान दिलेले आहे. आजची पाश्चात्त्य संस्कृतीदेखील सामाजिक कल्याण हेच श्रेष्ठ मूल्य मानते. यामुळे पाश्चात्त्य विचारात सामाजिक मंगलाची उपासना करण्याची उत्कट प्रेरणा आढळते. भारतीयांच्या व पाश्चात्त्यांच्या जीवनमूल्यांत तत्त्वतः विरोध आहे असे दिसत नाही. सामाजिक कल्याण साधण्यासाठी शांतितत्त्वाची उपासना करण्याची आवश्यकता आहे हे पाश्चात्त्य विचारकांना आता स्पष्ट झाले आहे; आणि व्यक्तिजीवनात शांतीची प्रस्थापना होण्यासाठी देखील समाजकल्याणाची निर्मिती झाली पाहिजे हे भारतीय महापुरुषांना आधुनिक काळात अधिकाधिक मान्य होत चालले आहे."

व्यक्तिजीवनात तीन प्रकारचे संघर्ष येत असतात; ते नाहीसे झाले तर शांती लाभते. हे संघर्ष असतात बाह्य भौतिक विश्वाशी, समाजाशी, आणि स्वतःच्याच अंतःकरणातील विरोधी वृत्तीशी. ज्ञानसाधना - विशेषतः विज्ञानाची साधना मानवाला निसर्गाशी आनंदाचे, खेळीमेळीचे संबंध प्रस्थापित करण्याची संधी देते, व पहिल्या प्रकारचा संघर्ष नाहीसा करते; सामाजिक संघर्ष निर्माण होतो. आर्थिक विषमतेमधून आणि उच्चनीच भावनेतून स्पर्धा व प्रतिष्ठा सोडून देऊन प्रत्येक व्यक्ती सहकार व सेवाभावना मनात बाळगून निर्मितिप्रवण झाली तर भौतिक सुखसाधनांची विपुलता होईल, ती सर्वांना समप्रमाणात उपलब्ध होईल, आणि सामाजिक शांतीचा अनुभव मानवाला होईल. हृदयाला शुष्क वनवणारे वैराग्यतत्त्व, आणि भौतिक सुखविलासात मग्न होण्याचा मोह - या दोन्हींचा त्याग करून अनासक्त बुद्धीने जीवनातला आनंद ग्रहण करण्याची शक्ती मानवाला लाभली तरच त्याला मनःशांती मिळेल. म्हणून आचार्यांचे म्हणणे की, विज्ञानाची आराधना, समाजसेवा, आणि उत्पादनशीलता, वैयक्तिक जीवनात मध्य-मार्गाचा स्वीकार, ही जीवनप्रणाली शिक्षणाने घडवली पाहिजे, दृढ केली पाहिजे. शांतता अनुभवण्याचा हाच एकमेव मार्ग आज पाश्चात्त्य तत्त्वज्ञही मान्य करू लागले आहेत.

विद्यार्थी आणि शिक्षक यांनी शिक्षणाचा संबंध जीवनाच्या पुनर्घटनेशी जोडला पाहिजे, असा आचार्यांचा आग्रह. मुलांचे शिक्षण आणि प्रौढांचे शिक्षण यातील अंतर कमी कमी होत जाऊन, औपचारिक शालेय शिक्षण आणि समाजाच्या पुनर्निर्माणाच्या प्रक्रियेतून लाभणारे जीवनशिक्षण यांचे मीलन लवकरच होईल; – केवळ भारतातच नव्हे तर जगात इतरत्रही ते होईल अशी खात्री आचार्यांना वाटत होती. शाळेच्या चार भिंतीबाहेर संचार करण्याची मोकळीक शिक्षण प्रक्रियेला दिली तरच फलदायी शिक्षण सिद्ध होईल, या विचाराचे प्रतिपादन गांधीजींनी आणि विनोबांनी केलेले आहे. ते विशद करताना सामाजिक संवेदनशीलता, समभावना आणि भौतिक साधन-सोयींची विपुलता निर्माण करण्याच्या






गरजेवर आचार्यांचा भर असे. अशा विचारांचे पडसाद आता पाश्चात्य देशांत, विशेषतः अमेरिकेसारख्या संपत्तीचे अजीर्ण झालेल्या देशात जसे ऐकू येतात तसेच ते माओ-त्से-तुंगच्या गरीबीने गांजलेल्या चीनमध्येही प्रकर्षाने उमटताना दिसतात. ही नवी शिक्षणप्रणाली सांगते की, नाना प्रकारचे ज्ञान स्वावलंबनाने मिळविले पाहिजे; जीवनाला समृद्ध करण्याच्या जिद्दीतून ते मिळविले पाहिजे. व्यक्ती आणि समाज यांविषयीच्या अद्वैताच्या, समभावनेच्या तत्त्वाचा साक्षात्कार घडवणारे असे शिक्षण म्हणजे जीवन-शिक्षण, अशी आचार्यांची शिक्षणाची व्याख्या होती. गेल्या महिन्यात अमेरिकेतील एक बंडखोर शिक्षणतत्त्ववेत्ते गृहस्थ - ईव्हान इलिच - भारतात आले होते. त्यांचे विचार जाणून घेण्यासाठी पुण्याला समाज प्रबोधन संस्थेतर्फे आयोजित करण्यात आलेल्या एका चर्चा-सत्रात त्यांची व आचार्यांची भेट झाली. दोघांनी एकमेकांशी खूप विचारविनिमय करावा अशी संधी जरी त्या वेळी नव्हती तरी आचार्यांच्या विचारांचे जे अल्पसे दर्शन घडले त्याने ईव्हान इलिच खूप प्रभावित झाले. दिल्लीस परत गेल्यावर ते श्री.जे.पी. नाईकांना म्हणाले, "माझ्या मनावर गांधीजींच्या प्रभावळीतील त्या वृद्ध गृहस्थांची फार मोठी छाप पडली आहे. आम्ही एकमेकांशी फारसे बोलू शकलो नाही, परंतु जे थोडे संभाषण झाले, त्यात मला प्रत्यय आला की, औपचारिक शिक्षणाची व्यर्थता त्यांनाही माझ्याइतकीच जाणवते आहे. ग्रामीण शिक्षणावर चिंतन करणे हा आचार्यांचा आवडीचा छंद. ग्रामीण जनतेचे शिक्षण म्हणजेच भारतीय जीवनाच्या समस्या सोडवण्याचा राजमार्ग. लोकशाही जीवनपद्धती प्रत्यक्षात आणण्यासाठी ग्रामीण जीवनाची प्रथम पुनर्घटना झाली पाहिजे. आपल्या विकासाची इच्छा व त्यासाठी साहसपूर्ण कार्य करण्याची वृत्ती ग्रामीण जनतेत जागृत करणे हे ग्रामीण शिक्षणाचे उद्दिष्ट असले पाहिजे. ग्रामीण जीवनातील दैन्य आणि परंपराधीनता नाहीशी केल्यास शहरी जीवनाचेही प्रश्न आपोआप सुटू लागतील. ग्रामीण जीवनात सर्व प्रकारे अगतिकता निर्माण झाल्यामुळे शहरांकडे लोकसंख्येचा जो लोंढा वळतो तो शहरांना अवकळा आणतो. निर्मितीच्या अभावाने, अंधश्रद्धांच्या आणि रूढींच्या जाचणुकीमुळे, आणि भौतिक सोयींच्या उणीवेतून ग्रामीण जीवन अगतिक झाले आहे. म्हणून ग्रामीण शिक्षणाने विज्ञानप्रसार, भौतिक सुखसोयींची निर्मिती, अंधश्रद्धेपासून मुक्तता, आणि सामाजिक व आर्थिक विषमतेचे निराकरण ही उद्दिष्टे साध्य केली पाहिजेत. जातीय अहंकार आणि धर्माचा अभिनिवेश यांपासून ग्रामीण जनता मुक्त झाली आणि निर्मितीच्या जिद्दीतून आरोग्य व समृद्धी यांची प्राप्ती झाली की भारतीय जीवनविकासाच्या मार्गातील अडथळे नाहीसे होतील. विज्ञानाची व तत्त्वज्ञानाची उपासना करणारा, समतेच्या तत्त्वाची प्रतिष्ठा अबाधित राखणारा, कला-साहित्यात आणि निसर्गाच्या सहवासात जीवनानंदाचा अनुभव घेणारा भारत शिक्षणातून निर्माण व्हावा, एवढेच नव्हे तर आधुनिक जगाची वाटचाल या ज्ञानमार्गाने व्हावी, हे आचार्यांचे शैक्षणिक स्वप्न होते. विद्यासंपन्न व शीलवान युवकयुवतींचे आशावादित्वाने व कर्तृत्वाच्या उल्हासाने उमललेले जीवन म्हणजेच शिक्षणाची प्रभावीपणाची खूण, मानवी आनंदाचे ते खरे स्वरूप - हा आचार्यांचा आवडता विचार, मानवी आनंदात भौतिक आणि आत्मिक हे द्वैत शिरूच शकत नाही, हा त्यांचा आग्रह. ग्रामीण शिक्षणातील एका लेखात ते सांगतात, "सामाजिक जीवन भौतिक सुखसाधनांनी संपन्न झाल्याखेरीज उच्चतर आनंदाकडे त्याची वाटचाल होणं अशक्य आहे. भौतिक वस्तू भौतिक म्हणून तुच्छ लेखणे ही चुकीची अध्यात्मिकता समजली पाहिजे. भौतिक सुखाची साधना व्यक्तीपुरतीच मर्यादित राहिली म्हणजे मात्र नाना प्रकारच्या विकृती पैदा होऊ लागतात; पण भौतिक सुखसोयी समाजातील सर्व व्यक्तींना उपलब्ध करून दिल्या पाहिजेत, ही अध्यात्मिक प्रेरणा स्वीकारली म्हणजे कोणत्याही विकृती टिकू शकत नाहीत... भौतिक सुख-साधनांची विपुलतेने निर्मिती करण्यावर भारताला कित्येक वर्षे भर द्यावा लागणार आहे. या सुख-साधनांच्या निर्मितीनेच भारतीय समाजातील सर्व प्रकारची विषमता नाहीशी होण्यास मदत होणार आहे."

चारित्र्यनिर्मितीसाठी देखील आर्थिक विषमतेचा प्रश्न आधी सोडवला पाहिजे, या विनोबांच्या विचाराशी आचार्य पूर्णपणे सहमत होते. आर्थिक विषमता नाहीशी करून सुख-साधनांचा लाभ सर्व व्यक्तींना सम प्रमाणात उपलब्ध झाला तर समाज विकसित आणि पुरोगामी राहू शकेल, यावर आचार्यांचा गाढ विश्वास होता. जीवन व शिक्षण हे प्रवाह समन्वित करावेत आणि त्यातून 'मानुष आनंद' निर्माण व्हावा, यासाठी त्यांचा प्रयत्न अखंड चालू होता. त्यांच्या व्याधिजर्जर शरीराच्या तक्रारींना धिक्कारून ते या आनंदनिर्मितीच्या खटाटोपात रंगून जात. इतर कशाचीही नसली तरी या स्वप्नाची, या ध्येयाची काहीशी आसक्ती आचार्यांना होती; -

अनुक्रमणिका








तो आत्मसमर्पणाचा आनंद त्यांना हवासा वाटे.

एकदा साने गुरुजींच्याविषयी बोलताना ते म्हणाले होते : "त्यांची ध्येयनिष्ठा विलक्षण होती. रवीन्द्रनाथांनी एके ठिकाणी 'भग्न होऊन जाण्या'च्या आनंदाचे वर्णन केले आहे. तो 'भाँगे जावार आनंद' देखील सानेगुरुजींना पाहिजे होता." हे सांगताना आचार्यांच्या लक्षात आले नाही की, त्यांना स्वतःलादेखील हा आनंद नकळत आकर्षित करत होता. ध्येयसाधनेच्या प्रवाहात स्वतःला बिनदिक्कत झोकून देण्याचा हा आनंद 'भाँगे जावार आनंद'! पण असा ध्येयवेडेपणा जरी आचार्यांमध्ये कधीमधी उसळून येत असला तरी भावविव्हलतेत रमून जाणारी त्यांची प्रकृती नव्हती. ते तर्ककठोरच अधिक होते. त्यांच्या विचारांची आणि आचारांची बैठक प्रामुख्याने बुद्धिवादी होती. भोंगळपणाचा त्यांना तिटकारा वाटे. संवेदनशीलतादेखील तर्कसंगत असली, करुणेलादेखील प्रज्ञेची जोड मिळाली तरच खरे कर्तृत्व उदयास येते, हा त्यांचा सिद्धांत होता. भोंदूपणाची त्यांना घृणा होती. गांधीवादी मंडळींमध्ये गांधीजींचे तत्त्वज्ञान समजून त्याला मान देणाऱ्या ज्या हाताच्या बोटांवर मोजण्याइतक्या व्यक्ती आहेत, त्यापैकी आचार्य हे एक होते. कर्मकांडाचा ते तिरस्कार करत, आणि चरखा-लुंगीचे निर्बुद्ध स्तोम माजवणाऱ्या मेळाव्यापासून ते दूर राहत. परंतु त्यांची प्रज्ञा जितकी धारदार तितकीच त्यांची करुणा सर्वसमावेशक होती. लहान मुलांपासून तो वृद्धांपर्यंत, अशिक्षितांपासून तो उच्च शिक्षितांपर्यंत कोणीही व्यक्ती त्यांच्याकडे आपले दुःख हलके करण्यासाठी स्वाभाविकपणेच वळत असे. तासन्तास त्यांच्या करुणकहाण्या आचार्य मन लावून ऐकून घेत. समाधानाचे चार शब्द सांगत. कुणाचा दुःखावेग आवरला नाही तर त्याला जवळ घेऊन त्याची आसवे ते पुसत, पाठीवर मायेचा हात फिरवत आपल्या स्निग्ध स्नेहवाणीने त्याची समजूत काढून त्याला शांत करत हा देखील त्यांच्या जीवनसाधनेचा एक अविभाज्य भाग होता. त्यांच्या सान्निध्यात आलेल्या व्यक्तींना त्याचे विस्मरण होणे अशक्य आहे. सभेमध्ये जितक्या सहजतेने आचार्यांची वाणी तत्त्वज्ञानाची व साहित्याची प्रतिभावान मीमांसा करत असे, तितक्याच सहजतेने खेड्यापाड्यांतील बायाबापड्यांत जाऊन हरिजन-वाड्यातल्या दारादाराचा उंबरठा ओलांडून आचार्य दैनंदिन सुखदुःखाच्या गोष्टी सामान्यांच्या भाषेत बोलत. प्रज्ञेशी ते जितक्या सहजतेने एकरूप होत तितकेच कारुण्याशीदेखील. परंतु जीवनाच्या ओघात स्वतःला सर्वस्वी झोकून देऊनदेखील ते जीवनाचे चिकित्सक प्रेक्षकही बनू शकत. त्यांना कोणी दोष दिला, त्यांच्याविषयी कोणी द्वेषभावना, उपहासभावना दर्शवली तरी त्यांचे चित्त विचलित होत नसे. ज्यांनी त्यांच्यावर प्रहार करण्याचा प्रयत्न करून पाहिला त्यांच्या पाठीवरही आचार्यांनी मायेचा हात फिरवलेला आहे. त्या प्रहारकर्त्यांचे बुद्धिदौर्बल्य जाणून आचार्यांना त्यांच्याविषयी करुणा वाटे. त्यांची ते समजूत घालून त्यांच्यावर स्नेहाचा वर्षाव करून, त्यांच्या विरोधाचा मुकावला करू पाहत. रवीन्द्रांनी गायिलेल्या जीवनानंदाचा प्रत्यय आचार्य परिपूर्णतेने घेऊ पाहत. त्या आनंदामध्ये द्वेषाला, क्रौर्याला, आणि अज्ञानाला वाव नाही. त्यामध्ये कोणतेही भय नाही. लोकभय, राजभय, मृत्यूभय हे काही त्याला शिवत नाही. तो आनंद बुद्धिप्रधान आहे. करुणेने ओतप्रोत भरलेला आहे. आचार्यांचे जीवनतत्त्व आणि त्यांचे शैक्षणिक स्वप्न म्हणजे हा निर्भेळ विशालहृदय, मानुषी आनंद; ही अतीव शुद्ध मुक्ती.

◆◆◆

**एक आवश्यकता**

**किशोर मंडळाची स्थापना**

अखिल भारतीय बालरोग तज्ज्ञांच्या परिषदेने १ ऑगस्ट हा किशोर दिन (Adolescent Day) म्हणून साजरा करावयाचे ठरवले आहे. तसेच बारा ते एकोणीस या वयोगटातील समस्या सोडविण्यासाठी किशोर मंडळाची स्थापना व्हावी अशीही एक कल्पना उदयास आली आहे. महिलामंडळे, युवामंडळे याप्रमाणे किशोर मंडळे ग्रामीण भागापासून ते शहरापर्यंत कार्यरत असतील. या मंडळातून किशोरांना त्यांच्या अनेकविध समस्यांबाबत मार्गदर्शन करता येईल. ज्यांना अशा कार्यात रस असेल त्यांनी माझ्याशी संपर्क साधावा.

डॉ. चित्रा दाभोलकर

बालरोगतज्ज्ञ, सातारा

('किशोरावस्था' या आकाशवाणीच्या सातारा केंद्रावर दिलेल्या व्याख्यानमालेतील समारोपाच्या व्याख्यानातून.)

या कल्पनेत रस असणाऱ्यांनी प्रा. देवदत्त दाभोलकर यांच्याशी संपर्क साधावा.






# गांधीजींचा स्वावलंबी शिक्षणाचा विचार

रमेश पानसे

गांधीजींचे एकूण शिक्षणविषयक विचार हे अनेक प्रसंगी तुटकपणे मांडलेले असे आहेत. दक्षिण अफ्रिकेतल्या फिनिक्स आणि टॉलस्टाय आश्रमांतील मुलांच्या शिक्षणाची व्यवस्था करताना, गांधीजींचा शिक्षणाबाबतचा विचार सुरू झालेला दिसतो. शिक्षण स्वावलंबनाचा विचार तिथे कुठेच मांडलेला दिसत नाही. फक्त शरीरश्रमासाठी शेतीत, तसेच आपापली कामे आपण करणे असा क्रम टॉलस्टाय फार्मवर होता. शिक्षणाचा उद्देश हा केवळ पैसे कमावणे हा नाही तर चांगला मनुष्य बनणे, चारित्र्य घडविणे आणि देशसेवा करण्यासाठी उद्युक्त होणे असा मानलेला आहे. केवळ अक्षरज्ञान किंवा लिखापढीला शिक्षण मानून चालणार नाही, त्याची 'मूर्तीपूजा' करून चालणार नाही, असे गांधीजी, १९०९ सालच्या 'हिंद स्वराज्य' मध्ये म्हणतात. तेथेही ते नीती शिक्षणाला, इंद्रियसंयमाला शिक्षणात अग्रस्थान देतात. गांधीजी १९१५ साली कायमच्या वास्तव्यासाठी म्हणून भारतात आले तोवर तरी 'बुनियादी शिक्षणा'चा त्यांचा विचार जन्माला आलेला नव्हता असे दिसून येते.

भारतात आल्या आल्या, वर्षभरची देशयात्रा गांधीजींनी केली होती. देश सर्वांगाने जाणून घेण्याचा हेतू त्यामागे होता. देशाची परिस्थिती, देशाच्या एकूण गरजा या नेमकेपणाने लक्षात यायला या देशपरिक्रमेचा उपयोग त्यांना झाला. त्यानंतर शिक्षणाविषयी त्यांनी असे म्हटले आहे की, "भारतात सुमारे ८५ टक्के लोक शेती करतात तर आणखी १० टक्के लोक कारागिरीत गुंतलेले आहेत. या दहा टक्क्यांमधील अधिकतम लोक कापड उद्योगात आहेत... या ९५ टक्के लोकांना त्यांच्या धंद्याचे चांगले ज्ञान मिळण्याची आवश्यकता आहे; आणि हे जर खरे असेल तर शेती आणि विणकामाचे शिक्षण मुलांना शाळांतूनच मिळायला हवे..." यासाठी शाळांतून शेती आणि शाळा शेतांतून, मोकळ्या हवेत आणावी असे ते सुचवितात. (ऑक्टोबर १९१६)

यानंतर मात्र जो काही शिक्षणविषयक विचार त्यांचा मनात घर करून होता त्यात उद्योगाचे शिक्षण देण्याचा विचार प्रधान होता. बिहारमधील चंपारणमध्ये नव्याने उघडल्या गेलेल्या शाळांच्या संदर्भात बोलताना त्यांनी, 'प्रचलित शिक्षणाकडे मी संशयाने नि अविश्वासाने बघतो,' असे म्हटले आहे. एका मित्राला लिहिलेल्या आपल्या पत्रात गांधीजी लिहितात, "मी जी शाळा उघडत आहे त्यात... मुलांना सर्व प्रकारचे शिक्षण देण्याचा मानस आहे... गणित, इतिहास, भूगोल यांचे काही प्राथमिक सिद्धान्त व साधी वैज्ञानिक तत्त्वे त्यात समाविष्ट करणार आहे. त्याचबरोबर काही औद्योगिक शिक्षणही द्यायचे आहे... जी मुले आमच्याकडे येतील, त्यांना त्यांच्या निर्वाहाचे साधनही मिळावे यासाठी या उद्योग शिक्षणाचा समावेश करावयाची कल्पना आहे...! (१९.११.१९१७ चे जे.एल्. मेरीमेन यांना लिहिलेले पत्र.) देशाला आधारभूत असलेले असे जे व्यवसाय आहेत, त्यांचे सामान्यज्ञान सगळ्याच विद्यार्थ्यांना मिळाले पाहिजे; आणि या विचारानुसार आपल्या सर्वच विद्यार्थ्यांनी शेती आणि विणकाम शिकले पाहिजे, असे एका लेखात गांधीजी आवर्जून सांगतात. (संदर्भ - प्रचारक गुरूकुल अंक २४.३.१९१७) याचसुमारास (१७.९.१९२०) शांतिनिकेतनमध्ये विद्यार्थ्यां समोर दिलेल्या भाषणात, हृदय नि हात यांमध्ये संतुलन निर्माण करण्याची गोष्ट त्यांनी केली आणि परिश्रमांच्या सहाय्याने वास्तव जीवनाशी जोडून घ्यायचा उपदेश मुलांना केला. एवढेच नव्हे तर त्याचा प्रत्यक्ष प्रयोगही केला. *यंग इंडिया* मधील एका लेखात (११.८.१९२०) त्यांनी एक महत्त्वाचा विचार मांडला आहे. आजच्याही काळाच्या संदर्भात तो तितकाच महत्त्वाचा आहे. गांधीजी म्हणतात, "प्रत्येक गावाने आपल्या मुलांच्या शिक्षणाची सोय आपणच केली पाहिजे. सरकारकडून मिळणाऱ्या मदतीचा आश्रय घेता कामा नये." गावाने शिक्षणाबाबत स्वावलंबी होण्याचा असा उपदेश गांधीजींनी १९२० सालीच देऊन ठेवला आहे.

बुनियादी शिक्षणाचा पुढे जो विचार विकसित झाला आहे त्यात बुद्धी, श्रम आणि भावना (हृदय) यांच्या एकत्रित विकासाची कल्पना मांडलेली आहे. बेळगाव काँग्रेसच्या वेळी केलेल्या अध्यक्षीय भाषणात गांधीजींनी याचा ठळकपणे उच्चार केलेला आहे. सरकारी शिक्षणसंस्थांमधूनच आपल्या गुलामीच्या साखळीची पहिली कडी तयार होते, आणि राष्ट्रीय शिक्षणसंस्थांमधूनच आपल्या स्वातंत्र्याची






पहिली वहिली हत्यारे तयार होतात; म्हणून राष्ट्रीय शिक्षणसंस्थांनाच पुढे आणले पाहिजे आणि त्यातून राष्ट्रीय चारित्र्याची माणसे तयार केली पाहिजेत. यासाठी या शाळांमधून बुद्धी, शरीरश्रम नि हृदय यांचे शिक्षण दिले गेले पाहिजे, असे ठामपणे म्हटले आहे. (*नवजीवन* २६-१२-१९२४). या शाळांतून चरख्याचे संपूर्ण शास्त्र विकसित होईल, अशी आशाही गांधीजींनी व्यक्त केली आहे. पुढेही अनेक व्याख्यानांतून, त्यांनी, अक्षरज्ञानाबरोबर हृदय-बल आणि शरीरश्रम यांचा अंतर्भाव शिक्षणात करण्याचा उपदेश केला आहे.

उडिसामधील एक वकील व देशभक्त मधुसूदन दास यांनी कटक येथील, चर्मालयाच्या संदर्भात चर्चा करताना, अशी कल्पना मांडली की शिक्षणात व्यवसायाला (उदा. चर्मउद्योग) मध्यवर्ती स्थान देऊन त्यांच्या उत्पन्नातून शाळेचा खर्च काढावा. परंतु तसे उत्तेजन देणारे वातावरण नसल्यामुळे त्यावेळी ही कल्पना प्रत्यक्षात येऊ शकली नाही. (*नवजीवन* २३-९-२८) *नवजीवन*मधूनच शिक्षणविषयक काही प्रश्नोत्तरे, गांधीजी मांडत असत. त्यात एका प्रश्नाला उत्तर देताना गांधीजींनी स्पष्ट केले आहे की, उद्योग-व्यवसायाचे शिक्षण आणि बौद्धिक शिक्षण या दोन गोष्टींची फारकत ते करू इच्छित नाहीत. 'उद्योग-व्यवसायाच्या शिक्षणातच बौद्धिक विकास लपलेला आहे' असे प्रतिपादन ते करतात. एवढेच नाही तर एक पाऊल पुढे जाऊन ते असे म्हणतात की, 'थोडेसे धाष्ट्यनि मी असेही म्हणेन की, उद्योगाच्या शिक्षणाशिवाय बुद्धीचा खराखुरा विकास संभवतच नाही... जो शिक्षक विद्यार्थ्याच्या डोक्याची पेटी बनवून त्यात माहिती भरीत राहतो, त्याने स्वयंशिक्षणाचा अगदी पहिला धडाही आत्मसात केलेला नाही...' (*नवजीवन* २४-६-१९२८).

शिक्षणस्वावलंबनाचा विचार गांधीजींनी यानंतर सातत्याने पुढे नेलेला आहे. उदाहरणार्थ, *यंग इंडिया*मधील लेखात (१९-७-१९२८) यासंदर्भातील आपली भूमिका अत्यंत स्पष्टपणे मांडली आहे. त्यांच्या मते, "शिकू इच्छिणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याला नि विद्यार्थिनीला शिक्षण मिळायला हवे असेल तर, विद्यालयांना अगदी पूर्णतः जरी नाही तरी पुरेसे स्वावलंबी बनविले पाहिजे. या (सर्वांना शिक्षण देण्याच्या) उद्देशाची पूर्ती, सरकारी सहाय्य किंवा पालकांकडून फी या दोन्ही मार्गांनी होण्यासारखी नाही; तर केवळ विद्यार्थ्यांकडून काही (उत्पादक) काम करवून घेऊनच, ती होऊ शकेल." गांधीजी पुढे म्हणतात, "वाङ्मयीन शिक्षणाबरोबरच मुलांना व्यवसाय शिक्षणसुद्धा दिले पाहिजे, ही गोष्ट आज आवश्यक मानली जात आहेच. पण त्याशिवायसुद्धा, ही गोष्ट शिक्षण स्वावलंबी बनविण्यासाठी आवश्यक आहे." पुढे गांधीजी, अमेरिकेतील मुले कशी कमावून शिकतात याचा दाखला देउन म्हणतात की आपल्याकडे मुलांना फी माफीची भीक मागायला लावण्यापेक्षा, काम करून शिकणे हे कितीतरी चांगले आहे.

१९३५ सालचा इंडिया ॲक्ट, १ एप्रिल १९३७ पासून अंमलात आला. यानुसार अकरापैकी आठ प्रांतांमध्ये काँग्रेसची सरकारे स्थापन झाली. गांधीजींना ही एक पर्वणी होती. आपल्या सामाजिक व राजकीय विचारांना अनुसरून शिक्षणपद्धती ठरविण्याचा प्रयत्न नेमका यावेळी गांधीजींनी केला. (*वर्धा स्कीम*, के.एल्. श्रीमाळी, पृ. ७४) आपली शिक्षण-विषयक योजना त्यांनी, थोडक्यात, अशी मांडली :

१. आज प्रायमरी, मिडल् व हायस्कूल शिक्षण या नावे जी काही शिक्षणव्यवस्था चालू आहे, तिची उचलबांगडी करून, तिच्याजागी, सात किंवा अधिक वर्षे चालणारे प्राथमिक शिक्षण आणावे. ही व्यवस्था अशी असावी की जिच्यामध्ये मॅट्रिकपर्यंतचे, इंग्रजी सोडून, सर्व विषय येतील, पण त्याच-बरोबर एखादा व्यवसाय, शिक्षणाचे साधन म्हणून त्यात प्रविष्ट होईल, आणि मुला-मुलींच्या प्रज्ञेला सर्वच विषयांतून अवगाहन करता येईल.

२. अशाप्रकारचे हे शिक्षण सामान्यपणे स्वाश्रयी असेल. स्वाश्रयी असणे, हीच या शिक्षणाच्या अस्तित्वाची खूण असेल.

केवळ वाङ्मयीन शिक्षण नव्हे की केवळ व्यवसाय शिक्षण नव्हे, तर या दोन्हींची सांगड घालून मुलांचा शारीरिक, मानसिक, बौद्धिक नि अध्यात्मिक असा विकास साधण्याची कल्पना गांधीजींनी यावेळी मांडली होती. तसेच, शिक्षण स्वाश्रयी करण्याची कल्पना त्यांनी, शिक्षकांच्या वेतनखर्चाशी मर्यादित अशी मानली होती. जमीन, इमारत किंवा इतर भांडवली खर्च त्यात अभिप्रेत नव्हता.

गांधीजींनी ही योजना सार्वत्रिकरित्या अंमलात आणण्यापूर्वी त्याचा काही ठिकाणी प्रयोग करून पाहावा असे सुचविले; आणि तो यशस्वी झाला तरच तो सार्वत्रिक करावा असेही सांगितले. याच्या अधिक तपशीलवार मांडणीसाठी वर्धा येथे, २२ व २३ ऑक्टोबर १९३७ अशी दोन दिवस






'नॅशनल एज्युकेशन कॉन्फरन्स' भरविण्यात आली होती. त्यात बुनि-यादी शिक्षणाच्या संदर्भात संमत झालेला ठराव असा होता :

१. या अधिवेशनाचे असे मत आहे की, संपूर्ण राष्ट्र स्तरावर सात वर्षे (म्हणजे प्राथमिक) शिक्षण मोफत व सक्तीचे असावे;

२. मातृभाषा हेच शिक्षणाचे माध्यम असावे;

३. या संपूर्ण (सात वर्षांच्या) कालातील शिक्षण, हे काहीतरी उत्पादक श्रम करण्याच्या कार्याभोवती गुंफले जावे, आणि (विद्यार्थ्यांच्या) ज्या काही क्षमता विकसित करावयाच्या आहेत किंवा त्यांचे प्रशिक्षण व्हायचे आहे, ते शक्यतो, त्यांच्या परिसरातील एखाद्या उद्योगाशी जोडले जावे, असा जो विचार गांधीजींनी मांडला आहे, तो या सभेस मान्य आहे.

४. या पद्धतीच्या शिक्षणातून पुढे शिक्षकांचे वेतनही निघू शकेल अशी, ही सभा अपेक्षा करीत आहे.

पुढे १९३८ सालच्या हरिपुरा काँग्रेसमध्येही अशाच प्रकारचा ठराव संमत करण्यात आला. १९४५ च्या आवडी काँग्रेसमध्ये त्याच्यावर पुनश्च शिक्कामोर्तब करण्यात आले. या ठरावातील कलम ३ व ४ मधील विषय हा गांधीजींच्या शिक्षण स्वावलंबनाच्या संकल्पनेशी जोडलेला असा आहे. त्यात परस्परसंबंधित असे तीन मुद्दे येतात.

१) प्राथमिक, म्हणजे सहा ते चौदा या वयातील शिक्षण हे काहीतरी उत्पादक श्रम करण्याच्या कार्याभोवती गुंफले जावे;

२) हे जे 'काहीतरी' उत्पादक श्रम आहेत ते परिसरातील एखाद्या उद्योगाशी जोडले जावेत, आणि

३) हे श्रम असे 'उत्पादक' असावेत की त्यातून, शिक्षणखर्चातील महत्त्वाचा, म्हणजे मोठा अंश असलेला, असा जो चालू खर्च (Recurring cost) शिक्षकांच्या वेतनाचा खर्च आहे, तो तरी भरून निघावा. या तीन मुद्यांच्या सहाय्याने शिक्षणस्वावलंबनाची बुनियादी शिक्षण रचनेत आलेली भूमिका स्पष्ट करता येईल.

गांधीजींच्या शिक्षण विचारातील पहिले दोन मुद्दे तात्त्विकदृष्ट्या अधिक महत्त्वाचे आहेत. एक, उत्पादक श्रमाभोवती शिक्षण गुंफणे, आणि दोन, त्यासाठी, हे उत्पादक श्रम परिसरातील एखाद्या उद्योगाशी जोडणे हा तात्त्विक भाग एकूण शिक्षणाची पर्यायी रचना सांगणारा आहे.

**१. उत्पादक श्रमाभोवती शिक्षणाची रचना करणे.**

उत्पादक श्रमाभोवती शिक्षणाची रचना करण्याची जी संकल्पना गांधीजींनी मांडली आहे. तिचा व्यक्ती-स्वावलंबनाशी घनिष्ठ संबंध आहे. विद्यार्थ्यांनी, आपल्या मूलोद्योगाच्या उत्पादक कामांमधून उत्पन्न काढून आपला शिक्षणखर्च भागविण्याचा प्रयत्न केला तर पुढे आपल्या निर्वाहासाठी उत्पन्न मिळविण्यात त्यांना काहीच अडचण येणार नाही; असे गांधीजींनी म्हटले आहे. (हरिजन उद्योगशाला, दिल्ली येथील २७ जुलै ३९ चे भाषण) शिवाय असे विद्यार्थी आपल्या कुटुंबावर आपल्या शिक्षणाचा भार ठेवीत नाहीत. (वर्धा शिक्षण परिषदेतील भाषण दि. २३-१०-३७) आपली कामे आपण करण्याचा संस्कार तर विद्यार्थ्यावर व्हायलाच हवा आहे, पण यातूनच विद्यार्थी आपल्या घरच्यांनाही त्यांच्या कामांमध्ये मदत करतील, हाही एक फायदा होईल. (उनि. भाषण) या सगळ्यांमधून मुलांमध्ये एक आत्मविश्वास निर्माण होईल (उनि. भाषण). या साऱ्याचा आशय असा की, विद्यार्थ्यांचा स्वयंविकास होउन विद्यार्थी कुटुंबाला व समाजालाही उपयोगी ठरू शकेल. लहान मुलांना पाठ्य-पुस्तकांच्या सहाय्याने शिकविण्याची आवश्यकता नाही; कारण एक तर ते खर्चिक असल्यामुळे, खेड्यांतील असंख्य गरीब मुले या शिक्षणापासून वंचित राहतील; आणि दुसरे म्हणजे, मुलांना काही सामान्य ज्ञान मिळेपर्यंत त्यांना पुस्तकांकडे नेण्याची गरजही नाही, असे गांधीजी सुचवितात. (*यंग इंडिया* ३०-८-१९२६) निदान शाळेतील पहिले एक वर्ष तरी शिक्षण पुस्तकांशिवाय द्यावे असे त्यांचे मत होते. (*नवजीवन* १३-५-१९२८)

**२. परिसरातील उद्योग मध्यवर्ती करून, त्याकरवी शिक्षण घेणे/देणे.**

'नयी तालीम'चा वास्तव उद्देश सांगताना, गांधीजींनी म्हटले आहे की, कोणत्या ना कोणत्या मूलोद्योगाच्या सहाय्याने (शिक्षण घेत घेत) बालकाने आपला सर्वांगीण विकास साधला पाहिजे. (प्रा. ताओ यांच्या चर्चेत दि. २७-८-३८) आणि हे करण्याचे दोन मार्ग आहेत. एक अध्यापकांनी असा उद्योग शिकून घ्यावा किंवा असा उद्योग करणाराकडून अध्यापन करून घ्यावे.

मूलाद्योगाकरवी दिलेले शिक्षण हे सर्वोत्तम शिक्षण असेल, कारण, केवळ शिक्षणाच्या अंगाने पाहिले तरी, उद्योगालाच शिक्षणाचे माध्यम केले तर, विद्यार्थ्यांचा सहजपणे



अनुक्रमणिका

सर्वांगीण विकास होऊ शकतो; आणि विद्यार्थी स्वाश्रयी म्हणजे स्वावलंबीही होऊ शकतो. (१७-१०-३७)

शाळेतील वेळापैकी पाऊण हिस्सा विद्यार्थ्याने एखाद्या मूलोद्योगाच्या शिक्षणात व्यतीत करावा. (ही शिक्षणातील पहिली क्रांती होय!) आणि मग प्रचलित शिक्षणामधील वाचन, लेखन, वेळापत्रक, विषयवार शिक्षण आणि परीक्षा अशा बाबी दूर साराव्यात (ही दुसरी क्रांती होय!) असे गांधीजी सुचवितात. याचा अर्थ असा की, यामुळे शाळेचे अंतर्गत कार्य स्वरूपच बदलून जाते. एरवीची, म्हणजे प्रचलित व्यवस्था आता दुय्यमस्थानी जाते. किंवहुना तिची जागा घेणारी दुसरी व्यवस्थाही गांधीजी सुचवितात. ज्यामध्ये उदाहरणार्थ, शिक्षक विद्यार्थी एकत्र असतील, त्यामुळे आणि एकत्रच काम करीत असल्यामुळे, शिक्षकाकरवी होणारे विद्यार्थ्याचे शिक्षण अधिक वेगाने व प्रभावी पद्धतीने होईल. दुसरे असे की व्यवसायशिक्षणातून विद्यार्थी–समाज असा एक संबंध वळकटपणे बांधला जातो. जो एरवीच्या शिक्षणपद्धतीत दुर्लक्षिलेलाच आहे. विद्यार्थ्यांचा स्वतःच्या घराशी, घरातील आरोग्यपूर्ण व्यवस्थांशी आणि घरगुती व्यवसायांशीही असाच संबंध वांधला जातो; जो पुन्हा, प्रचलित शिक्षणपद्धतीत गृहित धरलेला नाही.

**३. उत्पादक कार्यातून शिक्षणाचा खर्च निघावा.**

यांपैकी तिसरा, म्हणजे शिक्षणातील वेतन खर्च, विद्यार्थ्याच्या उत्पादक कार्यातून निघावा अशा अपेक्षेचा जो मुद्दा आहे, त्याचा संदर्भ ब्रिटिशपूर्व कालातल्या, भारतातील, विशेषतः ग्रामीण भारतातील शिक्षणव्यवस्थेशी लागतो. ब्रिटिशांच्या आगमनापूर्वी भारतात 'ग्रामस्वराज्य' अस्तित्वात होते. तेथे शिक्षणाची काही एक व्यवस्था होती; शिक्षक हा ग्रामसमाजाचा एक अविभाज्य घटक मानला जात असे; आणि त्याला एखादा जमिनीचा तुकडा किंवा वार्षिक धान्याचा साठा 'फी' म्हणून प्राप्त होत असे. विशेषतः शिक्षकांचे 'वेतन' हाच शिक्षणाचा मुख्य खर्च असे (भांडवली खर्च फारसा उद्भवत नसे.) त्यामुळे, हा खर्च भरून निघत असेल तर शिक्षणव्यवस्था (संस्था) स्वावलंबी होऊ शकेल, असा याचा अर्थ होतो. *यंग इंडिया*मधील एका लेखात, फार पूर्वीच (२-२-१९२१) गांधीजींनी म्हणून ठेवले होते की, "जर प्रत्येक विद्यालयात सूतकताईला स्थान दिले तर यातून शिक्षणाच्या आर्थिक प्रश्नाविषयी, विचारात एक क्रांतीच घडू शकेल. सहा तास शाळा चालवून मुलांना मोफत शिक्षण देऊ शकू." अर्थात् 'नयी तालीम' सुरूवातीपासूनच या अर्थाने 'स्वावलंवी' असेल असे नाही. परंतु, गांधीजींच्या म्हणण्यानुसार पूर्ण सात वर्षाच्या शिक्षणाच्या 'जमा–खर्चाचा मेळ मात्र बसला पाहिजे. (पुणे येथील २९-७-४६ चे भाषण) या प्रकारच्या शिक्षण-स्वावलंवनामागची एक भूमिका, गांधीजींनी, अनेक वेळा विशद केली आहे. ती अशी की जर विद्यार्थ्याच्या कामांतून शिक्षणाचा खर्च निघणार नसेल तर देशातील सर्वांना शिक्षण देण्याची व्यवस्थाच करता येणार नाही. सरकार हा पैसा पुरवू शकणार नाही. (उदा. वर्धा येथील भाषण ३०-१-३७)

या योजनेत असलेले शिक्षण एखाद्या मूलोद्योगाशी जोडण्याची वाव आणि त्यातून, काही उत्पन्न निघण्याची वाव या दोन गोष्टी परस्परसंवंधित अशा आहेत. मूलोद्योगाचे, व्यवसायाचे शिक्षण, त्यातील कुशलता आत्मसात करणे, त्यातून व्यक्तीच्या कायमस्वरूपी उदरनिर्वाहाच्या दिशेने जाता येणे आणि व्यक्तीविकास साधणे या सर्वच गोष्टी घडून यायच्या असतील तर केले जाणारे काम अत्यंत कुशलतेने, कार्यक्षमतेने नि शास्त्रीयतेने होण्याची गरज आहे. आणि असे होण्याची शाश्वती, उत्पन्ननिर्मितीची अट असण्यातून मिळते. श्रमकार्य नि उत्पन्ननिर्मिती या दोन गोष्टींची फारकत केली; म्हणजेच उत्पन्नाची नजर ठेवली नाही, तर होणारे काम कुशलतेने, नि कार्यक्षमतेने होईलच याची खात्री नाही. शिक्षकांवरही त्याची जवावदारी राहणार नाही. शिक्षक कामाचे कलम फक्त पुरे करतील, पण उत्पादकतेची जवावदारी टाळतील, याची शक्यता आहे. शिवाय झालेल्या कामाची मोजदाद होणेही गरजेचे आहे. आणि ते उत्पादनाच्या नि त्यातून निर्माण होणाऱ्या उत्पन्नाच्या स्वरूपातच मोजता येणार आहे.

म्हणजे, एका अर्थी, उत्पादनकार्याचाच नव्हे, तर त्याच्याभोवती आखलेल्या शिक्षणाचा दर्जाही, श्रमकार्य नि उत्पन्ननिर्मिती यांची जी सांगड येथे घातली आहे, त्यावर अवलंवून आहे. आणखी एक गोष्ट अशी की, शिक्षणाच्या कार्यातून असे अंतर्गत उत्पन्न निर्माण झाले नाही तर, एकूण शिक्षणकार्यात होणारा व्यय आवाक्यात ठेवता येणार नाही. तसेच, एकूण शिक्षणखर्च वाढून देशाला हा शिक्षणखर्च परवडणार नाही. आणि अखेरीस, शिक्षणाच्या केंद्रस्थानी असलेली ही व्यवसाय–उद्योगाची वावच यामुळे काढून टाकली जाईल.

'शिवाय असे की, जे श्रमकार्य व्हायचे त्याला आर्थिक मूल्यच नसेल तर ते जीवनातील वास्तवापासूनच तोडले जाईल. कारण, मग व्यवसायशिक्षण हे एक नुसते शिक्षणाचे साधन ठरेल आणि साधन म्हणून मग ते

अयशस्वीच ठरण्याची शक्यता आहे. गांधीजींच्या या योजनेत हस्त कौशल्याचे काम हे केवळ साधन नाही तर ते साध्यही आहे. आणि तसे ते मानले गेले नाही तर त्याचे आर्थिक मूल्य नि कार्यक्षमताच नव्हे तर त्याचे मूलभूत महत्त्वच नाहीसे होईल.' (कृपलानी पृ. ५५)

याउलट, व्यवसायाकरवी जे शिक्षण द्यायचे तेही केवळ अंतिम साध्य नाही तर ते एक साधनही आहे. उत्तम तऱ्हेने उत्पादक कार्याचे कसब अंगी यायला हवे असेल तर त्याला बौद्धिक कामाची जोड अपरिहार्य आहे. तार्किक विचारशक्ती नि नियोजन यांच्यामुळे काम करणाराची कार्यक्षमता वाढते आणि मग त्या कामाचे आर्थिक मूल्यही वाढते; ही बाबच अखेरीस निर्वाहक्षमता वाढविणारी नि जीवन स्वावलंबनाकडे नेणारी अशी असणार आहे. गांधीजींच्या विचारातील हा धागा लक्षात घ्यायला हवा.

**गांधीजींच्या बुनियादी शिक्षणपद्धतीने दिलेले नेमके योगदान कोणते आहे?**

शिक्षणातील सुधारणेच्या नि विशेषतः स्वावलंबी शिक्षणाच्या दिशेने जाण्यासाठी उपयुक्त ठरतील असे काही विशेष गांधीजींच्या बुनियादी शिक्षणपद्धतीत आहेत. ते पुढीलप्रमाणे सांगता येतील.

- शिक्षणव्यवस्थेत श्रमकार्याला केंद्रीभूत करून आजवरच्या केवळ 'बौद्धिक' शिक्षणाला, ते जीवना-पासून दूर जाणारे शिक्षण म्हणून धक्का दिला आहे.
- शिक्षण जीवनाभिमुख करत असतानाच, विद्यार्थी-शिक्षक, विद्यार्थी-समाज असे वास्तव संबंध दृढ करण्याचा प्रयत्न केला आहे.
- श्रमकार्याला प्रतिष्ठा देऊन, कार्यक्षम श्रम कार्यासाठी, त्याला बौद्धिकतेची जोड देण्याचे महत्त्वही दाखवून दिले आहे.
- शिक्षणात श्रमकार्य आणून, सामाजिक रचनात्मक कार्याशी विद्यार्थ्यांना जोडण्याचा प्रयत्न केला आहे.
- शिक्षण घेणाऱ्याने आपल्या शिक्षणाच्या खर्चाचा भार उचलून शिक्षणस्वावलंबन साध्य करावे असा धडा दिला आहे. श्रमकार्याचे एक विशेष शैक्षणिक महत्त्व येथे विशद केले आहे. श्रमकार्यातून, विद्यार्थ्यांचा एकाच वेळी शारीरिक, बौद्धिक, कलात्मक, शास्त्रविषयक आणि सामाजिक विकास होऊ शकतो, याचे दर्शन घडविले आहे.

मुख्य म्हणजे, प्रचलित शिक्षणात असलेली, वाचनलेखन -स्मृती या अमूर्त पातळीवरून कार्य करणाऱ्या, अप्रत्यक्ष अशा शिक्षणमाध्यमाच्या जागी, वेगळी अशी शिक्षणाची प्रत्यक्ष, कृतिशील आणि रचनात्मक पद्धती दिलेली आहे. शिक्षणाचे माध्यमच बदललेले आहे. या पद्धतीत विद्यार्थी (उत्पादक श्रम) 'करून' कौशल्य शिकणार तर आहेतच; पण, त्याचबरोबर ते स्वतःच आपल्या ज्ञानाची निर्मितीही करणार आहेत. शिक्षण स्वावलंबनाचे हे परिमाण आजच्या मानसशास्त्रीय आणि शैक्षणिक तत्वांशी सर्वार्थाने मिळते-जुळते आहे; ही गोष्ट महत्त्वाची आहे.

**रचनात्मक कार्याशी जोड**

महात्मा गांधींच्या बुनियादी शिक्षण योजनेच्या मागची भूमिका दुहेरी होती. एक म्हणजे, प्रत्येक मुला-मुलीला प्राथमिक शिक्षण मिळावे, ते मिळेल अशी तजवीज व्हावी; दुसरे म्हणजे, ब्रिटिश शिक्षणव्यवस्थेला नाकारून या देशाच्या प्रश्नांशी आणि वातावरणाशी सुसंगत अशी शिक्षणाची पुनर्रचना व्हावी.

या देशाचे प्रश्न हे प्रामुख्याने खेड्यांचे प्रश्न आहेत, खेड्यांमधील गरिबीचे नि गरिबांचे प्रश्न आहेत. ब्रिटिशांच्या आगमनानंतर येथील खेड्यांची स्वयंपूर्ण अर्थव्यवस्था ढासळून, येथील कारागिरी-हुन्नराची व्यवस्था पूर्णतः विस्कळीत झाली आहे. हे चित्र डोळ्यासमोर ठेवून गांधीजींनी ग्रामीण पुनर्रचनेचा कार्यक्रम लोकांपुढे ठेवला. गांधीजींनी म्हटले आहे, "माझ्या दृष्टीने भारताची, किंवा संपूर्ण जगाचीच, आर्थिक व्यवस्था अशी असावी की कोणालाही अन्न-वस्त्राची ददात पडू नये. दुसऱ्या शब्दांत, प्रत्येकाला किमान पातळीवर जगता येण्यासाठी पुरेसे काम मिळावे. जीवनावश्यक वस्तूंच्या उत्पादनाची साधने लोकांच्या नियंत्रणात असतील तरच हा आदर्श प्रत्यक्षात येऊ शकेल." (गांधी - विनोबा, *स्वदेशी; अर्थ आणि आशय* पृ -२०).

गांधीजी, पुनश्च एकदा, स्वयंपूर्ण खेड्यांच्या दिशेने जाऊ इच्छितात. आणि त्यासाठी खेड्यांच्याच पुनर्रचनेचा विचार अग्रस्थानी आणतात. त्यासाठी लोकांना 'रचनात्मक कार्यक्रम' देतात.

ग्रामीण उद्योग-व्यवसायांची पुनर्रचना करणे नि त्याकरवी एकूण ग्रामीण सामाजिक-आर्थिक आणि अगदी

नैतिक जीवनही बदलून टाकणे हा रचनात्मक कार्यक्रमाचा हेतू आहे. शिक्षणाच्या पुनर्रचनेचा घाट हा असा ग्रामीण परिवर्तनाच्या, त्यातील स्वयंपूर्णतेच्या नि स्वावलंबी जीवनाच्या उद्दिष्टांशी जोडलेला आहे. किंबहुना, रचनात्मक कार्यक्रमाचा, बेसिक शिक्षण हा एक अंतर्गतच भाग मानलेला आहे. याचबरोबर प्रौढशिक्षण, स्त्रियांची उन्नती, आरोग्य शिक्षण आणि युवकांच्या शिक्षणात एक वर्षाचे रचनात्मक कार्य, अशा इतरही शिक्षणविषयक कार्यक्रमांचा अंतर्भाव त्यात आहे.

तात्त्विकदृष्ट्या, बुनियादी शिक्षण आणि संपूर्ण रचनात्मक कार्यक्रमावर, गांधीजींनी, सरकारी परावलंबनातून (मग ते विदेशी असो वा देशी) बाहेर पडून स्वावलंबी समाज उभारणीची जबाबदारी टाकलेली दिसते; स्वराज्यनिर्मितीची जबाबदारी टाकलेली दिसते. कारण, गांधीजींच्या मते, स्वराज्य मिळवायचे आहे ते (सरकारी) अधिकार मर्यादित करून त्यावर समाजाने नियंत्रण प्रस्थापित करून, आणि त्यासाठी सुसंगत असे समाजशिक्षण करूनच. गांधीजींनी म्हटले आहे की, आपण सत्य नि अहिंसा यांच्याद्वारे स्वराज्य मिळवू पाहत असू तर, खालपासून वरपर्यंत अशी समाजबांधणी आपण रचनात्मक कार्यक्रमाकरवी करायला हवी. (*हरिजन* १८-६-१९४२) अशाप्रकारे देशाचा आर्थिक व सामाजिक विकास, ग्रामीण उत्थापन, त्यासाठीचा रचनात्मक कार्यक्रम आणि शैक्षणिक पुनर्रचना याचा मेळ घालण्याचा हा प्रयत्न आहे, आणि त्यासाठी माणूस उभा करण्याचा हा प्रयत्न आहे.

**ताजा कलम - १**

ज्युलिअस न्येरेरे हे टांझानियाचे १९६२ साली राष्ट्राध्यक्ष झाले. त्यांनी हाती सत्ता घेतली त्यावेळी टांझानियाची अर्थव्यवस्था अत्यंत अडचणीत होती; त्यामुळे न्येरेरे यांच्यापुढे मोठी आव्हाने होती. विशेषतः एकीकडे समाजवादाचे तत्त्व आणि दुसरीकडे मागास नि परंपरावादी असा अफ्रिकन समाज यांचा मेळ घालण्याचे काम त्यांना करावयाचे होते. अशावेळी त्यांनी, गांधीजींच्या बुनियादी शिक्षणाचा संदर्भ घेऊन, 'स्वाश्रयी शिक्षणा'चा विचार आणि प्रयोग हाती घेतला. त्यांच्यामते, समाजहित, सहकारीभावना वृद्धिंगत करणे आणि समतेच्या दिशेने जाणे, आणि त्याचवेळी टांझानियातील वास्तवता विचारात घेणे आवश्यक होते. त्यासाठी त्यांनी शिक्षणपुनर्रचनेची कास धरली, आणि पुढील बदल करावयाचे ठरवले.

१. शिक्षणाचे सुकाणू ग्रामीण जीवनाकडे वळवणे.

२. शिक्षक व विद्यार्थी यांनी एकत्रितपणे उत्पादक कार्यात सहभागी होणे; तसेच त्याच्या नियोजनात नि निर्णयप्रक्रियेत विद्यार्थ्यांनी सहभागी होणे;

३. उत्पादक काम हा शिक्षणाचा अंतर्गत आणि अभ्यासक्रमाचा भाग बनविणे, तसेच विद्यार्थ्यांना सिद्धांत नि व्यवहार यांचा मेळ घालण्याचा जिवंत अनुभव देणे;

४. परीक्षांचे महत्त्व कमी करणे;

५. विद्यार्थी सातव्या वर्षी शाळेत प्रवेश करतील आणि ते जेव्हा शाळा सोडतील तेव्हा उत्पादक कार्यात वाकबगार आणि स्वावलंबी होण्याइतपत तयार झालेले असतील.

६. प्राथमिक शिक्षण हे, पुढील माध्यमिक शिक्षणाची केवळ तयारी करण्यासाठी नसेल तर ते स्वयंपूर्ण शिक्षण असेल.

७. विद्यार्थी हे आत्मविश्वास आणि सहकाराचे मूल्य प्राप्त करतील तसेच चिकित्सक बुद्धीही प्राप्त करतील.

या सुधारणा करताना शिक्षणाचे मानलेले उद्दिट होते, ते म्हणजे अज्ञान नि परावलंबन यांच्या दास्यातून व्यक्तीची मुक्तता करणे. जे शिक्षण गुलामी वृत्ती निर्माण करते किंवा अनिर्मितीक्षम ठेवते ते शिक्षणच नव्हे, अशी भूमिका या सुधारणांच्या मागे स्वीकारलेली होती.

**ताजा कलम - २**

दि. २३.७.१९९९ च्या 'हिंदुस्तान टाइम्स' मध्ये प्रसिद्ध झालेली वातमी अशी :

टॉलस्टाय आश्रमाच्या नि गांधीजींच्या बुनियादी शिक्षणाच्या धर्तीवर १९३९ साली स्वतः गांधीजींनी उभ्या केलेल्या बिहारमधल्या पश्चिम चंपारण जिल्ह्यातील पस्तीस शाळा बंद पडण्याच्या मार्गावर आहेत; आणि राज्यसरकार याबाबत उदासीन आहे.

♦♦♦

'I want the winds of all lands to blow freely around my house; but I refuse to be blown off my feet by any.'

\- Gandhiji








# विनोबांचा शिक्षणस्वावलंबनाचा विस्तारित विचार

रमेश पानसे

विनोबांनी शिक्षण स्वावलंबनाचा विचार गांधीजींपेक्षा अधिक सविस्तरपणे केला आहे. ते म्हणतात, "...स्वावलंबनाचे तीन अर्थ आहेत - आपल्या उदरनिर्वाहासाठी इतरांवर आधार ठेवण्याची गरज असू नये, हा पहिला अर्थ. दुसरा अर्थ आहे, ज्ञान प्राप्त करण्याची स्वतंत्र शक्ती जागृत असणे आणि तिसरा अर्थ आहे, मनुष्यात स्वतःला काबूत ठेवण्याची, इंद्रिये व मनाला वश करण्याची शक्ती असणे." या तीन अर्थांचे वर्णन, अनुक्रमे, निर्वाहशक्ती, विचारशक्ती व विवेकशक्ती असे आपल्याला करता येईल. स्वावलंबनाच्या विनोबांनी सांगितलेल्या या तीन 'अर्थां'ना तीन 'शक्ती' संबोधण्याचे कारण स्पष्ट केले पाहिजे.

आपण जेव्हा शिक्षणाच्या संदर्भात स्वावलंबनाचा विचार करतो तेव्हा, ज्यातून मनुष्य अंतिमतः स्वावलंबी होईल अशा शक्ती त्याने आत्मसात करण्याविषयी बोलत असतो. माणसाच्या मेंदूच्या क्षमता म्हणजे माणसाच्या नैसर्गिक क्षमता अशा असतात की, ठरविलेल्या दिशेने, त्याला त्यांचा विकास करता येतो. आणि विकास झाल्याची स्थिती, त्याला प्राप्त झालेली 'शक्ती' या भाषेत आपल्याला सांगता येते.

विद्यार्थ्याला त्याच्या शिक्षणकाळात, निर्वाहशक्ती, विचारशक्ती व विवेकशक्ती अशा तीन शक्तींची बेगमी करणे, म्हणजे शिक्षणस्वावलंबन होय, अशी शिक्षणस्वावलंबनाची व्याख्या आपण करू शकतो. शिक्षणाचा अंतिम उद्देश, केवळ निर्वाहशक्ती, म्हणजे कुठला तरी रोजगार करण्याची क्षमता विकसित करणे असा असत नाही; त्याच्याच बरोबरीने विचारशक्ती नि विवेकशक्तीचे विकसन तितकेच महत्त्वाचे आहे.

### निर्वाहशक्ती

निर्वाहशक्ती असा जर शिक्षणस्वावलंबनाचा एक अर्थ घेतला तर तो दोन्ही अंगांनी आपल्या विवेचनात यावा लागतो. एक शिक्षणाचा अंतिम उद्देश म्हणून आणि दोन शिकण्याच्या प्रक्रियेतील एक अविभाज्य घटक म्हणून. या दोन्ही दिशांनी साध्यापर्यंत पोचायचे तर शिक्षणाचा गाभाच मुळी, काही तरी उद्योग करण्याचा असा असायला हवा. म्हणजे असे की, गांधीजींनी सांगितल्याप्रमाणे, मुलांनी उद्योग करून काहीतरी उत्पन्न मिळवीत शिकत जावे. तद्वतच उद्योग करीत करीत, उद्योगाचा अनुभव अधिक व्यापक, अधिक खोल करीत करीत उद्योगाचे कायमस्वरूपी कौशल्य अंगी बाणवीत जावे. उद्योग करीत करीत उद्योगाच्या कार्यात तरबेज होत जाणे ही निर्वाहशक्ती प्राप्त करण्याची सर्वात चांगली पद्धती आहे. त्यामुळे 'करून शिकणे' या प्रक्रियेतूनच 'शिकून करणे', अधिक चांगल्या दर्जाचे काम करणे व त्यातून चांगली अर्थप्राप्ती करणे या उद्दिष्टाकडे जाता येणार आहे.

चांगली निर्वाहशक्ती प्राप्त होण्यासाठी, विनोबांनी, श्रम आणि बुद्धी यांना एकत्र आणले आहे. आणि शिक्षण-काळात या दोहोंची एकतानता चांगली जुळली आहे किंवा नाही हे ओळखण्याची युक्तीही त्यांनी दिली आहे. त्यांच्यामते, आपल्याला जे येते ते वाणीने प्रकट करता आले पाहिजे; म्हणजे शब्दांत मांडता आले पाहिजे. तसे ते मांडता येत नसेल तर, एक तर, तो वाक्-शक्तीचा उणेपणा आहे किंवा "हातून होणारी क्रिया ज्या अनेक सूक्ष्म हालचालींची बनते त्या सूक्ष्म हालचालींचे स्वरूप बुद्धीला कळलेलेच नाही, असा त्याचा अर्थ आहे." आपल्याला जे येत आहे ते अगदी नीट सर्व बारकाव्यांनिशी आले पाहिजे (आणि हे बुद्धीचे काम आहे!) तद्वतच जे आपल्याला नीट कळले आहे ते भाषेत मांडताही आले पाहिजे; त्याचे स्पष्टीकरण करता आले पाहिजे. ( हे बुद्धी आणि भाषा दोन्हीचे काम आहे!) विनोबा असे म्हणतात की, "हात आणि बुद्धी यांच्या दरम्यान वाणी हा सांधा आहे. म्हणून उद्योगविषयक कृती आणि उद्योगविषयक वाणी ही दोन्हीं विद्यार्थ्याला आल्याशिवाय, त्याला उद्योग आला असे समजावयाचे नाही." इथे भाषेचा विषय खूप महत्त्वाचा आहे. मनुष्याला त्याचे सर्व व्यवहार भाषेकरवीच करावे लागतात, एवढेच नव्हे तर भाषा हेच कोणतीही गोष्ट आकलन करून घेण्याचे आणि विचार करण्याचेही साधन असते. त्यामुळे भाषा नेटकी नि चांगली येणे हे बुद्धिमत्तेचेच एक लक्षण मानता येईल. श्रम आणि बुद्धीची सांगड घालणे या संकल्पनेमध्ये भाषेचे असलेले हे स्थान दुर्लक्षून चालणार नाही.

श्रमाच्या कोणत्याही कामात, त्याच्या बारकाव्यात

उत्तरावयाचे तर आकलन, स्मृती आणि विचार अशा तिन्ही पातळ्यांवर कार्य घडत असते, आणि ही तिन्ही कार्ये करण्याचे प्रमुख साधन भाषा हेच असते. त्यामुळे, "मातृभाषेच्या वर्गात याकडे विशेष लक्ष द्यावे लागेल. पण, माझ्या दृष्टीने तो प्रश्न उद्योगाच्या गाभ्यात अंतर्गत असून केवळ औद्योगिक शिक्षणाच्या शाळेतही टाळता यायचा नाही," असे विनोबा म्हणतात, ते यामुळेच.

श्रम आणि बुद्धी यांचा एक विशेष संबंध विनोबांनी अन्य एका ठिकाणी मांडलेला आहे. त्यांच्या मते श्रम म्हणजे बुद्धी ताजी राखण्याची युक्ती आहे. त्यामुळे उद्योगाकरवी शिक्षणाचा एक वेगळाच आयाम ते दाखवून देतात. विनोबा म्हणतात, की मोकळ्या हवेत शरीरश्रम केल्यामुळे, "तापलेली जमीन पावसाकरता जशी तयार राहते तशी बुद्धी ज्ञानग्रहणाला नेहमी तयार राहते. शारीरिक मेहनतीने तापलेली बुद्धी ज्ञान ग्रहण करण्याकरता उत्सुक असते आणि ज्ञानाला फलद्रुप करते. आपल्याला विद्यार्थ्यांत ज्ञान भरीत बसायचे नाही, तर त्यांच्यात ज्ञानाची तृष्णा उत्पन्न करायची आहे, आणि ते प्राप्त करण्याची शक्ती निर्माण करावयाची आहे. विद्यार्थी स्वतःच शिकत असतो. उपनिषदातील विद्यार्थी गायी चारीतच शिक्षण मिळवितो. कधी त्याला एखादा बैल ज्ञान देतो, कधी एखादी चिमणी ज्ञान देते, कधी एखादा वृक्ष ज्ञान देतो." अशाप्रकारे, मुक्त वातावरणात श्रम करणे आणि मुक्त वातावरणात शिक्षण घेणे या दोन्ही बाबी, विनोबा एकाच पातळीवर आणतात. त्यांच्यामधील कार्य-कारण भावही स्पष्ट करतात. इथे, विनोबा 'उद्योगातून शिक्षण' या संकल्पनेकडून 'श्रमातून शिक्षण' किंवा 'श्रमाकरवी शिक्षण' असे तात्त्विक पातळीवर एक पाऊल पुढे टाकतात. याच्यात लपलेले शिक्षणविषयक तत्त्व आहे ते म्हणजे 'कृतीतून शिक्षण' हे होय. 'ऐकून शिकण्या' पेक्षा 'करून शिकणे' हे केव्हाही अधिक परिणामकारक, आणि म्हणून अधिक श्रेयस्कर असते. आणि ही शिक्षणप्रक्रिया, विनोबा म्हणतात त्याप्रमाणे, बुद्धीला चालना देणारी, बुद्धीला तजेला आणणारी अशी असते, हे आजच्या मानसशास्त्राने दाखवून दिलेले आहे.

श्रम-बुद्धी संबंधाचा आणखी एक आशय, विनोबा, जीवन आणि शिक्षण यांची आजच्या शिक्षणात (किंवा जीवनातही!) झालेली फारकत याच्याशी जोडतात. अशी फारकत होणे हे अनैसर्गिक आहे, अशी पुस्तीही ते जोडतात. आधी शिक्षण आणि मग जीवन; शिक्षणात जीवन नाही, आणि जीवनात शिक्षण नाही, या दोन्ही बाबी विनोबांना, अनैसर्गिक वाटतात. "आयुष्याची पहिली पंधरा-वीस वर्षे मनुष्याने जगण्याच्या भानगडीत न पडता नुसते शिक्षण घ्यावे आणि नंतर शिक्षण गुंडाळून ठेवून मरेपर्यंत जगावे," हे आजच्या शिक्षणपद्धतीचे स्वरूपच त्यांना अयोग्य वाटते. ते अयोग्य वाटते, याचे कारण असे की त्यामुळे विद्यार्थी स्वावलंबी होत नाही. याउलट विद्यार्थी जर काम करून, श्रम करून, आपले आपण शिकत असेल तर असे शिक्षण त्याला जीवनात आवश्यक असे कौशल्याचे, बुद्धीचे आणि अगदी टक्के टोणपे खाण्याचेही शिक्षण देईल. आणि असे शिक्षण हेच स्वावलंबी शिक्षण ठरेल. शरीरश्रमाने विद्यार्थी स्वावलंबी बनेल, एवढाच अर्थ विनोबांना अभिप्रेत नाही. त्यांनी असे म्हटले आहे की ज्यायोगे विद्यार्थ्यांची प्रज्ञा स्वयंभू बनेल, ते स्वतंत्र विचार करू शकतील अशातऱ्हेचे शिक्षण त्यांना दिले जावे. विनोबांनी गांधीजींची शिक्षण-स्वावलंबनाची मूळ संकल्पना इतर घटकांचा समावेश करून विस्तारली आहे.

### *विचारशक्ती*

उद्योगाकरवी शिक्षण, कृतीतून शिक्षण, अशा वेगवेगळ्या शब्दांनी वर्णन करता येण्यासारखी जी शिक्षण-पद्धती गांधी-विनोबा आपल्यापुढे मांडतात, तिचे एक पर्यवसान जसे विद्यार्थ्याला निर्वाहशक्ती देऊन स्वावलंबी करणारे आहे, तसेच ते विचारशक्ती देऊनही स्वावलंबी करू पाहणारे आहे.

इथे शिक्षण स्वावलंबनाचे एक वेगळे परिमाण आहे. विचार करता येणे, हे माणसाचे, इतर प्राण्यांशी वेगळेपण दाखविणारे असे व्यवच्छेदक लक्षण आहे. मनुष्य विचार करू शकतो, म्हणून तो भूतकाळाचा वेध घेऊन, त्यातील घटितांचे विश्लेषण करून काही धडे घेऊ शकतो. विचाराच्या सहाय्यानेच, मनुष्य, भावी काळाविषयी अंदाज आणि अपेक्षा करू शकतो नि त्या दिशेने वर्तमान जगण्याला आशय व दिशा देऊ शकतो. जिला आपण शास्त्रीय किंवा वैज्ञानिक पद्धती असे म्हणतो, तिचा पाया आणि तिच्यात अनुस्युत असणारे सर्व घटक हे मानवी विचारशक्तीचेच द्योतक आहेत. या विचार-शक्तीचा विकास उद्योगाच्या द्वारे होऊ शकतो, अशी विनोबाजींची भूमिका आहे; आणि 'उद्योगाच्या द्वारा बुद्धीमध्ये शोधकता यायला हवी,' असा त्यांचा आग्रह आहे.

हे घडून यायचे असेल तर शास्त्रशुद्ध विचार करता यायला हवा. विनोबांनी या शास्त्रीय विचारात येणाऱ्या काही बाबींची यादीच दिली आहे. पृथक्करण, एकीकरण,





वर्गीकरण, अनुक्रम, साहचर्य, कार्यकारणभाव, इंद्रियप्रामाण्य, इंद्रियभ्रम, महत्त्वमापन अथवा तारतम्य, संशय, निश्चय, इ. अशी गणिती किंवा शास्त्रीय कौशल्यांची जी यादी त्यांनी दिली आहे, त्यात आपण आणखीही भर घालू शकतो. उदाहरणार्थ, अंदाज / अवलंबनभाव इ. कौशल्ये.

या साऱ्या संकल्पना, वर्गात, मास्तर, फळा-खडू यांच्याद्वारे, म्हणजे ऐकून किंवा पाहून शिकण्यापेक्षा त्या करून म्हणजे स्वानुभवांतून शिकण्याने चांगल्या शिकता येतात असा, साधनांधारित शिक्षणपद्धतीचा अनुभव आहे. विनोबांनीही लिहिले आहे, "मुलाला शेतात काम करू द्या, त्यात काही प्रश्न उत्पन्न झाले तर त्यांची उत्तरे देण्यासाठी सृष्टिशास्त्राची, पदार्थविज्ञानाची किंवा इतर जी जरूर असेल ती माहिती द्या. हे खरे शिक्षण होईल. मुलाला रसोई करू द्या. त्यात जरूर तेथे रसायनशास्त्र शिकवा. पण मुख्य मुद्दा त्याला जीवन जगू द्या..." अशाप्रकारे सर्वच शास्त्रे, विषयानुषंगाने करीत असलेल्या कामाच्या भोवती गुंडाळून येतात; आणि ती जेव्हा, जिथे, जशी नि जितपत येतात, तसतसे त्यांचे उपयोजन करीत, विद्यार्थी शास्त्रपारंगत होऊ शकेल आणि त्याच्या शास्त्रीय विचारबुद्धीचाही विकास घडून येईल.

विचारशक्तीची तीन प्रमुख कार्ये आहेत. एक, निवड करणे, दोन, निर्णय घेणे आणि, तीन, कृतिप्रवण होणे.

माणसाचे सारे आयुष्यच मुळी प्रश्नांकित असते. सतत समोर प्रश्न उभे राहत असतात, आणि त्यांच्याशी सामना करण्याचे. कार्य, माणसाला, विचारपूर्वक करावे लागते. ही, प्रश्न सोडविण्याची ताकद माणसामध्ये येणे, ही गोष्ट शिक्षणाने घडून यायची असते.

बहुतांशी प्रश्न हे विविध पर्यायांतून निवड करण्याचे प्रश्न असतात. निवड करण्यासाठी विचारशक्तीची, तार्किक विचार करता येण्याची गरज असते. माणसाला पदोपदी, लहानमोठ्या बाबींमध्ये निर्णय घ्यावे लागतात. पडलेल्या प्रश्नाला, निर्णय घेऊनच दूर करावे लागते. ही निर्णय घेण्याची शक्ती म्हणजेच विचारशक्ती होय. आधी विचार करून निर्णय घेणे आणि मग घेतलेल्या निर्णयानुसार कृती करणे अशी, प्रश्न सोडवणुकीची प्रक्रिया असते. व्यवहारात, आपण जेव्हा 'विचारपूर्वक कृती करावी' असे म्हणतो, तेव्हा ही सर्व प्रक्रिया त्यात अनुस्यूत असते. 'कृती'चा निर्णय हा विचारपूर्वक घेतला जाणे, ही गोष्ट यात अपेक्षित असते.

आत्तापर्यंत आपण विचारशक्ती याचा अर्थ शास्त्रीय विचार करता येण्याची शक्ती, असा मर्यादितच घेतला होता. परंतु माणसाच्या जीवनात विचारशक्तीचे असलेले स्थान विचारात घ्यायचे असेल तर आपल्याला या मर्यादित अर्थाच्या पलीकडे जायला हवे. सामाजिक दृष्टिकोणातून याला अनिवार्य महत्त्व आहे.

विचारशक्तीचा अधिक विस्तारित अर्थ आहे 'स्वतंत्र विचारशक्ती' असा. 'स्वतंत्र' हा शब्द येथे 'विचारशक्ती'चे विशेषण म्हणून येतो. परंतु तो केवळ वर्णनात्मक नाही. तर तो विचारशक्तीचे एक मूलभूत असे कार्यच अधोरेखित करीत आहे.

आपल्याला एक मनुष्य म्हणून, समाजातील एक जबाबदार घटकव्यक्ती म्हणून स्वतंत्रपणे विचार करता आला पाहिजे. वेगळ्या शब्दांत आणि अधिक अर्थपूर्णतेने म्हणावयाचे तर, आपण आपले विचारस्वातंत्र्य अबाधित राखायला हवे असते. वास्तविक पाहता प्रत्येक व्यक्तीची विचारशक्ती ही 'स्वतंत्र'च असते; निसर्गतःच ती तशी असते. परंतु प्रत्यक्ष दैनंदिन जीवनात, ही विचारशक्ती खुंटण्याची, ती प्रदूषित होण्याची किंवा तिचे स्वातंत्र्यच हरपण्याची शक्यता अनेक कारणांनी असते. अनेक राजकीय प्रणाली, सैनिकी राजवटी, आर्थिक धोरणे, शासकीय बळजबरी किंवा धार्मिक संमोहन यामुळे व्यक्तीच्या विचारशक्तीच्या स्वातंत्र्याला बाधा येते, ती क्षीण होते किंवा ती सत्तेच्या दोऱ्या धरणाऱ्यांची गुलाम होऊन बसते. विचारशक्तीचे स्वातंत्र्य हरवणे म्हणजे माणसाचे माणूसपणच हरवणे होय. त्याचे व्यक्तिमत्त्व नाहीसे होणे होय.

"विद्यार्थ्यांत तर्कशक्ती मूळचीच असते. तिला वारंवार खाद्य मिळेल असे प्रसंग आणून द्यायचे, इतकेच शिक्षणाचे कार्य आहे." असे विनोबांनी म्हटलेच आहे. त्यामुळे, अशा कोणत्याही बाबींची गुलामी स्वीकारावी लागू नये यासाठी, आपली विचारशक्ती कायमच कार्यरत ठेवण्याची गरज असते. विचारशक्ती कार्यरत असेल तर तिचे स्वातंत्र्य अबाधित राहू शकते. आणि अशी विचारशक्ती सतत कार्यरत ठेवण्याची सवय आपल्याला शिक्षण देऊ शकते.

स्वतःचे प्रश्न सोडविणे, स्वतःची स्वतः निवड करणे, निर्णय घेणे, कृतिप्रवण होणे, स्वतःच स्वतःचा विचार करणे याला विचार स्वावलंबन असे म्हणता येईल. आपल्या विचाराला आधार अनेक असावेत, पण विचारशक्तीवर पगडा मात्र कुणाचाही असू नये, याला स्वतंत्र विचारशक्ती असे म्हणता येईल. ही स्वतंत्र विचारशक्ती विकसित करणे हे शिक्षणाचे प्रधान कार्य आहे. विनोबांनीही 'चिंतन स्वातंत्र्या'ची आवश्यकता प्रतिपादन केली आहे. त्यांनी म्हटले आहे, "विद्यार्थ्याचे पहिले कर्तव्य हे आहे की, त्यांनी आपली बुद्धी




अत्यंत स्वतंत्र ठेवावी. परिपूर्ण स्वातंत्र्याचा अधिकार जर कोणास असेल तर तो सर्वांत अधिक विद्यार्थ्यांना आहे. श्रद्धेशिवाय ज्ञान प्राप्त होत नाही, म्हणून श्रद्धा पाहिजेच. पण त्याचबरोबर बौद्धिक स्वातंत्र्याचीही तितकीच गरज आहे... श्रद्धेने ज्ञानाचा आरंभ होतो व त्याची समाप्ती बुद्धीत, स्वतंत्र चिंतनाने होते. म्हणून चिंतन स्वातंत्र्याचा अधिकार विद्यार्थ्यांनी कधीही गमावता कामा नये. जो शिक्षक विद्यार्थ्यावर सक्ती करील तो शिक्षक नव्हे. माझी गोष्ट पटली तर घ्या, न पटली तर मुळीच घेऊ नका असे शिक्षक म्हणेल. अशाप्रकारे बुद्धिस्वातंत्र्य देणाराच खरा शिक्षक आहे. कारण, बुद्धिस्वातंत्र्य हेच खरे स्वातंत्र्य आहे... आम्ही आमच्या चिंतन-स्वातंत्र्यावर घाला घालू देऊ नये व आपल्या स्वातंत्र्याचा हक्क सुरक्षित राखावा. आजच्या दुनियेत विद्यार्थ्यांचा हा हक्क हिरावला जात आहे, म्हणून मी त्यांना सावध करीत आहे." (*शिक्षणविचार* पृ. ८८)

### विवेकशक्ती

"विद्यार्थ्यांचे दुसरे कर्तव्य, त्यांनी स्वतःवर तावा राखावा हे आहे. जो स्वतःवर तावा राखू शकतो, तोच स्वातंत्र्याचा अधिकार आपल्या हाती राखू शकतो." (*शिक्षणविचार* पृ. ९०)

विनोबांनी शिक्षणाचे तीन मुख्य विषय सांगितले आहेत. (*शिक्षणविचार* पृ. ७४) ते म्हणजे, योग, उद्योग व सहयोग. विनोबांच्या शब्दांत, "योग म्हणजे आसने करायची, व्यायाम करायचा असे नव्हे; तर चित्तावर अंकुश कसा ठेवायचा, इंद्रियावर सत्ता कशी मिळवायची, मन ताव्यात कसे ठेवायचे, वाणीवर काबू कसा राखायचा असा योगाचा खरा अर्थ आहे." म्हणजे गीतेतला 'स्थितप्रज्ञ'. विनोबांनी पुढे असेही म्हटले आहे की, विज्ञानाचे युग आल्यामुळे माणसाच्या मेंदूवर अतोनात आक्रमण होत आहे, आणि म्हणून "अशा स्थितीत चित्ताला शांत ठेवायचे, स्थिर राखायचे, अंकुशात ठेवायचे ही अत्यंत महत्त्वाची वाव आहे."

विनोबांचा हा योग म्हणजे विवेकशक्ती आणि ती कशी वृद्धिंगत करायची हा आपल्यापुढचा शैक्षणिक प्रश्न.

विवेकशक्ती ही व्यक्तिगत वाव असली तरीही तिची गरज सामाजिक आहे. माणसाचे आयुष्यभराचे वहुसंख्य व्यवहार हे इतर व्यक्तींच्या संपर्कातील व्यवहार असतात आणि म्हणूनच परस्परसंवंधांचे काही संकेत अस्तित्वात येतात. हे परस्परसंवंधांचे संकेत माहीत होणे, मान्य होणे आणि मग मनात रुजणे नि दैनंदिन व्यवहारात उतरणे अशा पायऱ्यांतून व्यक्तीची विवेकाकडे वाटचाल होत असते. या वाटचालीत अन्य व्यक्ती (लहान मुलांना प्रौढ व्यक्ती) मदत करू शकतात, आणि म्हणून विवेकशक्तीचा विकास ही शैक्षणिक वाव ठरते.

पोहोणे जसे पाण्यात शिरूनच शिकावे लागते त्याचप्रमाणे समाजसंपर्कातूनच विवेकशक्ती वृद्धिंगत होऊ शकते. अशाप्रकारचे शिक्षणाचे वातावरण ठेवून संपर्कसंधी निर्माण करता येतात.

प्रत्येक व्यक्ती स्वभावतः वेगळी असते. तिचा कल, तिच्या वुद्धिमत्ता या निसर्गतः वेगळ्या असतात, त्यामुळे त्यांच्या मनोव्यापारांचा अंगभूत पाया वेगळा असतो. शालेय स्तरावर प्रत्येक विद्यार्थ्यांच्या या नैसर्गिक वेगळेपणावरोवरच त्याची वा तिची कौटुंविक पार्श्वभूमी, सामाजिक-आर्थिक पार्श्वभूमी वेगळी असते. त्यामुळे तिच्या मनःशक्ती वा मनमर्यादा यांचा घाट वेगवेगळा असतो. किंवहुना, म्हणूनच, गटात एकत्रितपणे कोणताही व्यवहार करताना दुसऱ्याला 'सहन' करण्याची कला व भावना आत्मसात करावी लागते. विवेकशक्तीचा हा पाया असतो.

विनोबांचेच शब्द पुन्हा वापरायचे तर 'उद्योग' मध्यवर्ती ठेवून शिक्षणव्यवहार करायचे ठरवले तर 'सहयोग' अपरिहार्यच असतो, आणि मग 'योग' साधनेसाठी अनुकूल वातावरणही निर्माण होते.

निर्वाहशक्ती, विचारशक्ती आणि विवेकशक्ती या तिन्हींचा हेतू ठेवून शिक्षणव्यवस्था आखली तर विद्यार्थी-विद्यार्थिनीला या तीनही अंगांनी शिक्षण स्वावलंवी करू शकेल. आणि मग अशा शिक्षणव्यवस्थेला 'स्वावलंवी शिक्षणव्यवस्था'; आणि अशा व्यवस्थेतील शिक्षणाला 'स्वावलंवी शिक्षण' असे म्हणता येईल.

♦♦♦

**शिक्षणमंत्री वाळासाहेब देसाई रुग्णालयात भाऊराव पाटील यांना भेटावयास गेले. आपण सुरू केलेली फी माफीची योजना त्यांनी अण्णांना सांगितली. अण्णा म्हणाले, "वाळासाहेब, आज ही योजना तुम्हाला गोंडस वाटते परंतु स्वावलंबी शिक्षणाला ती मारक होईल."**






# बुनियादी शिक्षणाची मूलतत्त्वे

कृष्णकुमार
अनुवाद : वसंत पळशीकर
वेणू पळशीकर

१

## बुनियादी शिक्षणाची पायाभरणी

गांधीजींच्या मूळ गुजराती भाषेतील 'आत्मकथे'त 'वाळ केळवणी' या शीर्षकाचे एक प्रकरण आहे. वाळ केळवणी म्हणजे मुलांचे शिक्षण. दक्षिण आफ्रिकेत घर केल्यानंतर मुलांच्या शिक्षणाचा प्रश्न त्यांच्यासमोर आला. स्वतःची दोन मुले (वय अनुक्रमे नऊ व पाच) आणि वहिणीचा मुलगा (वय दहा) अशी तीन मुले घरात होती. त्यावेळी गांधींच्या शिक्षणविषयक विचारांना काही निश्चित आकार प्राप्त झालेला नव्हता. युरोपियन मुलांच्यासाठी ज्या शाळा होत्या त्या शाळांमध्ये परिवारातील तीन मुलांना प्रवेश मिळवून देणे शक्य होते, इतकी त्या वेळपावेतो गांधींना तेथे सामाजिक-व्यावसायिक प्रतिष्ठा प्राप्त झाली होती. पण विशेष कृपा म्हणून व केवळ अपवाद म्हणूनच असा प्रवेश मिळाला असता, आणि हिंदी मुलांना ज्या शाळांची दारे एरवी वंद आहेत त्या शाळांमध्ये स्वतःच्या घरच्या मुलांचे शिक्षण करण्याची कल्पना आपण करू शकत नव्हतो असे गांधींनी लिहिले आहे. हिंदी मुले ज्या मिशनऱ्यांच्या शाळांमध्ये जाऊ शकत त्या शाळांत जे 'शिक्षण' मिळे ते त्यांच्या पसंतीला उतरणारे नव्हते, असेही त्यांनी लिहिले. शिक्षणविषयक विचार स्पष्ट व ठाम नसल्याने त्यांनी आधी एक इंग्लिश गव्हर्नेस (मुलांचे शिक्षण व संगोपन करणारी व्यक्ती) नेमून पाहिली. काही काळ त्यांनी मोठ्या मुलाला – हरिलालला – व भाच्याला हिंदुस्थानात वसति-गृहांमध्ये शिक्षणासाठी ठेवून पाहिले. पण ही व्यवस्थाही त्यांना समाधान देऊ शकली नाही. आईवापाच्या जवळ राहूनच लहान वयात शिक्षण होणे योग्य आहे ही त्यांची पक्की धारणा होती, असे त्यांनी लिहिले आहे.

मुलांचे शिक्षण करण्यासाठी जेवढा वेळ व बुद्धी खर्च करण्यास गांधीजींना आवडले असते तेवढा वेळ व बुद्धी या कामासाठी काढणे शक्य होऊ नये अशा प्रकारच्या तीव्र व दीर्घ लढ्यामध्ये गांधीजी गुंतलेले राहिले. याची नोंद त्यांनी वरील प्रकरणात करून म्हटले आहे की, 'माझी इच्छा होती त्या प्रकारचे, त्या प्रमाणात (व त्या गुणवत्तेचे?) ग्रांथिक-वौद्धिक शिक्षण मी मुलांचे करू शकलो नाही.' (मूळ गुजराती भाषेत 'अक्षर ज्ञान' असा शब्दप्रयोग गांधीजींनी केलेला आढळतो. इंग्रजी भाषांतरात – भाषांतर महादेवभाई देसाईंचे असल्याने प्रमाण म्हणावयास हवे – 'लिटररी एज्युकेशन' असा शब्दप्रयोग आहे.) पाठ्यपुस्तकांच्या आधारे भाषा, साहित्य, इतिहास, नीती अशा विषयांचे शिक्षण देऊन 'विद्याविभूपित' व्यक्तिमत्त्व घडविण्यावर औपचारिक शिक्षणाचा भर त्या काळात होता व आजही आहे. 'अक्षर ज्ञान' म्हणत असताना गांधींच्या मनात हे सारे होते असे म्हणता येते. शाळा व महाविद्यालयांमध्ये मिळणारे शिक्षण आपल्याला दिले गेले नाही व त्यामुळे आपल्या ठायी मोठे न्यून राहून गेले आहे असे आपल्या मुलांचे सदैव गाऱ्हाणे राहिले, असे गांधीजींनी नमूद केले आहे. ही गोष्ट नमूद केल्यानंतर, त्यांनी केलेल्या मुलांच्या जीवनोपयोगी बुनियादी शिक्षणाच्या प्रयोगाविषयी ते लिहितात :

"माझा स्वतःचा अभिप्राय असा की, (माझ्या शिक्षणपद्धतीमुळे) जीवनानुभवाधिष्ठित ज्ञान त्यांना प्राप्त झाले, स्व-तंत्रतेचा वस्तुपाठ ग्रहण करण्याची त्यांना संधी मिळाली. या गोष्टी, जमेल त्या रीतीने त्यांना शाळेत पाठविण्याचा आग्रह मी राखला असता तर, त्यांना मिळाल्या नसत्या. त्यांच्याविपयी जी निश्चिंतता मला आज वाटते, ती वाटली नसती. साधी राहणी आणि सेवाभाव यांचे जे शिक्षण त्यांनी येथे राहून घेतले, ते शाळांमध्ये मिळणाऱ्या जीवनविन्मुख शिक्षणामधून मिळाले नसते. उलटपक्षी, (अशा शिक्षणाच्या संस्कार/प्रभाव यांमधून) त्यांनी जी जीवनसरणी अंगिकारली असती ती मला माझ्या देशकार्यात विघ्नरूपच ठरली असती."

पुढे ते म्हणतात, - "ती जर एरवीच्या शाळेमध्ये गेली असती तर त्यांचे 'वौद्धिक' शिक्षण झाले असते ही गोष्ट

खरी. पण जो स्वतंत्रतेचा व आत्मप्रतिष्ठेचा पदार्थपाठ ती येथे शिकली, ती तो शिकू शकली नसती. आणि शाळांमध्ये मिळणारे 'अक्षरज्ञान' आणि स्वतंत्रता या दोहोंपैकी एका गोष्टीची निवड करावयाची झाली तर, 'अक्षरज्ञाना' पेक्षा स्वतंत्र वनण्याचे शिक्षण हजार पटीने सरस आहे असे कोण म्हणणार नाही?"

त्यांच्या मुलांपैकी सर्वांत मोठ्या हरिलालने पित्याचा सल्ला अव्हेरून, त्यांच्या भूमिकेमुळे आपले नुकसान झाले अशी टीका करीत, शालेय-महाविद्यालयीन शिक्षण घेण्याच्या इराद्याने गांधीजींपासून फारकत घेतली. हिंदुस्थानात परत येऊन मॅट्रिकची परीक्षा देण्याचा (अयशस्वी) प्रयत्न केला. हरिलालची टीका काय, ते याच प्रकरणात गांधींनी सांगितले आहे, आणि आपल्या मुलांना शाळा-कॉलेजांमध्ये शिक्षण दिले असते तर काय विघडले असते, (शिक्षण न देऊन) त्याचे पंख छाटण्याचे तुम्हाला काय अधिकार होते, आयुष्य कोणत्या व्यवसायांमध्ये घालवायचे व कोणती पदवी घ्यायची हे ठरविण्याच्या त्यांच्या इच्छेच्या आड तुम्ही का आलात, या प्रकारचे प्रश्न मित्रांनी वेळोवेळी उपस्थित केल्याचेही गांधीजींनी नमूद केले आहे.

मग त्यांनी त्यांची वाजू मांडली आहे. स्वतःला प्रतीत झालेल्या सत्याशी प्रामाणिक राहून त्या सत्यानुसार आचरण करणाऱ्या व्यक्तीला सत्याचे प्रयोग करण्याच्या ओघात कोणत्या टोकापर्यंत जावे लागते याची कल्पना यावरून वाचकांना येईल, असे ते म्हणतात.

अन्य हिंदी मुलांना जे शिक्षण अनुपलब्ध होते ते (कीर्तीचा व प्रतिष्ठेचा उपयोग करून) जर स्वतःच्या मुलांना गांधींनी दिले असते तर, हिंदी माणसांना हिंदी म्हणून स्वतःची काही आत्मप्रतिष्ठा राखण्याचे कर्तव्य समजत नाही (इतके हिंदी लोक परतंत्र व लाचार आहेत) हेच त्यांनी स्वतःच्या वर्तनाने दाखवून दिले असते; स्वातंत्र्यदेवता ही मोठी निष्ठुर देवता आहे, भक्ताकडून ती मोठा त्याग करण्याची, वळी चढविण्याची मागणी करीत असते, असे गांधींनी म्हटले आहे.

बुनियादी शिक्षण आणि जीवन यांचा संवंध या ठिकाणी स्पष्ट होतो, अधोरेखित होतो. स्वतःच्या लोकांशी वंधुतेच्या व समतेच्या भूमिकेतून एकरूप होणे, त्यांना एकनिष्ठ राहणे, आणि त्यांच्यासह आत्मप्रतिष्ठा राखणे हे मूल्य आहे. ज्या जीवनपद्धतीच्या व समाजाच्या आदर्श व्यवस्थेच्या प्रारूपाचा स्वीकार केलेला असेल, म्हणजेच जे काय इष्ट व योग्य मानलेले असेल त्याच्याशी शिक्षण - त्याचा आशय व पद्धती - सुसंवादी असावे हा आग्रह – सत्याग्रह – बुनियादी शिक्षणात अनुस्यूत आहे.

'आत्मकथे'त शिक्षणविषयक प्रयोगांची, त्या मागील भूमिकेची चर्चा करणारी इतरही प्रकरणे आहेत. 'आत्मकथे'च्या चौथ्या भागात 'घरातील फेरफार व वालशिक्षण', 'पंतोजी', 'पुस्तकी शिक्षण' आणि 'आत्मिक शिक्षण' अशी चार प्रकरणे या विषयाला वाहिलेली आहेत. या सर्व प्रकरणांतील विवेचनाला गांधीजींच्या जीवनातील आमूलाग्र परिवर्तनाची पार्श्वभूमी आहे.

१९०४ साली त्यांच्या वाचनात जॉन रस्किन या इंग्लिश कलाकोविद तत्त्वज्ञाचे 'अनटु धिस लास्ट' हे पुस्तक आले. गांधींनी आपल्या जीवनाचा घाट संपूर्णतः वदलला. 'फिनिक्स वसाहत' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या त्यांच्या आयुष्यातल्या पहिल्या आश्रमाची स्थापना गांधींनी केली. या आश्रमात अनेक कुटुंवे एकत्र श्रमनिष्ठ, स्वावलंवी सामूहिक जीवनाचे प्रयोग करू लागली. या आश्रमातल्या मुलांच्या शिक्षणाचा प्रश्न उपस्थित झाला.

वुनियादी जीवनशिक्षणाचा प्रयोग आता पूर्ण गांभीर्याने सुरू झाला. अगदी आरंभीच्या काळात फक्त त्यांच्या घरातल्या मुलांचेच शिक्षण करण्याची गोष्ट होती. या नव्या श्रमनिष्ठ, स्वावलंवी जीवनाचे पाठ स्वतःला आणि मुलांना देण्याच्या ओघात त्यांच्या 'अक्षर ज्ञाना'ची काही प्रमाणात हेळसांड झाली. गांधींनी लिहिले आहे की, "त्यांच्या ग्रांथिक - वौद्धिक शिक्षणाविषयी मी वेदरकार होतो असे तर मी म्हणणार नाही. पण जरूर पडली तेव्हा ते वाजूला ठेवण्यात मला संकोच वाटला नाही." यावेळी गांधी अजूनही जोहान्सवर्गमध्ये वकिली व्यवयाय करीत होते. रोज ते आठ किलोमीटर अंतर चालत. ते ऑफिसला जाताना-येताना मुलांना वरोवर घेऊन जात, व संभापणाद्वारे त्यांना 'अक्षर ज्ञान' देण्याचा उपक्रम करीत. पण त्यांचे सार्वजनिक कार्य वाढत चालल्याने हा वेळही ते मुलांसाठी नेहमीच काढू शकत असत असे नाही. या कारणाने आपण त्यांचे वौद्धिक-ग्रांथिक शिक्षण पुरेशा प्रमाणात करू शकलो नाही, याची कवूली त्यांनी दिली आहे. त्यांनी पुढे असे म्हटले आहे की, "त्यांचे शील घडविण्यासाठी त्यांचे जे जे शिक्षण करण्याची मला गरज










वाटली, ते ते शिक्षण करण्यात मात्र मी कसूर केली नाही." समाजाची सेवा करण्याला मी अग्रक्रम दिल्याने त्यांचे ग्रांथिक शिक्षण काहीसे राहून गेले; त्या काळी मी बाप म्हणून आदर्श नव्हतो, माझ्यात अनेक कमतरता होत्या, आणि याचे मला आज खरे दुःख आहे, असे त्यांनी म्हटले आहे. शील घडविणे हे पालकांचे कर्तव्य आहे व त्या कर्तव्यपालनात कसूर होऊ देता कामा नये, यावर त्यांनी भर दिलेला आढळतो.

याच ठिकाणी त्यांनी मातृभाषेत शिक्षणव्यवहार घडविण्याचे महत्त्व प्रतिपादले आहे. गांधी मुलांशी गुजराती भाषेतून संभाषण करीत. त्यांचे सहकारी पोलाक यांचा यावरून तीव्र मतभेद होता. मुलांना इंग्रजी भाषेमधून शिक्षण न देऊन मुलांचे भविष्य तुम्ही खराब करीत आहात, अशी त्यांची गांधींवर टीका होती. गांधींनी लिहिले आहे की, जे पालक आपल्या मुलांना अगदी बालपणापासून इंग्रजीत विचार करावयास व बोलावयास शिकविण्याची गोष्ट करतात, ते त्या मुलांचा व देशाचा द्रोह करतात. देशाच्या अध्यात्मिक व सामाजिक वारशापासून अशी मुले वंचित राहतात. यामुळे ही मुले तेवढ्या अंशाने देशाची व जगाची सेवा करण्यास अपात्र ठरतात. देशाची असूनही परकीय बनतात. इंग्रजी भाषा चांगली येण्याला गांधींचा विरोध नव्हता, हेही येथे नमूद केले पाहिजे. मुले सहजच द्वि-भाषिक बनली, कारण ती इंग्लिशभाषिक मंडळीत वावरत होती, असे त्यांनी म्हटले आहे.

वर उल्लेख केलेल्या चार प्रकरणांपैकी नंतरची तीन प्रकरणे पुढच्या काळातील टॉलस्टॉय फार्मवरील शिक्षणाशी संबंधित आहेत. टॉलस्टॉय फार्मवर हिंदू, मुस्लिम, पारशी, ख्रिश्चन अशी विभिन्न धर्मांची मुले-मुली होती. शिक्षणाची खरी पद्धती कोणती याचे ज्ञान अनुभवांमधून व प्रयोग करून संपादन करण्याची इच्छा आपल्याला होती असे गांधींनी लिहिले आहे. शिक्षण ही खरे तर मातापित्यांची जबाबदारी असल्याचे त्यांचे मत होते. पूर्ण वेळ व्यावसायिक शिक्षकांची मदत कमीत कमी घेतली जायला हवी, असेही त्यांचे मत. टॉलस्टॉय फार्म हे एक मोठे कुटुंबच होते. 'माझे स्थान पित्याचे होते' असे लिहून गांधींनी म्हटले आहे की, या नात्याने त्यांनी मुलांच्या शिक्षणाची जबाबदारी स्वतःची मानली. ही मुले वेगवेगळ्या वयांची, वेगवेगळ्या पार्श्वभूमीमधून, वेगवेगळे संस्कार घेऊन आलेली होती. शील घडविणे, नीतिविवेकाचे संस्कार करणे हेच खरे महत्त्वाचे शिक्षण अशी गांधींची धारणा असल्याने त्यांनी सर्व मुलांच्या शिक्षणाची जबाबदारी उचलली. या मुलांच्या मधे त्यांचा पिता बनून मी दिवस-रात्र राहू लागलो, असे त्यांनी लिहिले आहे. शिक्षणाचा पाया चारित्र्य, शील हाच होय अशी त्यांची धारणा होती.

जीवनोपयोगी उत्पादक कौशल्यांचे शिक्षणही मुलांना मिळण्याची आवश्यकता, अर्थातच, गांधींना कळत होती. शेती, बागकाम, सुतारकाम, चामड्यापासून बूट-चपला तयार करणे अशा हस्तव्यवसायांचे शिक्षण तेथे मुलांना प्रत्यक्ष काम करता करता दिले जात असे. सर्व मुले स्वभावतः कामसू व प्रामाणिक नव्हती असे लिहून पुढे गांधींनी म्हटले आहे की, ते शिस्तीचे भोक्ते होते, तरी ते पुष्कळदा मुलांच्या आळसाकडे व कामचुकारपणाकडे जाणूनबूजून दुर्लक्ष करीत. पण कधी सक्तीने ते काम करवून घेत. सक्ती करीत तेव्हा मुले कंटाळत, पण विरोध करीत नसत. सक्ती का करावी लागत आहे ते गांधी समजावूनही देत. मुले ऐकत, पण पुन्हा पुन्हा काम सोडून खेळायला पळत, असे त्यांनी लिहिले आहे. गांधींचे लिहिणे वाचून छाप अशी उमटते की, त्यांचे मुलांशी नाते खेळीमेळीचे होते. कामाच्या वेळी चोख काम करण्याचे महत्त्व मुलांना पटे, गांधी त्यांच्याकडून प्रसंगी काम शिस्तीने करवूनही घेत. त्याचवेळी गांधी मुलांना आळस करायला, चुकारपणा करायला, खेळायला अवसर पण ठेवीत.

गांधींचा एक मुद्दा फार महत्त्वाचा आहे. त्यांनी लिहिले आहे की, जे काम 'शिक्षक' म्हणून भूमिका बठविण्याऱ्या व्यक्ती स्वतः करीत नसतील ते मुलांकडून करवून घ्यायचे नाही; ते जे कोणते काम करीत असतील ते काम त्यांच्याबरोबरीने 'शिक्षका'नेही करावयाचे, असा नियमच टॉलस्टाय फार्मवर त्यांनी केलेला होता. त्यामुळे सर्व कामे मुलांनी हौसेने शिकून घेतली. बुनियादी शिक्षणाचे एक रहस्यच गांधींनी येथे उलगडून समोर ठेवले आहे.

'पुस्तकी शिक्षण' या प्रकरणातील विवेचनातून पुढील काही गोष्टी ध्यानात येतात. मुलांचे वेगवेगळ्या विषयांचे पद्धतशीर शिक्षण होण्याची गरज गांधी अमान्य करीत नाहीत. मुलांना त्यांच्या त्यांच्या भाषेत प्राथमिक व पायाभूत शिक्षण मिळावे यासाठी त्यांनी पुष्कळ धडपड केली. या कामासाठी टॉलस्टाय फार्मवर त्यांच्याखेरीज दुसरे कोणीच

नव्हते! तमीळ, उर्दू, गुजराती, संस्कृत - सर्व भाषा गांधीजी शिकवीत. या भाषांमधून मुलांना विषय शिकवीत. गांधींनी लिहिले आहे की त्यांचे या सर्वच भाषांचे ज्ञान अगदी जुजबी, फार तर शाळकरी मुलाएवढेच होते. ते लिहितात "एवढ्या भांडवलावर मी काम चालविणार; आणि माझे मदतनीस, ते तर माझ्याहूनही कमी शिकलेले! परंतु माझे देशी भाषांबद्दलचे प्रेम, शिकविण्याच्या स्वतःच्या हातोटीबद्दलचा माझा आत्मविश्वास, विद्यार्थ्यांचे अज्ञान व अज्ञानापेक्षाही अधिक अंशी त्यांच्या मनाची उदारता, यांची मला फार मदत झाली." या संदर्भात त्यांनी पुढे जे लिहिले आहे ते फार महत्त्वाचे आहे. ते लिहितात, "तरी माझे गाडे ढकलत गेले. कारण मी कधी आपल्या विद्यार्थ्यांपासून स्वतःचे अज्ञान लपविण्याचा प्रयत्न केला नाही. हरेक बाबतीत मी जसा मुळात होतो तसाच तेही मला समजत होते. त्यामुळे पुस्तकी ज्ञानाच्या बाबतीत माझे गाढ अज्ञान असतानाही मी त्यांचे प्रेम व आदर कधीही हरवून बसलो नाही."

पाठ्यपुस्तकांचा वापर गांधींनी जवळपास केलाच नाही. ते लिहितात, "माझी अशी समजूत आहे की, शिक्षक हाच विद्यार्थ्यांचे पाठ्यपुस्तक असावा... मुले डोळ्यांनी ग्रहण करतात, त्यापेक्षा कानांनी ऐकलेले कमी श्रमात अधिक ग्रहण करू शकतात."

गांधी ज्या मुलांना शिकवीत होते ती जवळपास सर्व अशिक्षित कुटुंबांमधील, कधी शाळेत न गेलेली होती. ती बुद्धिजीवी वर्गातील नव्हती, आणि त्यांना प्राथमिक पातळीवरील पुस्तकी शिक्षण देणे पुरेसे होते, या गोष्टी येथे ध्यानात ठेवल्या पाहिजेत. भाषांचे, साहित्याचे, वेगवेगळ्या विषयांचे जेवढे शिक्षण मुलांना द्यावयास हवे होते तेवढे आपण देऊ शकलो नाही, ही कबुलीही गांधींनी दिल्याचे लक्षात ठेवले पाहिजे.

'आत्मिक शिक्षण' या प्रकरणात गांधींची वैशिष्ट्यपूर्ण भूमिका स्पष्ट होते. टॉलस्टॉय फार्मवरील मुले विभिन्न धर्मांची होती. त्यांच्या त्यांच्या धर्माची, धर्मग्रंथांची प्राथमिक ओळख त्यांना करून देणे हा एक भाग होता. पण हे खरे आत्मिक शिक्षण नव्हे; हे बौद्धिक शिक्षणच होय, असा योग्य अभिप्राय गांधींनी व्यक्त केला आहे. ते पुढे लिहितात, "आत्म्याचा विकास करणे म्हणजे शील बनविणे, ईश्वराचे ज्ञान मिळविणे, आत्मज्ञान प्राप्त करून घेणे... आणि त्याखेरीज इतर ज्ञान व्यर्थ आहे, हानिकारकही होण्याचा संभव आहे असे मला वाटत होते."

गांधी पुढे लिहितात की, मुलांच्या आत्म्याचा विकास शिक्षकाच्या वर्तनाच्या प्रत्यक्ष उदाहरणावरून होणार. "मी माझ्या मनाशी ठरविले की, मी माझ्यापाशी असलेले तरुण मुलगे व मुली यांना वस्तुपाठरूप होऊन राहिले पाहिजे. अशा तऱ्हेने असे शिष्यच माझे शिक्षक बनले."

टॉलस्टॉय फार्मवरील शिक्षणाच्या प्रयोगांबद्दल, गांधींनी दक्षिण आफ्रिकेतील सत्याग्रहाच्या इतिहासाचे जे पुस्तक लिहिले त्यातही काही गोष्टी लिहिल्या आहेत. त्यांच्याजवळ राहिलेल्या मुलामुलींमध्ये काही मुलगे "फार आडदांड व नाठाळ, तर कोणी उनाड" होते. गांधींनी स्वतःची तीन मुले या मुलांच्या संगतीत वाढू द्यावीत याविरुद्ध कॅलनबॅक यांचा जोरदार आक्षेप होता. पण ज्या युवकांना आपणच आमंत्रित केले आहे त्या मुलांमध्ये व स्वतःच्या मुलांमध्ये भेदभाव करणे गैर आहे असे गांधींचे मत. गांधी लिहितात, "शिवाय आपण इतरांपासून श्रेष्ठ आहो, अशा तऱ्हेचा भेदभाव मी माझ्या मुलांना आजपासून का शिकवावा? अशा तऱ्हेचा विचार त्यांच्या डोक्यात घालणे म्हणजेच त्यांना आडमार्गाला नेणे आहे." उलटेही घडून का येणार नाही; ही नाठाळ व उनाड मुले चांगल्यांच्या संसर्गाने चांगली बनतील असेही का घडू नये?

मुले व मुली पूर्ण स्वतंत्रपणे एकत्रच उठत-बसत. हा सहशिक्षणाचा प्रयोग सर्वाधिक निर्भय प्रयोग होता. आंघोळीसाठी निरागस मुली (ज्या वयाने लहान, १२-१३ वर्षांच्या होत्या) आणि हे नाठाळ, उनाड मुलगे एकत्रच जात. त्यांना त्यांचा मर्यादा-धर्म व आत्मसंयमाचे महत्त्व समजावून सांगून, त्यांच्या नैतिक जबाबदारीचे भान देऊन व त्यांच्यावर पूर्ण विश्वास ठेवून त्यांना ही मोकळीक दिलेली होती. मुले-मुली मिळूनच जात असल्याने समूहाची सुरक्षितता लाभत होती. सामान्यतः गांधीही ठरलेल्या वेळी झऱ्यावर स्नानाला जात. सारी मुले-मुली ओसरीवर गांधींच्या आसपास झोपत. मुलगे व मुली एकमेकांसोबत मोकळेपणाने वाढली तर त्यांच्यात विकार जागृत न होता निरागस भाव टिकून राहू शकतो, यावर विश्वास ठेवून त्यांनी पालकांच्या संमतीने हा प्रयोग अवलंबिला होता. आपण त्या सर्वांची आईच बनलो होतो, व मुलांनीही आपले आईपण मनोमन स्वीकारले होते








असे गांधींनी लिहिले आहे.

आंघोळीस गेल्या वेळी एका तरुण मुलाने एक दिवस दोन मुलींशी मस्करी केल्याचे वृत्त गांधींच्या कानावर आले. आपले पावित्र्य अकलंकित राहील याची निःशंक खात्री मुलींना वाटेल व मुलांची दृष्टी निर्विकार बनेल यासाठी मुलींच्या शरीरावर कोणते चिन्ह निर्माण करता येईल याचा विचार गांधींनी रात्रभर केला. स्वतःचे सुंदर लांबसडक केस कापण्याची त्यांनी अनुमती द्यावी यासाठी गांधींनी त्यांची शांतपणे समजूत घातली. प्रौढ स्त्रियांना ही कल्पना सहन तर झाली नाही, पण त्यामागील गांधींचा सद्हेतू त्यांनी जाणला. आरंभी त्या मुलींनी गांधींना नकारच दिला. पण मग त्यांनी शेवटी गांधींना अनुमती दिली. गांधींनी त्यांचे केस स्वहस्ते कापले. गांधी त्यांची आई बनून गेले होते ही गोष्ट येथे ध्यानात ठेवणे महत्त्वाचे.

या प्रसंगावर गांधींनी 'दक्षिण अफ्रिकेतील सत्याग्रहाचा इतिहास' या पुस्तकात भाष्य केले आहे. ते लिहितात, "नंतर सर्व मुलांच्या वर्गामध्ये मी केस कापण्याची गोष्ट का केली (म्हणजे ते कशाचे 'चिन्ह' होते) ते सर्वांना नीट समजावून सांगितले. परिणाम सुंदर झाला. परत कधी अशी छेडछाड झाल्याचे माझ्या कानावर आले नाही." गांधी पुढे म्हणतात, "या प्रयोगाचे इतरांनी अनुकरण करावे या हेतूने मी हे सांगत नाही. एखाद्या विशिष्ट प्रसंगी मनुष्य कोणत्या टोकापर्यंत जाऊ शकतो ते सांगण्यासाठी, तसेच सत्याग्रही लढ्याच्या विशुद्धतेचे सूचन करण्यासाठी या प्रयोगाचा उल्लेख मी करीत आहे. अशा विशुद्धतेतच विजयाचे बीज असते. असा टोकाचा प्रयोग करण्याचा अधिकार कमावण्यासाठी शिक्षकाला आई व वडील दोन्ही बनता आले पाहिजे. तसेच शिक्षकाचे मन पूर्वग्रहदूषित नसेल तरच तसा प्रयोग होऊ शकतो. असा प्रयोग करण्यासाठी फार मोठ्या तपश्चर्येचे बळ पाठीशी असावे लागते."

गांधींनी असेही लिहिले आहे की, अशी परस्परांशी मोकळेपणाने राहण्याची, एकत्र उठ-बस करण्याची स्वतंत्रता देण्याची वा त्याचे शिक्षण देण्याची त्यांची नंतरच्या काळात हिंमत राहिली नाही. "माझे मन तेव्हा अधिक निरागस होते" असे ते लिहून जातात. कामविकारांविषयीची जाण अधिक प्रगल्भ झाल्याने व स्वतःच्या ठायीही विकारांचे सूक्ष्म दर्शन घडल्याने आज मी असा सहशिक्षणाचा प्रयोग करण्याच्या बाबतीत भित्रा बनलो आहे, अशी कबुलीही ते देतात.

टॉलस्टॉय फार्मच्या काळात आपली श्रद्धा व साहस यांनी पराकाष्ठा गाठली होती, आणि तीच श्रद्धा व तेच साहस यांचा प्रसाद आपणास पुनरपि लाभावा यासाठी आपण ईश्वराची प्रार्थना करीत आहो असे त्यांनी लिहिले आहे.

अशा रीतीने गांधींनी स्वतःच्या मुलांना बरोबर घेऊन बुनियादी जीवनशिक्षणाचा प्रयोग दक्षिण आफ्रिकेत जवळपास दहा-बारा वर्षे केला. सर्व प्रकारच्या, वेगवेगळ्या वयांच्या मुलामुलींना बरोबर घेऊन, त्या सर्वांचे आई-बाप दोन्ही बनून त्यांनी मोठ्या निष्ठेने प्रयोग केला. हा प्रयोग फसला असे त्यांचे मत नव्हते. आपण अनेक अंगांनी कमी पडलो, त्याला अनेक समजण्यासारखी कारणेही होती; पण आपली दिशा योग्य होती, हेच त्यांचे मत राहिले. गांधी मुलांमध्ये रमत, मुलांनाही गांधींसोबत आनंद येई. हे निरीक्षण त्यांच्या पुढच्या आयुष्यात अनेकांनी नोंदविले आहे.

१९१४ साली भारतात परतल्यावर गांधींनी हा शिक्षणपद्धतीचा प्रयोग का हाती घेतला नाही, याचा व्यापक पुरस्कार का केला नाही, १९३७ पर्यंत ते का थांबले याचे आश्चर्य वाटते, असे कृष्णकुमारांनी त्यांच्या व्याख्यानात म्हटले आहे. भारतात आल्यापासून त्यांनी चालविलेले विधायक व संघर्षात्मक राजकारण हे एक प्रकारचे जनतेचे बुनियादी शिक्षणच होते हे ध्यानात घेतले म्हणजे आपले आश्चर्य काहीसे कमी होते असेही कृष्णकुमारांनी म्हटले आहे.

## २

## बुनियादी शिक्षणाचा दृष्टिकोन

बुनियादी शिक्षणाची तीन पायाभूत तत्त्वे कृष्णकुमारांनी पुढीलप्रमाणे विशद केली आहेत : "एक तो हाथ का काम स्कूल में हो। दुसरा, स्कूल की शिक्षा स्थानीय परिवेश से जुडी हो। ... और तिसरा, स्कूल में जो जो विषय पढाये जायें, जो जो कौशल बढाये जायें, ज्ञान के जो जो क्षेत्र वहां बच्चों तक लाये जायें, वह अलग-अलग न होकर संगठित हों। उसी तरह से आपस में बंधे हो।" दैनंदिन ऐहिक-व्यावहारिक जगण्याची समग्रता व एकात्मता शिक्षणातही प्रतिबिंबित झालेली आपणास गांधींच्या दक्षिण आफ्रिकेतील शिक्षण-प्रयोगात आढळून येते.

बुनियाद म्हणजे पाया. पाया दोन प्रकारचा असू






शकतो. सचेतन पाया आणि अचेतन पाया. इमारतीचा पाया रचला तरी त्यातून इमारत आपोआप उभी राहू शकत नाही. सचेतन वृक्षाचा पाया, म्हणजे त्याची मुळे जमिनीत भक्कमपणे जोमदारपणे रुजली की त्यातून प्राणशक्ती मिळवून वृक्ष आपोआप उभा राहतो. फिनिक्स आश्रमातील व नंतर टॉलस्टॉय फार्मवरील जीवन-शिक्षणाचा प्रत्यक्ष अनुभव घेणाऱ्या प्रभुदास गांधींच्या 'जीवन-प्रभात' या आत्मकथनपर हिंदी पुस्तकात त्यांनी या शिक्षणाचे वर्णन 'प्राणवान शिक्षा' असे केले आहे, ते यथार्थ वाटते.

मधल्या काळातला बुनियादी शिक्षणाचा इतिहास पाहूच नये, कारण त्याने बुनियादी शिक्षणाची प्रतिमा विद्रूपच झाली असे कृष्णकुमारांनी म्हटले आहे. भविष्यकाळात बुनियादी शिक्षणाचा प्रयोग करावयाचा झाला तर त्या प्रयोगाची ठळक वैशिष्ट्ये काय राहतील, हा प्रश्न विचारात घेऊ या, असे त्यांनी म्हटले आहे.

कोणत्याही शैक्षणिक विचारप्रणालीची परीक्षा करण्यासाठी चार घटकांचा विचार तिने कसा केला आहे ते समजून घेणे महत्त्वाचे आहे. बालक, शिक्षक, स्थानीय परिवेश (पर्यावरण) आणि अभ्यासविषय, हे ते चार घटक वा 'कोपरे' होत, असे प्रख्यात शिक्षणशास्त्री जॉन ड्युई यांना अनुसरून कृष्णकुमार म्हणतात.

कृष्णकुमार म्हणतात की, आधुनिक मानस-शास्त्राने बालकाचे एक प्रारूप प्रमाणित केले आहे. हे प्रारूप स्थलकाल निरपेक्ष, वैश्विक (युनिव्हर्सल) आहे असा दावा आहे. बालकाची जन्मजात स्वभावप्रकृती काय असते याविषयी जी मांडणी केली गेली आहे तिच्यावर फ्रेंच शिक्षणशास्त्री व तत्त्वज्ञ रूसो यांच्या विचारांचा खोलवर प्रभाव आहे. बालक निरागस असते, ते सर्व प्रकारच्या वाईट प्रवृत्तींपासून मुक्त असते; निरागस, मुक्त व सुष्ट ही बालकाची मूळ स्वभावप्रकृती असते; प्रौढ बनण्याच्या ओघात, समाजाचा एक जबाबदार नागरिक / सभासद बनण्या-साठी ज्या प्रक्रियेमधून हरेकास जावे लागते त्या प्रक्रियेमुळे बालकाची निरागसता संपुष्टात येते, ते बंधनात अडकते, आणि त्याच्या ठायी दुष्ट, अनिष्ट वृत्ती-सवयी-वर्तन यांचा शिरकाव होतो, अशी ही थोडक्यात मांडणी आहे.

प्रत्येक बालक एक दिवस अपरिहार्यपणे प्रौढ बनणारच असते. निरागसता, उन्मुक्तता व सुष्टता या गोष्टी गमवाव्या लागणारच असतात. याला नाइलाज आहे. पण म्हणूनच, 'बालका' च्या अवस्थेत असताना त्याला प्रौढ व्यवहारी जगाच्या आघातांपासून संरक्षित व पवित्र राखण्यावर आधुनिक शिक्षण-विचारात खूप भर दिलेला आढळतो, असे कृष्णकुमार म्हणतात. बालक आणि प्रौढ यांच्यात एक विरोध आहे. तो निरागसता, उन्मुक्तता व सुष्टता यांवरूनच आहे. जबाबदारी असण्या व नसण्यावरून आहे. कृष्णकुमार म्हणतात, "बच्चा उस प्राणी का नाम है जो एकदम स्वतंत्र हो। स्वतंत्र यानी इतना ज्यादा आजाद कि वह किसी भी जिम्मेदारी से दूर हो, यानी जिम्मेदारी और बचपन इन दोनों के बीच अंतर्विरोध है।" आता, प्रत्येक मुलाला एका टप्प्यावर प्रौढांच्या व्यवहारी जगात यशस्वीपणे स्वतःची सामावणूक करून घेण्याचे, स्वतःसाठी एक भूमिका, स्थान व व्यवसाय निवडण्याचे, नागरिक बनण्याचे काम पार पाडावयाचे असते हे पायाभूत वास्तव आहे. शिक्षणाचे एक मुख्य कार्य मुलांचे 'सामाजिकीकरण' करणे हे असते. समाजाच्या संदर्भात कोणतीही जबाबदारी नसलेला, या अर्थाने स्वतंत्र व निरागस बालकाला ठाकून-ठोकून समाजाचा सभासद बनविण्याचे काम टाळता येत नाहीच. हे वास्तव नाकारता येत नाही, म्हणूनच बालकाला जितका जास्त काळ स्वतःची निरागसता, स्व-तंत्रता जपता व राखता येईल तितकी त्याला सवड देण्यावर आधुनिककालीन बाल-शिक्षणशास्त्रात भर दिला गेला आहे. 'बालकांच्या हक्कांचा जाहीरनामा' ही गोष्ट या विचार-प्रणालीचीच एक स्वाभाविक, अटळ परिणती आहे. पण ते बालक आहे तोवर त्याला त्याचे निरागस, स्वच्छंद स्वतंत्र अस्तित्व जगू–अनुभवू द्या, त्याला आनंदाने, त्याच्या स्वाभाविक ऊर्मी व कल यांनुसार वाढू द्या, खेळू–बागडू द्या, आत्मविष्कार करू द्या, क्षमता व कौशल्ये आत्मसात करू द्या, ही भूमिका सर्वमान्य आहे. समाजजीवनाचा व व्यवस्थेचा एक सभासद बनण्याच्या ओझ्यापासून, जबाबदारीपासून त्याला संरक्षित व मुक्त ठेवा, असे आग्रहपूर्वक म्हणणे आहे. शाळा ही अशी जागा असली पाहिजे जिथे बालक संरक्षित, 'पवित्र' व मुक्त असेल. या कारणाने, बालक असेतोवर तरी, सर्व मुले शाळेत जावीत, बालक म्हणून त्यांना स्वतःला हवे तसे घडविता व अभिव्यक्त करता यावे, हा आदर्श मानला गेला आहे. कृष्णकुमार म्हणतात, "...हमारे मन में यह छवि बनी हुई है कि बचपन तो वह है जिसमें जिम्मेदारी नहीं हो, यह तो






खेलने-खाने का, उन्मुक्त होने का वक्त है। यह तो ऐसा वक्त है जब हम सब तरह खोये हुए हों।"

शिक्षणाचे एक कार्य मुलाला समाजात जगण्यास लायक बनविण्याचे ('सोशलायझेशन') आहे. आधुनिक भूमिकेनुसार, प्रथमतः बालकाला बालक म्हणून संरक्षित अवकाश उत्पन्न करून देण्याचे, आणि नंतर एका समाजव्यवस्थेच्या साच्यात ओतण्याचे अशी दोन परस्पर विसंवादी कामे शिक्षणाद्वारे पार पाडावयाची अशी धारणा आहे. कृष्णकुमार म्हणतात, "इसमें बच्चे और समाज के बीच में एक टकराव है, बडे एवं बच्चे होने के बीच में टकराव है और इस टकराव को यथासंभव संभालते हुए, यथासंभव इस टकराव से पैदा होनेवाली चोटों पर मरहम लगाते हुए, बच्चे को समाज में दीक्षित कर देने का काम शिक्षा को सौंपा।"

तात्पर्य असे की, मुलाचे मूलपण/बालपण जपण्या/जोपासण्यासाठी त्याला प्रौढांच्या व्यवहारी जगापासून संरक्षित राखणे, मुलावर कोणतीही जबाबदारी, विशेषतः जीवनोपयोगी उत्पादक असे काम करण्यातील सहभागाच्या स्वरूपातील जबाबदारी न येईल याविषयी कटाक्ष बाळगणे, त्याला स्वच्छंद व स्वतंत्र वागण्यास अवसर देणे हा आधुनिक भूमिकेनुसार बालकेंद्री शिक्षणाचा गाभा म्हणता येईल.

कृष्णकुमार असे म्हणतात, "बुनियादी शिक्षा के प्रस्ताव में इन सभी विचारोंका व्यतिक्रम निहित है। ...यह प्रस्ताव बच्चे और बडे के बीच में द्वैत स्वीकार नहीं करता। ...खास तौर से जिस मुद्दे को लेकर सबसे ज्यादा झंझट बुनियादी शिक्षा का नाम सुनते ही शुरू हो जाती है, वो झंझट है जिम्मेदारी। और खास तौर से किसी चीज को इस तरह से बनाना, जिसका समाज में कोई मूल्य हो, कोई मूल्य समाज के अर्थतंत्र में आंका जा सके, इस तरहसे बनाकर संतुष्ट महसूस करना। इस बात की जिम्मेदारी को बुनियादी शिक्षा के प्रस्ताव से अलग करना संभव नहीं है।"

येथे हे लक्षात घेतले पाहिजे की, गांधीजींना अभिप्रेत असलेली स्वतंत्रता आणि आधुनिक बाल-मनोवैज्ञानिक व शिक्षणशास्त्रज्ञ यांना अभिप्रेत असलेली स्वतंत्रता यांत मूलभूत फरक आहे. गांधीजींना अभिप्रेत असलेली स्व-तंत्रता म्हणजे अशी सर्व प्रकारच्या जबाबदारीतून मुक्ती नव्हे; तर स्वावलंबन आणि आत्मनिर्भरतेमुळे निर्माण होणारी आत्मविश्वासदर्शक स्व-तंत्रता होय.

हातांनी करायच्या कामाची बालकाला जात्याच आवड असते. रोजच्या जीवनात आपल्या व शेजारपाजाऱ्यांच्या घरात व परिसरात जी कामे चाललेली असतात ती करून पहावीत असे मुलांना स्वाभाविकपणे वाटते. त्यासाठी ती धडपडत असतात. यापैकी अनेक कामे जबाबदारीचे भान बाळगून करायला मुलाला आवडते. ते काम उपयोगी पडले, ते उत्पादक असले तर मुलालाही जास्त समाधान वाटते, आत्मगौरव वाटतो. बुनियादी शिक्षणाचे तत्त्वच हे आहे की लहान मुलांना त्यांना झेपेल इतक्या प्रमाणात, रुचेल अशा स्वरूपात अशी विविध कामे जबाबदारीने करण्यात मोठ्यांबरोबर सहभागी होण्यास पूर्ण प्रोत्साहन व अवसर द्यावा. शिक्षणाची ही सर्वांत सहज, प्रभावी व कार्यक्षम रीत आहे.

कृष्णकुमारांनी एक महत्त्वाचा मुद्दा या ठिकाणी मांडला आहे : स्वतंत्र, स्वच्छंद, उन्मुक्त बालकाचे रूपांतर वयात येत असण्याच्या टप्प्यावर एका पाळीव प्राण्यात जणू करावयाचे असते अशी धारणा आढळते. हे काम त्या बालकाला चुचकारत, त्याची अनुमती घेत, त्याला सुसह्य होईल अशा पद्धतीने, शिक्षेचा धाक व बक्षिशीची लालूच दाखवून, कुशलतेने पार पाडून त्याला समाजाचा प्रौढ सभासद बनविण्याचे काम शिक्षणाद्वारे पार पाडावयाचे ही धारणा. बुनियादी शिक्षणाची धारणा अगदी वेगळी आहे. बालक ज्या समूहात लहानाचे मोठे होते त्या समूहाच्या दैनंदिन जीवनात शिकणे व जबाबदारीने कामे करणे यातील भेद मिटवून त्याच्या परीने मूल सहभागी होते, तेव्हा बी मधून जसे झाड विकसित होते तसे बालक विकास पावते; त्याच्या व्यक्तिमत्वात सुप्त असलेल्या संभाव्य शक्यता मूर्त होतात.

बुनियादी शिक्षण देण्याऱ्या शाळेतला शिक्षकवर्ग दैनंदिन जीवनाशी निगडीत सर्व जीवनोपयोगी व्यावहारिक कामे – उत्पादक कार्ये, सेवेची कामे इत्यादी – करण्यात कुशल असलेला, आस्थेने मनःपूर्वक कामे करणारा, स्वावलंबी वृत्तीचा असावा लागतो. स्वतःच्या हाताने काम न करण्याच्या पांढरपेशा वृत्तीचे संस्कार झालेले शिक्षक यासाठी निरुपयोगी ठरतात. बालकांबरोबरच्या सर्वप्रकारच्या लहानमोठ्या अंगमेहनतीच्या व हस्तकौशल्याच्या कामांमध्ये प्रत्यक्ष सहभाग देणारा शिक्षकवर्ग या शाळांमधून अपेक्षित

असतो. शिक्षकाची जवाबदारी केवळ विशिष्ट विषयापुरती, कामापुरती वा कौशल्यापुरती असून भागत नाही. मुलांचे भावविश्व प्रफुल्लित ठेवण्यासाठी, तसेच व्यापक अर्थाने त्यांना आपल्या नैतिक जबाबदारीसंबंधी जागृत करण्यासाठी शिक्षकाचे ठायी मातेची ममता व पित्याची शिस्त या दोन्हींचा सुरेख संगम झालेला असला पाहिजे. शिक्षक स्वतःही नैतिक निष्ठा बाळगणारे, सदाचरणी हवेत. टॉलस्टाय फार्मवर आणि फिनिक्स आश्रमात स्वतः गांधीजी, कॅलनबॅक, मगनलाल, पोलाक यांसारखे वरील दृष्टीने सर्वथैव आदर्श शिक्षक मुलांना लाभले होते. म्हणूनच ते शिक्षण 'प्राणवान शिक्षण' या दर्जाला पोचू शकले.

कृष्णकुमार म्हणतात की ग्रामीण भागातल्या (वा शहरातल्याही) किती शाळांमध्ये पिण्याच्या पाण्याची, मुतारी-शौचालयाची, खडू-फळ्याची अशा अगदी पायाभूत प्राथमिक साधनांची/ सोयींची अनुपलब्धता आहे यांचे झालेले अभ्यास उपलब्ध आहेत. ही स्थिती असेही सांगते की या शाळांमधल्या शिक्षकांच्या ठायी बुनियादी शिक्षणाची दृष्टी नाही; साऱ्या शिक्षणव्यवस्थेमध्येच या दृष्टीचा अभाव आहे. एरवी यांपैकी बहुतेक गोष्टींचा अभाव गावकरी व शाळेतील मुले यांचा अभिक्रम, कौशल्य, श्रम आणि स्थानिक साहित्य यांच्या एकत्र येण्यामधून दूर होऊ शकतो. कृष्णकुमारांनी म्हटले आहे की ज्या ग्रामीण वा शहरी परिसरात शाळा असेल त्या परिसरातल्या जीवनातल्या कमतरता भरून काढणे, अनिष्ट प्रथा मोडून काढणे, समाजाची शक्ती व कुशलता वाढविणे, स्वावलंबी कर्मयोगी वृत्ती जोपासणे यासाठी अध्यापक व विद्यार्थी यांचा जागृत सहभाग हे बुनियादी शिक्षणाचे वैशिष्ट्यच असते. "उन सभी उपक्रमों में पहल के, स्वावलंबन के, अपनी साधन-संपन्नता के प्रतीक बुनियादी शिक्षा के विचार में निश्चित रूप में निहित हैं।"

शिक्षकाच्या प्रशिक्षणात विषय कसे शिकवावयाचे यावरच भर दिला जातो. विद्यार्थ्यांचे एक जीवनही शाळेत व शाळेबाहेर चाललेले आहे, याची दखल न घेण्याची भूमिका आढळते. शिक्षक फक्त विषय-शिक्षक असतो. मुलगा/मुलगी शाळेत येऊन पोचल्यावर, वर्गात आल्यावर सोपवलेला विषय शिकवणे एवढेच तो त्याचे काम मानतो. कृष्णकुमारांनी दिल्लीला शाळेची बस यमुना नदीत कोसळून अनेकानेक मुलांचा मृत्यू ओढवला, त्या दुर्घटनेचे उदाहरण दिले आहे. ज्या शाळेची ती मुले होती त्या शाळेचे मुख्याध्यापक व शिक्षक यांनी, शाळेची वेळ होऊन गेली तरी, अमूक बसने येणारी मुले अजून कशी शाळेत पोचली नाहीत बरे, अशी चौकशी करणे तर त्यांचे काम मानले नाहीच; पण दुर्घटनेचे वृत्त पोचल्यावरही वर्ग नेहमीप्रमाणे चालू ठेवण्याचीच भूमिका घेतली. त्यांचे विद्यार्थी-विद्यार्थीनी बुडून मेली तरी आपले त्यात काही कर्तव्य व जबाबदारी नाही, असेच शिक्षक आग्रहाने म्हणत राहिले; त्या विद्यार्थ्यांचे पालक आपण थोडेच आहोत, ही भूमिका. शेवटी शाळेतल्या मोठ्या वयाच्या विद्यार्थ्यांनीच शाळा बंद पाडली. इतरही शाळांत ते पोचले आणि झाल्या घटनेसंदर्भातले त्यांचे सहविद्यार्थी म्हणून असलेले कर्तव्य त्यांनी पार पाडले. बुनियादी शाळेतील शिक्षक मुलांचे आपण माता-पिता आहोत ही वृत्ती बाळगणारे असतील.

आता राहिले स्थानीय परिसर व विषय हे दोन घटक वा कोपरे. शाळेत शिकवले जाणारे विषय, त्या विषयांचा अभ्यासक्रम, विषय शिकविण्याची पद्धती यांचा स्थानीय परिसराशी संबंध नसावा हा कटाक्ष आहे. विषय स्वतंत्र आहे व तो सर्वत्र एकाच प्रकारे शिकविला गेला पाहिजे अशी मान्यता आहे. मराठी भाषिक समाज घ्या. भौगोलिक-सांस्कृतिकदृष्ट्या पुष्कळ वैविध्य आहे. महाराष्ट्राच्या काही भागांत आदिवासी लोकांचे पूर्वापार वास्तव्य आहे. पण आजचं धोरण असे की, महाराष्ट्र राज्याच्या कानाकोपऱ्यातल्या सर्व शाळांमध्ये एकच एक पाठ्यपुस्तक वापरले जाते. स्थानिक पर्यावरण, स्थानिक समाजाच्या गरजा यांची पूर्ण उपेक्षा करून सर्वांसाठी एक अभ्यासक्रम तयार केला जातो. सर्व शाळांमध्ये विषय तेच, अभ्यासक्रम तोच व पाठ्यपुस्तकेही तीच. कृष्णकुमार लिहितात, "शिक्षक होने का अर्थ है, उन कौशलों का प्रयोग करना जिनकी मदद से दी गयी विषयवस्तु को बच्चों को ग्राह्य बनाया जा सके। उस विषयवस्तु को जन्म देना शिक्षक का कार्य नहीं है।" बुनियादी शिक्षणपद्धतीत स्थानीय परिसरातील, पूर्वापार चालत आलेले जे जीवन असते त्या जीवनाला अधिक सशक्त व निरोगी बनविण्यासाठी, ते संवर्धित करण्यासाठी आवश्यक व उपयोगी विषयांची निवड, त्यांच्या अभ्यासक्रमाची निश्चिती, व तो राबविण्यासाठी वापरावयाची 'पाठ्यपुस्तके' व रीती या

अनुक्रमणिका

सर्व गोष्टी शिक्षकानं ठरवावयाच्या असतात. कारण त्यालाच स्थानिक परिसर, स्थानिक समाजजीवन, विद्यार्थ्यांची गरज यांची सर्वाधिक सम्यक् समज असणार व असायला हवी. आजचे शिक्षण हे स्थानिक परिसर, समाजजीवन, लोकांच्या जीवनाविषयक गरजा, त्यांच्यापाशी असलेले ज्ञान यांना विन्मुख राहूनच विचार करते.

आधुनिकीकरणाच्या जमान्यात शिक्षणपद्धती असे गृहीत धरते की पहिल्यापासून चालत आलेले ज्ञान, कौशल्य, उद्योग, रीतिरिवाज, मूल्ये, ध्येये ही कुचकामी आहेत. त्या सान्या गोष्टी मोडीत काढून नव्याच गोष्टींचे शिक्षण लोकांना, विशेपतः ग्रामीण भागांतील, निम्नस्तरावरील लोकांना द्यावयाचे आहे. जुन्या रुजलेल्या गोष्टी उखडून टाकावयाच्या आहेत. कृष्णकुमार लिहितात, "वहुतसे लोग तो सामाजिक परिवेश से इतना परेशान हो जाते हैं कि अपने वच्चों को दूर भेज देते हैं कि इस परिवेश में तो वो विगड जायेंगे। ...भारत सरकार ने जो नवोदय स्कूल खोले है, उनमें भी ये परिकल्पना है कि वच्चे को उनके परिवेश से निकालकर ही उनकी अच्छी शिक्षा संभव है।"

विपयवस्तूच्या संदर्भात असे म्हणता येईल की मूलोद्योगी शिक्षणात शिक्षणाचा पाया उद्योगकेंद्रित असतो. विशिष्ट उद्योग आणि कौशल्ये यांच्या अवतीभवती इतिहास, भूगोल, भाषा, गणित, विज्ञान या विपयांची गुंफण करून ते मुलांच्या प्रत्यक्ष अनुभूतीशी जोडले जातात. त्यामुळे हे सर्व विपय केवळ पुस्तकी, वोजारूप राहत नाहीत आणि एकंदरीतच मुलांची ज्ञानग्रहणक्षमता पण वाढीला लागते. शिक्षणाच्या केंद्रस्थानी असणारा विशिष्ट उद्योग किंवा कौशल्य त्या परिसरातूनच निवडलेला पारंपारिक व्यवसाय असल्यामुळे, वालकांना व शिक्षकांना तो परका वाटत नाही. स्थानीय समाजाच्या दृष्टीनेही तो उपयोगी ठरतो. आपल्याच परिसरातील उद्योगाचे शिक्षण घ्यावयाचे असल्यामुळे शिकणारा मुलगा व न शिकलेले आईवाप यांच्यामध्ये अनुल्लंघनीय दरी निर्माण होत नाही. असा विपय मातृभापेतूनच शिकणे सोयीचे असल्यामुळे शैक्षणिक माध्यमाची भाषा व घरची भापा यातील फरकामुळे मुलगा स्व-समाजाला दुरावण्याचे कारण राहत नाही. ज्ञानभाषा व मातृभापा एकच असल्यामुळे विपयाचे आकलनही सुलभ होते.

आधुनिक शिक्षणपद्धतीचा दृष्टिकोन आणि आता कालवाह्य ठरवल्या गेलेल्या वुनियादी शिक्षणपद्धतीचा दृष्टिकोन यातून निवाडा करताना खालील मुद्दे विचारात घ्यावे लागतील -

१. आधुनिक दृष्टिकोनानुसार भारतातील पारंपरिक कलाकौशल्यांची वहुमोल ठेव जतन करणाऱ्या, ती जोपासणाऱ्या कारागिरांना, केवळ ते निरक्षर आहेत म्हणून, अशिक्षित मानले जाते. निरक्षरतेची समस्या निर्माण करणारे मागास लोक म्हणून त्यांची अवहेलना केली जाते. पण वास्तविक जीवनोपयोगी कोणतेच अंगमेहनतीचे काम किंवा हस्तकौशल्य अवगत नसलेले, पण केवळ पांढरपेशी लिखापढी करू शकणारे यांना आपण 'शिक्षित' म्हणून प्रतिष्ठित वर्गात दाखल केल्यामुळेच खरी राष्ट्रीय समस्या निर्माण झाली आहे.

२. आधुनिक शैक्षणिक विचाराप्रमाणे, शाळांमध्ये मुलांकडून उत्पादक श्रम करवून घेणे म्हणजे प्रच्छन्नरित्या वालमजुरीला उत्तेजन देणे होय. प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक करून वालमजुरीची अनिष्ट प्रथा हटविण्याची गोष्ट आधुनिक शिक्षणपद्धतीमधून केली जाते. (वास्तविक गरीव पालकांच्या मुलांना मजवूरीने कामावर जावे लागते, त्यामुळे सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाच्या धोरणाची प्रत्यक्षात अंमलवजावणी होऊ शकत नाही, ही खरी गोची आहे.) आर्थिक कमाईसाठी मजवूरीने काम करणारे वालकामगार आणि योग्य प्रेरणा व मार्गदर्शन मिळाल्यामुळे हौसेने उत्पादक श्रम करणारे आठ-दहा वर्षांचे वालविद्यार्थी यात मूलभूत फरक आहे. वालकामगारांना पावलोपावली अपमानित होऊन जी-हुजूरी वृत्तीने जगत आपले काम करावे लागते. त्यांना कामावर लावणारा मालक-वर्ग केवळ स्वतःच्या खाजगी लाभाचा संकुचित विचार करत असल्यमुळे, फटाके व इतर दिवाळीचे शोभेचे दारूसामान निर्माण करण्यासारख्या धोकादायक कामासाठी अल्प वेतनावर सहजी मिळू शकणारे वाल-कामगार पसंत केले जातात. उलटपक्षी वालकांना स्व-निर्मितीचा आनंद मिळावा, त्यांचा आत्मविश्वास वाढून त्यांना आत्मसन्मानाची व स्वतंत्रतेची अनुभूती यावी असा प्रयत्न वुनियादी शिक्षणपद्धतीत असतो.

३. वुनियादी शिक्षणपद्धती स्थानीयतेवर भर






देणारी असल्यामुळे ज्ञानसंपादनाचे क्षितिज मर्यादित करते, तर आधुनिक शिक्षणपद्धती संगणकावर भर देणारी, म्हणजे इंटरनेटद्वारा अद्ययावत् जागतिक ज्ञान विद्यार्थ्यांपर्यंत पोचवून त्यांचे ज्ञानाचे क्षितिज विस्तारणारी आहे असा दावा केला जातो. वास्तविक इंटरनेटद्वारा उपलब्ध झालेला माहितीचा वर्षाव म्हणजे खरे ज्ञान नव्हे. या माहितीचे ज्ञानात रूपांतर होण्यासाठी विद्यार्थ्यांची आकलनशक्ती, ग्रहणक्षमता विकसित व्हावी लागते. वुनियादी शिक्षणपद्धतीत प्रत्यक्ष निरीक्षणाद्वारे, अनुभवाद्वारे शिकण्याची संधी मुलांना मिळते व त्यामुळे स्थानीय जगापलीकडील मोठ्या जगामधीलही ज्ञान ग्रहण करण्याची क्षमता त्यांच्यात निर्माण होते. कारण निरीक्षण, अनुभव, प्रचीती हा कोणतेही ज्ञान ग्रहण करण्यासाठी आवश्यक असलेला पाया पक्का झालेला असतो. त्यामुळे ते ज्ञान ही मुले सहज पेलू शकतात. त्यांना ते भारभूत होत नाही. अर्थात् काय घ्यावे व काय टाकावे हा नीरक्षीरविवेकही त्यांच्यात तयार झालेला असतो. आधुनिक शैक्षणिक पद्धतीतील विद्यार्थ्यांचा केवळ पुस्तकी माहितीवर जास्त भर असल्यामुळे इंटरनेटद्वारा उपलब्ध झालेल्या माहितीच्या सागरात तो भांवावून जातो. ही माहिती त्याला भारभूत होते. केवळ परीक्षेसाठी तो ती कशीवशी डोक्यात कोंवतो. ते ज्ञान त्याने पचवलेले नसल्यामुळे परीक्षेनंतर तो ते सर्व विसरून जातो.

४. आधुनिक शिक्षणपद्धतीत सर्व प्रकारच्या संधी सर्वांना खुल्या असल्याचा फक्त आभासच निर्माण केला जातो. प्रत्यक्षात ह्या संधी प्राप्त करण्याच्या शर्यतीत पराभूत होणाऱ्यांची संख्याच प्रचंड असते. जिंकणाऱ्यांची संख्या हाताच्या वोटांवर मोजण्याइतकीच असते. समान संधीच्या वल्गना केल्या जातात, पण प्रत्यक्ष तसा प्रत्यय येत नाही. परीक्षांमधील अपयशामुळे वैफल्याची, नैराश्याची, निरुपायाची भावना प्रचंड प्रमाणात फैलते. दहावी व वारावीच्या परीक्षांमधून मुलांची कशी छाटणी होते याचे बोलके उदाहरण कृष्णकुमार यांनी दिले आहे. १९९० मध्ये भारतभरच्या दहावीच्या परीक्षेला एकूण ८८ लाख विद्यार्थी वसले होते. दोन वर्षांनंतर त्यातून वारावी उत्तीर्ण होऊन वाहेर पडणाऱ्यांची संख्या फक्त १७.७ लाख होती. नापास होणाऱ्यांना अशी जाणीव करून दिली जाते की तुमच्यावर दुसऱ्या कोणी अन्याय केलेला नाही; तुम्ही स्वतःच स्वतःवर अन्याय केलेला आहे; पुढच्या शिक्षणाची संधी घ्यायला तुम्हीच स्वतःला नालायक वनवून घेतले आहे. वुनियादी शिक्षण-पद्धतीतील निकप सफलता/विफलता असा नसून कुशलता हा आहे. कृष्णकुमार या संदर्भात म्हणतात, "यें चीज मेरे हाथों से वनी हुई है इस वात का संतोप इस विचार में निहित है। उसमें अच्छाइयां और वुराईया हैं। ये तो हर तरफ होती हैं। ये चीज मैंने वनाई है, कच्ची है- पक्की है, जो भी हो, पर मेरी यह एक प्रति-छवि है।" थोडक्यात, वुनियादी शिक्षणपद्धतीमध्ये निर्मितीचा आनंद मिळविण्यात प्रत्येक जण सफल होत असतो. आपल्या कृतीमधून आपलीच प्रतिमा आपण न्याहाळत असल्याचा निर्मळ आनंद लाभतो. प्रत्येकाच्या निर्मितीमध्ये गुण-दोप असल्यामुळे कुशलता वाढविण्यासाठी प्रत्येकाला मार्गदर्शन होतच राहते, पण कोणीच या व्यवस्थेमध्ये पूर्णपणे असफल म्हणून वाहेर फेकला जात नाही.

५. आजच्या संगणकाच्या युगात विश्वपूंजीवादावर आधारलेले 'विश्वग्राम' (global village) ही अशीच एक घोर फसवणूक आहे. आत्यंतिक विपमता व आत्यंतिक अन्याय याचे आजचे विश्वग्राम हे द्योतक आहे. विश्वग्राममधील विपमता व अन्यायाच्या संदर्भात कृष्णकुमार म्हणतात, "इस विश्वग्राम में एक देश की मुद्रा हमारे देश की मुद्रा से ७० गुना अधिक है। और श्रम के मूल्यांकन के वीच इतना वडा फासला है कि एक आदमी के सौ घंटों का श्रम, दूसरेवाले के एक मिनिट के श्रम के वरावर है।" वुनियादी शिक्षणपद्धतीला अभिप्रेत असलेले विश्वग्राम विश्ववंधुत्वावर आधारलेले असते. 'वसुधैव कुटुंवकम्' 'यत्र विश्वं भवत्येकनीडम्' 'सर्वेऽत्र सुखिनः सन्तु' असे घरट्याचा उवदारपणा देणारे, कौटुंविक जिव्हाळा निर्माण करणारे, मूठभर व्यक्तींनाच नव्हे, तर सर्व व्यक्तींना सुखकारक व हितकारक असे ते असते.

गांधीजींचे समग्र जीवन व समग्र गांधी-विचारच वसाहतवादावर आधारलेल्या दुनियेचा निपेध करतात. प्रचलित शिक्षणपद्धती आजच्या 'जी-हुजूरी'च्या आणि 'शर्यती'च्या दुनियेशी जुळवून घेणारी आहे. आजच्या शिक्षणाद्वारे नवसमाज-निर्मिती होऊ शकणार नाही. गांधीजीप्रणित नई तालीम प्रचलित दुनियेतील दोपांपुढे मान तुकवण्याऐवजी त्याविषयी असहमती दाखवून त्याविरुद्ध

अनुक्रमणिका

सविनय वंडखोरी करायला शिकवणारी आहे.

विश्वग्रामच्या आजच्या युगात स्थानीय ज्ञानाची महती सांगणे मूर्खपणाचे मानले जाते. विश्व-पूंजीवाद आज अनेक माध्यमांद्वारे, राजनैतिक-आर्थिक-सांस्कृतिक संदर्भाद्वारे स्थानीय जाणीव वोथट करण्याचा, संपुष्टात आणण्याचा प्रयत्न करीत आहे. जणू काही स्थानीयतेविरुद्धचे वकीलपत्रच त्याने घेतले आहे. इतिहासक्रमामध्ये स्थानीय ज्ञानावद्दलची अरुची, नावड वसाहतवादी संस्कृतीवरोवर निर्माण झाली आहे.

आधुनिक शिक्षणाचे मर्म उलगडून दाखविणारी एक खरी हकीकत कृष्णकुमारांनी सांगितली आहे. कमारा ले या आफ्रिकी लेखकाने स्वतःचीच गोष्ट सांगितली आहे. फ्रान्समध्ये उच्चतम शिक्षण घेण्यासाठी त्यांची स्पर्धा परीक्षेद्वारे निवड होते तेव्हा त्यांचा गौरव करून त्यांना निरोप देण्यासाठी त्यांच्या खेडेगावी कार्यक्रम आयाजित केलेला असतो. तो कार्यक्रम आटोपल्यावर ते सर्व आप्तांचा निरोप घेतात तेव्हा, आपली आई या घोळक्यात नाही, असे त्यांच्या लक्षात येते. आईचा शोध घेतात तेव्हा, अखेरीस, आई झोपडीत अंधारात अश्रू ढाळत वसलेली सापडते. तिच्या जिवाच्या आकांताने रडण्याचे कारण खोदून खोदून विचारल्यावर आई म्हणते, "तुझ्या वडिलांनी तुला येथल्या प्राथमिक शाळेत घातलं तेव्हाच मी त्यांना विनवीत होते की, नका पाठवू या शाळेत आपल्या मुलाला. एकदा शाळेची पायरी तो चढला की आपण, आपला गाव, आपला समाज त्याला मुकणार; हे शिक्षण घेतलेला कोणीही आपल्या उपयोगाचा राहत नाही; तो हे जग कायमचे सोडून वाहेरच्या जगात जाणार, त्या जगाचा होणार. तुझ्या वडिलांनी माझं ऐकलं नाही. तुला शाळेत घातलं. त्याच क्षणी, आजचा दिवसही पहावा लागणार हे मला माहीत होतं. तू जाणार हे विधिलिखितच होतं." असे म्हणून ती पुन्हा दुःखातिशयाने रडू लागली.

ही प्रक्रिया घडत असलेली आपण भारतात प्रत्यही व सर्व थरांवर अनुभवीत आहोत.

भारतीय अभिजन तर आता आपल्या मुलांना घरापासून, परिसरापासून दूर काढून अद्ययावत सोयींनी सुसज्ज अशा शाळांमध्ये 'चांगल्या' शिक्षणासाठी पाठविण्या-विषयी आग्रही आहेत. त्यांच्या मते सुशिक्षित होणे म्हणजे आपल्या अवतीभवतीचा तळागाळात रुतलेला समाज तसाच ठेवून आपण स्वतः, कमलपुष्पाप्रमाणे, त्या 'गाळा'चा शिंतोडाही आपल्यावर पडू न देता, अलिप्तपणे, दिमाखाने मिरवणे. ही कल्पनाच गांधीजींना घातक वाटत होती. स्वतःच्या परिसराच्या व समाजाच्या भल्यासाठी आपल्या शिक्षणाचा उपयोग करणे हा त्यांना आद्य नीतिधर्म वाटत होता.

कृष्णकुमार म्हणतात, "वुनियादी शिक्षा के विचार में ये वहुत वडी वौद्धिक चुनौती निहित है कि उसकी परिभाषा, उसमें निहित ज्ञान की परिभाषा स्थानीय परिवेश से काटकर नहीं की जा सकती। वुनियादी शिक्षा का विचार किसी संदर्भ में वुनियादी है तो वह समाज-रचना के संदर्भ में ही है। व्यक्तित्व के संदर्भ में ही नहीं, समाज की पुनर्रचना के संदर्भ में भी है।" आजच्या दुनियेत जगण्यासाठी लायक वनविणारी आजची शिक्षण-पद्धती आहे. नयी तालीम नव्या दुनियेची वुनियाद घालण्यासाठी आहे.

थोडक्यात, हे जग आहे तसे स्वीकारण्यास मी मजवूर नाही; उलट माझ्या योग्य जीवनशैलीने त्यामध्ये वदल घडवून आणण्यास माझ्यापरीने मी प्रयत्नशील राहीन; ही दुनिया खऱ्याची नाही म्हणून मी खोटेपणाने वागण्याऐवजी माझ्या खरेपणाच्या वागणुकीमुळे खोटेपणाचे दूषित वातावरण निवळवण्याचा प्रयत्न करीन, अशी वृत्ती वुनियादी शिक्षणपद्धती जोपासते. आजच्या दुनियेचा आक्रमक निषेध नको, पण आजच्या जगातील 'अमानुप वागणुकी'चा आपल्या माणुसकीच्या सहजवृत्तीने विधायक आणि सविनय निषेध वुनियादी शिक्षणपद्धतीत नक्कीच अभिप्रेत आहे.

♦♦♦

स्वातंत्र्य संपादनानंतर एकदा सर्व राज्यांचे शिक्षणमंत्री विनोवांना भेटावयास पवनारला गेले.

भारतात कोणत्या पद्धतीचे शिक्षण द्यावे या विषयींची चर्चा त्यांना विनोबांशी करावयाची होती.

विनोवा म्हणाले,

'मी एका वाक्यात माझे उत्तर तुम्हाला सांगतो. तुमच्या स्वतःच्या मुलांना ज्या पद्धतीचे शिक्षण मिळावे असे तुम्हाला वाटते तसे शिक्षण भारतात सर्व मुलांना कसे देता येईल याचा विचार करा. याहून अधिक मार्गदर्शनाचे कारण नाही.'








# जे० कृष्णमूर्ती यांचे शिक्षणविषयक विचार

देवदत्त दाभोलकर

असीम आत्मविकास हेच कोणत्याही व्यक्तीचे ध्येय असले पाहिजे, प्रत्येकाने पूर्णपणे विकसितप्रज्ञ व्हावे, (स्थितप्रज्ञाचा आदर्श तितकासा स्पष्टपणे जे. कृष्णमूर्ति पुढे मांडीत नाहीत) त्यांत त्या त्या व्यक्तीचे आणि समाजाचेही खरे कल्याण आहे, या विकासाच्या आड येणारी सर्व लौकिक बंधने आपण झुगारून दिली पाहिजेत, हाच जे. कृष्णमूर्तींच्या प्रवचनांतून व लेखनातून वारंवार आढळून येणारा विचार प्रस्तुत पुस्तकातही पुन्हा आग्रहाने प्रतिपादण्यात आलेला आहे. आजच्या शिक्षणाची मोठ्यात मोठी झेप देखील या विचाराच्या बाह्यकक्षेलाही स्पर्श करू शकत नाही. असा स्पर्श करावा ही आकांक्षाही आजच्या शैक्षणिक प्रयत्नात नाही. यामुळे जे. कृष्णमूर्तींचे विचार आगळे आहेत म्हणूनच काहीशा प्रेमादराने आपल्याला पुस्तक खाली ठेवता आले असते. परंतु एकूण विवेचनात आजच्या शिक्षणपद्धतीची जी विचिकत्सा जे. कृष्णमूर्ती यांनी केलेली आहे ती कोणालाही मौलिक वाटावी अशीच आहे.

जे. कृष्णमूर्ती यांची टीका कोणत्याही विशिष्ट संस्थेला किंवा देशाला उद्देशून नाही. सर्व जगातील प्रचलित शिक्षणसंस्था त्यांना अमान्य आहेत. त्यांना ठराविक चाकोरींतून जाणारे शिक्षण नको आहे. चांगुलपणा, ध्येयवाद, सदाचार ही देखील जर पढिकपणे, कर्मठ आचाराने, आग्रहाने शिकविली जात असतील तर ती त्यांना त्याज्य आहेत. आत्मप्रेरणा हीच मानवमात्राच्या आचाराचा आधार असावयास पाहिजे असे त्यांना वाटते. ही प्रेरणा जागृत व सफल कशी होईल याविषयी शिक्षणाने प्रयत्नशील असावे, परंतु या प्रेरणेच्या अभावी केवळ यान्त्रिक चांगुलपणा निर्माण करण्याच्या भरीस त्याने पडू नये असा जे. कृष्णमूर्ती यांचा आग्रह आहे. या निकषांवर जगातील आजची कोणतीही शिक्षणपद्धती किंवा कोणतेही विद्यापीठ उतरू शकत नाही, ही गोष्ट उघड आहे. शिक्षणाविषयीचा त्यांचा आदर्श त्यांच्याच शब्दांत असा आहे : "आजचे शिक्षण केवळ तान्त्रिक आहे. या शिक्षणाने बौद्धिक कसरतीत विद्यार्थी तरबेज होतो. परंतु त्याचा खरा आत्मिक विकास होत नाही. त्याची सर्वांगीण वाढ खुरटलेली, खुंटलेलीच राहते. त्याच्या सृजनशील प्रवृत्तींचा उन्मेष पहावयास मिळत नाही. खऱ्या शिक्षणाने 'सत्यं शिवं सुंदरम्' यांची प्रतीती जीवनात आणून दिली पाहिजे. व्यक्ती आणि व्यक्ती, व्यक्ती आणि समाज यांमधील संबंध सरल स्नेहमय केले पाहिजेत. जीवनाला नवीन दृष्टिकोण मिळवून दिला पाहिजे. आणि शिक्षण जीवनस्पर्शी व्हावयाचे असेल तर ते आत्मस्पर्शी (अहंकेन्द्रित नव्हे) झाले पाहिजे. खऱ्या शिक्षणाने आत्मपरिवर्तनाची प्रेरणा मिळते. ते दुराग्रही तर नसतेच परंतु सदाग्रहीही पण नसते; ते सत्प्रवृत्त, निर्मल व निराग्रही असते. एखादी चांगली वाटणारी क्रांतीदेखील हट्टाने व आकसाने घडवून आणणे इष्ट नसते असा या शिक्षणाचा दृष्टिकोण आहे. दया, क्षमा, शांती, साधी राहणी, अध्यात्मवृत्ती असे दैवी गुण या शिक्षणाने अंगी बाणवले जातात. या अशा शिक्षणानेच व्यक्तीचे कल्याण व समाजाचेही कल्याण साधले जाईल."

आजच्या शिक्षणात जे. कृष्णमूर्तींना या गोष्टींचा मागमूसही आढळत नाही. आजची समाजपरिस्थिती, विद्यार्थी, शिक्षक, शिक्षणसंस्था या सर्वांवर त्यांनी आपल्या टीकेची धार चालविली आहे. टीका कटु असली तरी ती यथायोग्यच आहे याची मनोमन जाणीव सारखी राहते.

### व्यक्तिसुधारणेवर भर

या सर्व विवेचनात समाजपरिस्थिती व शिक्षण यांच्या परस्परसंबंधाचे जितके स्पष्ट विवेचन पाहिजे होते तितके केले गेलेले नाही असे मात्र वाटल्यावाचून राहत नाही. आजचे शिक्षण युद्ध, उपासमार व दैन्य यांचे जनक आहे असा आक्षेप जे. कृष्णमूर्ती घेतात. 'आत्मज्ञान' न शिकविता तंत्र-विज्ञानावर आजचे शिक्षण अधिक भर देते आणि त्यामुळे विद्यार्थीही कार्यक्षम, घासूनपुसून काढलेली रुक्ष रेखीव यंत्रे होऊनच बाहेर पडतात. (भारतात तर तितकेही साध्य होत नाही!) शिस्तीची कांचणी सारखी विद्यार्थ्यांच्यामागे लावलेली असते, त्यामुळे त्यांची आत्मप्रेरणा दडपली जाते आणि खरे शिक्षण अखेर बाजूलाच रहाते. या परिणामाला परिस्थिती पुष्कळशी जबाबदार आहे हे जे. कृष्णमूर्तींनीं स्पष्ट सांगितले आहे. भौतिक विकास हवा असेल तर उच्च प्रतीचे तंत्रविज्ञान

अनुक्रमणिका






आवश्यकच आहे. भौतिक विकास आत्मविकासाच्या आड येत असेल तर भौतिक विकास मागे ठेवूनही आत्मविकासाकडेच लक्ष पुरविले पाहिजे व समाजाने आपली आर्थिक घडी त्या दृष्टीनेच बसविली पहिजे असा स्पष्ट आग्रह मात्र जे. कृष्णमूर्ती यांनी निदान या पुस्तकात तरी कोठेही धरल्याचे आढळत नाही (ती भूमिका गांधीजी व विनोबाजी यांनी स्पष्टपणे घेतलेली आहे). परंतु हा निर्णय घेतल्याखेरीज तंत्रविज्ञानावरील भर कसा कमी करता येईल हे लक्षात येत नाही. स्वयंप्रेरणेतून स्वतंत्र विचार, नवीन मूल्ये निर्माण होतात. या नवविचारातूनच पुढे क्रांती निर्माण होते. यामुळे आपली सत्ता अबाधित रहावी असे वाटणारे वर्ग, शिक्षणपद्धतीतच स्वयंप्रेरणेची निर्मिती होणार नाही, अशी काळजी घेतात. यामुळेच सरकार व धर्म यांच्या मार्गदर्शनाने चालणारे शिक्षक यांत्रिक, शिस्तबद्ध, कार्यक्षम, परंतु स्फूर्तिशून्य होतात. पिळवणुकीवर आधारलेल्या समाज-रचनेच्या शिक्षणपद्धतीतून एवढीच अपेक्षा राखता येईल असाही एक ओझरता उल्लेख जे. कृष्णमूर्ती यांनी केला आहे. परंतु त्याचेही अधिक विवेचन त्यांनी केलेले नाही. त्यांच्या एकूण विवेचनाचा हा भाग त्यामुळे अपुरा वाटतो. समाजरचना व शिक्षणपद्धती यांचा अटळ परस्परसंबंध सिद्ध झाल्यानंतर शिक्षणपद्धतीत बदल करावयाचा झाल्यास समाजरचनेत बदल करण्यापासून सुरवात केली पाहिजे, किंवा शिक्षणपद्धतीतील कोणताही बदल समाजरचनेत बदल झाल्याखेरीज यशस्वी होऊ शकणार नाही, हे ओघानेच येते. सर्वांगीण सामाजिक क्रांती झाली की व्यक्तिमात्राचे आत्मगत परिवर्तनही आपोआपच होईल असा आजवरच्या क्रांति-कारकांचा विश्वास होता. या विश्वासावरच आजवरच्या इतिहासातील क्रांत्या घडून आल्या व आजही घडविल्या जात आहेत. परंतु एका क्रांतीतून दुसरी क्रांती निर्माण होते, एक जुलमी सत्ताधीश जाऊन दुसरा येतो, आणि जनतेचे सुख व स्वातंत्र्य ही मात्र सारखी धोक्यातच राहतात, असा अनुभव आल्यापासून अनेक विचारवंतांचा या मार्गावरचा विश्वास उडाला आहे. 'आधी कळस मग पाया रे' अशी रचना अखेर गडगडते हा इतिहासाचा दाखला आहे. यामुळे प्रथम व्यक्ती सुधारली की समाज आपोआप सुधारेल या भूमिकेप्रत आज विचारवंत आले आहेत. अशा विचारवंतांपैकीच जे. कृष्णमूर्ती हे एक आहेत. मानवेंद्रनाथ रॉय, विनोबाजी यांचीही नावे या संदर्भात सांगता येतील. कदाचित झटपट क्रांतीच्या प्रतिक्रियेचे हे दुसरे टोक असेल आणि या दोन विचारसरणीच्या व्यावहारिक समन्वयातूनच बहुधा आपल्याला आपला मार्ग काढावा लागेल. सर्वांचे परिवर्तन कसे होईल याची काळजी करीत न बसता स्वतच्या परिवर्तनापासून सुरवात करावी, त्याचे सुपरिणाम समाजात आपोआप पसरत जातील असेच व्यक्तिमात्राच्या सुधारणेवर भर देणाऱ्या विचारवंतांचे सांगणे असते. जे. कृष्णमूर्तीही त्यांच्या शैक्षणिक प्रयोगाविषयी असेच करावयास सांगतात. आपण आपले कर्तव्य करीत आहोत या व्यक्तिगत समाधानासाठी हे ठीक आहे. परंतु यातून संपूर्ण क्रांती आवश्यक त्या अवधीत पुरी होऊ शकेल काय, हा प्रश्न अखेर उरतोच. सद्भावनेवर आधारलेल्या क्रांतिकारक प्रयत्नांना अंशतः तरी सफलता मिळू शकते हे भूदानचळवळीने सिद्ध केले आहे. नवविचारांच्या लोकांना आज हा एक मोठाच दिलासा आहे.

### आजचे विद्यार्थी

आजच्या विद्यार्थ्यांचे चित्र हे जे. कृष्णमूर्ती यांनी अचूकपणे रेखाटले आहे. आपण कुणीतरी मोठे व्हावे, आपले जीवन सुखाचे जावे, आपल्याला जीवनात स्थैर्य व सुरक्षितता यांचा लाभ व्हावा अशी आजच्या विद्यार्थ्याची अपेक्षा असते व या गोष्टी साध्य होण्यासाठी लागणाऱ्या गुणांच्या जोपासनेची अपेक्षा तो व त्याचे पालक शिक्षणापासून बाळगीत असतात. जीवनातील यशापयशाच्या मोजमापानेच सर्व गोष्टींचे महत्त्व-मापन केले जाते. यशाची आशा व अपयशाची भीती याच या लोकांच्या जीवनातील प्रमुख प्रेरणा असतात. या आशा-आकांक्षांच्या हव्यासाने व्यक्तिमत्व प्रफुल्ल न होता त्याचा विकास खुरटतो. हा विद्यार्थी गतानुगतिक असतो. कोणत्याही प्रकारचे असमाधान त्याच्या ठिकाणी आढळून येत नाही. खऱ्या समाधानाप्रमाणेच खरे असमाधान हेही दुर्मिळच असते. अशा असमाधानाने अस्वस्थ असणारे काही वेचक विद्यार्थी आढळतात. असमाधानाच्याही दोन प्रतिक्रिया जे. कृष्णमूर्ती यांनी सांगितल्या आहेत. एक प्रतिक्रिया उत्कट उत्पाती स्वरूपाची असते. ही अर्थातच अनिष्ट होय. दुसरी प्रतिक्रिया आंतरिक परिवर्तनाला जन्म देते. ही प्रतिक्रियाच खऱ्या शिक्षणाला अभिप्रेत असते. परंतु या विशिष्ट प्रतिक्रियेत असमाधानाची परिणति करण्यासाठी लागणारे मार्गदर्शन करण्याची कुवत फारच थोड्या शिक्षकांच्या अंगी असते. बहुसंख्य विद्यार्थी काही काळ असमाधानाचे उदासरम्य नाटक करून अखेर परिस्थिती वाकवील त्याप्रमाणे वाकून, परिस्थितीशी झगडा होणार नाही अशाच प्रकारची आपल्या






जीवनाची घडण करतात. विद्यालयांतून मिळणारे शिक्षण हेही केवळ तंत्रविज्ञान असते. नवनिर्मितीची भूक त्यातून भागू शकत नाही; बहुधा ती निर्माणही होऊ शकत नाही. विषय पाठ होतात पण त्यांचे आकलन होत नाही. आपला आंतरिक विकास होत आहे, आपल्या जीवनाला, आपल्या आत्मप्रेरणेला साजेसा आकार आपल्या प्रयत्नांनी येत आहे असा अनुभव तर कधीच येत नाही. कारण या अनुभवाला आपल्या शिक्षणाच्या चाकोरीत वाव नाही. व्यक्तिमत्वाचा सर्वांगीण विकास (केवळ सर्वांगीण ज्ञान नव्हे) त्यामुळे घडून येऊ शकत नाही. एक यांत्रिक शिस्त विद्यार्थ्यांवर लादण्याचा प्रयत्न केला जातो. कधी कधी सोज्वळ तयार ध्येये 'रेडीमेड' कपड्यासारखी त्याच्या अंगावर चढविली जातात आणि त्याची आंतरिक स्वयंप्रेरणा मात्र दडपली जाते. शिक्षकांचे व त्याचे संबंध हार्दिक स्नेहाचे नसतात. त्यांच्याविषयी मनापासून आदर असाही त्याला वाटत नाही. दीडशे विद्यार्थ्यांच्या वर्गात आणि दोन हजार विद्यार्थ्यांच्या विद्यालयांत हे संबंध साहजिकपणेच दुरावतात. एकेक व्यक्ती म्हणून प्रत्येक विद्यार्थ्याच्या विकासाची काळजी घेतली जात नाही. तितकी सवडही होण्यासारखी नसते. तशी आवश्यकताही कोणाला भासत नाही! एका यांत्रिक परीक्षेतील गुणमानावर त्याच्या विद्यार्जनाचे मोजमाप केले जाते आणि कंगोरे पाडलेले एक यंत्राचे चाक आपले मानाचे, सुखाचे स्थिर निश्चित स्थान शोधीत बाहेरच्या जगाच्या प्रचण्ड कारखान्यात भिरभिरू लागते!

कार्यक्षमतेच्या निकषावर हा विद्यार्थी कदाचित उतरेल. परंतु व्यक्तिमत्वाच्या विकासाच्या दृष्टीने शिक्षणाने त्याला काय दिले? 'शून्य' असे जे. कृष्णमूर्तींचे उत्तर आहे आणि या उत्तरात आपल्यालाही फरक करावा असे वाटणार नाही.

### शिक्षकाचा आदर्श

शिक्षकाचा जो आदर्श जे. कृष्णमूर्ती यांनी रंगविला आहे तोही पाहण्यासारखा आहे. या शिक्षकाच्या ठिकाणी उत्कट ज्ञानपिपासा असावयास हवी तरच तो विद्यार्थ्यांची ज्ञानलालसा जागृत करू शकेल. केवळ व्यवसाय म्हणून शिक्षणक्षेत्रात शिरणारे लोक शिक्षक म्हणून निरुपयोगी आहेत. केवळ तांत्रिक ज्ञान देण्यावर समाधान मानणारे शिक्षक हे खरे शिक्षकच नव्हेत. जे. कृष्णमूर्ती लिहितात : "खरा शिक्षक केवळ मोठ-मोठ्या शिक्षणसंस्था उभारण्याचा हव्यास धरीत नाही. राजकारणात पडून राजकारणी लोकांच्या हातातील खेळणेही तो होत नाही. फार काय, एखादे ध्येय, एखादी कल्पना, श्रद्धा, आपले राष्ट्र – अशा एखाद्या गोष्टीच्या पूर्णपणे आहारी जाऊन तो आपले आत्मविकासाचे स्वातंत्र्य गमावीत नाही. त्याचे जीवन आंतरिक समृद्धीने विनटलेले असते आणि त्यामुळे त्याला जगापासून कसलीच अपेक्षा असत नाही. त्याला महत्त्वाकांक्षा नसते. सत्तेचा लोभ नसतो. आपल्याला मान किंवा स्थान मिळावे या हेतूने तो शिक्षणक्षेत्रात आलेला नसतो. यामुळे समाजाचा किंवा सरकारचा कोणताच जोर त्याच्यावर चालण्यासारखा नसतो. एखाद्या जातिवंत कलावंताची आपल्या कलेशी असावी त्याप्रमाणे याची आपल्या शिक्षणकार्याशी निरपेक्ष अव्यभिचारी निष्ठा असते. हा एकवेळ उपाशी मरेल परंतु आपल्या निष्ठेशी प्रतारणा करणार नाही. तंत्रज्ञ, स्थापत्यशास्त्रज्ञ हे संस्कृतीचे इमले उभे करू शकत नाहीत. संस्कृतीचा खरा आधार असे हे शिक्षकच होत."

वेगळ्या शब्दांत, हा पुराणकालीन खऱ्या ब्राह्मणाचा आदर्श आहे. अशा शिक्षकांना चांगल्या समाजात आपल्या योगक्षेमाची काळजी वहावी लागू नये, समाजानेच कृतज्ञतेने तो भार वहावा असेही जे. कृष्णमूर्ती यांनी सुचविले आहे. आदर्श शिक्षकाच्या या रेखाकृतीशी आपली मनोमन जरी आपण तुलना केली तरी आपण आज कोणीकडे भरकटत आहोत याची जाणीव होईल. एखाद्या आदर्श शिक्षकाने आदर्श विद्यार्थ्याला त्याच्या आत्मविकासाला पोषक होईल अशी मदत करीत रहावे, आपली कोणतीही मते त्याच्यावर लादू नयेत, फळ उववून-कुववून पिकविण्याचा हट्ट धरू नये, मग त्यातून जे निर्माण होईल तेच खरे शिक्षण होय. शिक्षणाचे ध्येय ते हेच आणि मर्यादाही पण हीच. मोठ्या सामुदायिक प्रमाणावर हा प्रयोग होणे अशक्य आहे. असे शिक्षक हाताच्या बोटावर मोजण्याइतके उभ्या जगातही सापडणार नाहीत. या शिक्षणाचा काळही विद्यापीठांतून मिळणाऱ्या शिक्षणाच्या काळापुरताच मर्यादित करावयाचे कारण नाही. किंबहुना या शिक्षणाची सुरवात विद्यापीठीय शिक्षणानंतरही कदाचित करणे योग्य होईल. मात्र पुढील शिक्षणाला विघातक होतील असे संस्कार पूर्वकालात विद्यार्थ्यांच्या मनावर होणार नाहीत एवढी काळजी मात्र विद्यापीठांनी घ्यावयास हवी. जे. कृष्णमूर्तींचा आग्रह शक्य तितके सार्वत्रिक प्रयोग व्हावेत व लहान वयापासूनच त्यांचा प्रारंभ व्हावा असा आहे. सुजाण पालकांनी हे काम हाती घ्यावयाचे ठरविले तरच ते शक्य आहे. आजच्या सार्वजनिक शिक्षणपद्धतीत आतून अशी काही सुधारणा नजीकच्या






काळात होऊ शकेल अशी अपेक्षा बाळगणे अधिक आशावादीपणाचे होईल. जे. कृष्णमूर्तीच्या अपेक्षांच्या अनुरोधाने विचार करता त्यांच्या आदर्शाच्या जवळपास येणारी अलीकडील काळातील गांधीजी-विनोबा ही एकच जोडी माझ्या डोळ्यांपुढे प्रमुखपणे उभी राहते. परंतु असंख्य 'सुशिक्षितां' पेक्षा अशी एक जोडीही अधिक प्रभावी होऊ शकते व जग हालवू शकते. यामुळे सार्वत्रिक न होऊ शकणारा आदर्शही केवळ कौतुकास्पद (किंवा उपहासास्पद!) आहे असे मानावयाचे कारण नाही.

### आजच्या शिक्षणसंस्था

शिक्षणसंस्थांतील अधिकारी वर्गाविषयीही जे. कृष्णमूर्ती यांनी काही विचार पुढे मांडले आहेत. या बाबतीत त्यांनी पुढे मांडलेला आदर्श हा आजीव सभासदांनी चालविलेल्या महाराष्ट्रातील काही प्रमुख शिक्षणसंस्थातून काही प्रमाणात तरी आज अस्तित्वात असल्याचे आढळून येईल. विद्यालयांत कोणत्याही एका व्यक्तीचे वा गटाचें अधिपत्य न राहता सर्व शिंक्षक वर्गाने सहकाराने कामे पार पाडावीत, या सहकाऱ्यांत उच्चनीचभाव नसावा व या सहकाऱ्यांच्या बैठकीत सर्व प्रश्नांची मोकळेपणाने सविस्तर चर्चा व्हावी असे जे. कृष्णमूर्ती यांनी सुचविले आहे. आपल्या खाजगी शिक्षणसंस्थांतून आजीव सभासदांच्या पुरती तरी ही समानतेची भावना पुष्कळशा प्रमाणात अस्तित्वात असते. सर्व शिक्षकांचा आजीव सभासदांत समावेश होत नाही ही या आदर्शाच्या दृष्टीने एक उणीव म्हणून दाखविता येईल. सर्व सहकारी शिक्षकांना समानतेच्या भूमिकेवर आणणे जे. कृष्णमूर्ती यांना अभिप्रेत आहे. परंतु आजीव सभासदांच्या परस्परसंबंधाच्या दृष्टीनेही जे. कृष्णमूर्ती यांनी मांडलेले विचार मननीय आहेत. ते म्हणतात : "आपले ध्येय कोणते याचीच जर या शिक्षकांना जाणीव नसेल तर लहानसहान गोष्टीवरून त्यांच्यात हेवेदावे, मत्सर आणि भांडणे निर्माण होतील हे उघड आहे. परंतु शिक्षणाच्या पवित्र क्षेत्रात आपण काहीतरी विशेष करून दाखविणार आहोत अशी ईर्षा जर असेल तर त्या एका ईर्षेपुढे इतर सर्व किरकोळ मतभेद मागे पडतील किंवा विरूनही जातील आणि मग बैठकीच्या वेळी 'कोण चुकला' यापेक्षा 'काय घडले' याची सखोल चर्चा सुरू होईल. शिक्षणक्षेत्रात काम करण्याची आपली तळमळ किती उत्कट आहे यावरच या गोष्टी अवलंबून राहतील. प्रत्येकाच्या वेगवेगळ्या वैयक्तिक अडचणी असू शकतील. त्या समजून घेऊन सर्वांना आपण आपल्या कामात सहकारी करून सामावून घेतले पाहिजे. केवळ काहींनी कामाला हात घालावयाचा आणि इतरांनी फक्त मतदानासाठी हात वर करावयाचा, अशा रीतीने कोणतीच महत्त्वाची कामे तडीला जात नसतात." आजीव सभासदांच्या संस्थांच्या अस्तित्वाची जाणीव जे. कृष्णमूर्ती यांना असल्याचे दिसत नाही. परंतु तरीही त्यांनी अशा संस्थांचे इतके समर्पक वर्णन केले आहे याचे आश्चर्य वाटते.

जे. कृष्णमूर्ती यांच्या विवेचनातून निर्माण होणाऱ्या काही शंका सांगून हा लेख संपवू. ते पुढे ठेवतात तो शिक्षणाचा आदर्श हा पराकोटीचा व अशक्यप्राय असा वाटतो. त्यांच्या कसोटीला उतरणारा शिक्षक हा जवळजवळ ज्ञानी मुक्तपुरुष असला पाहिजे व विद्यार्थ्यांचीही प्राथमिक तयारी अखेर त्या पदवीपर्यंत पोहोचण्याची असली पाहिजे. मोठ्या प्रमाणात याचा प्रयोग होणे त्यामुळे अशक्य आहे. परंतु त्यामुळे तात्त्विक विवेचनाला काही विशेष बाधा येते असे नव्हे. परंतु या नवशिक्षणाने आपल्याला समाज बदलता येईल, अशा प्रकारच्या अपेक्षा बाळगणे चुकीचे ठरेल. हा प्रयोग शिक्षकांनी करावा, सुजाण पालकांनीही करावा असे त्यांनी सुचविले आहे. शिक्षक तर अपुरे आहेतच. सुजाण पालक तरी कोठे आहेत? कारण पालकांच्या योग्यतेची कसोटीही शिक्षकांच्या योग्यतेच्या कसोटी इतकीच अवघड असणार. ज्यांचे स्वतःचे मन विमुक्त नाही तो दुसऱ्याच्या मनाची बंधने काय तोडणार? स्वतःपासूनच प्रयोगाला सुरवात करावी म्हणूनही त्यांनी सुचविले आहे. परंतु लहानशी संस्था, त्या संस्थेसाठी लागणारा पैसा, सरकारी साहाय्य या अधिक व्यापक प्रमाणावरच्या प्रयोगाची चर्चाही काही प्रमाणांत त्यांना टाळता आली नाही. आणि व्यक्तिगत भूमिकेवरून सामाजिक सार्वत्रिक भूमिकेवर आले की अनेक प्रश्न-उपप्रश्नांचे मोहोळ मनात उठल्याखेरीज राहात नाही. परंतु निश्चित व्यवहारी विधायक सूचना करण्यापेक्षा एका महत्त्वाच्या प्रश्नाविषयी आपल्याला जागे करून आपल्या विचारांना चालना देण्याचे कार्य ही प्रवचने करतात. यातच त्यांची यशस्विता आहे. आणि विचारांना चालना देण्याचे काम करणे हीच जे. कृष्णमूर्ती यांची विशेष प्रवचनपद्धती व कार्यपद्धतीहीपण आहे.

♦♦♦

न ही ज्ञानेन सदृशम्
पवित्रम् इह विद्यते।



## विभाग दुसरा
# अद्यतन

"Education is drawing out
the best potential that is hidden in man."

प्रत्येक व्यक्तीतील सुप्त सर्वोत्तम क्षमता
व्यक्त व विकसित करणे हे खरे शिक्षण आहे.

"I call every graduate a traitor
who having been educated at the cost of
his poor countrymen forgets them."

जो पदवीधर दीन दरिद्री देशबांधवांच्या त्यागावर
आपले शिक्षण पूर्ण केल्यानंतर त्यांना विसरतो
तो प्रत्येकजण देशद्रोही आहे असे मी मानतो.

- विवेकानंद.

अनुक्रमणिका

# जे०पी० नाईक : उदात्त विफलतेतील साफल्य

देवदत्त दाभोलकर

'...But the clapping would not stop and went on becoming louder still. It almost reached an irritating point when I was bursting to speak.with the pressure of words and ideas mounting up every millionth of a second in my brain. Yet the crowd went on clapping and did not allow me to say a word.'

J.P.Naik 'The Dream of a Dictator That-Was-Not-To-Be.'

जे.पी.नाईक यांच्या जीवनातील ही मूलभूत व्यथा होती व ती शेवटपर्यंत तशीच अशांत अस्वस्थ अवस्थेत राहिली. सुमारे पाऊणशे वर्षांपूर्वी गोपाळ कृष्ण गोखले आपल्या भाषणात म्हणाले होते : 'आपल्या राष्ट्राची सेवा आपल्या पिढीच्या हातून आपल्या कार्यात आपल्याला आलेल्या अपयशाच्या इतिहासाने व्हावी असाच विधिसंकेत आहे. आपल्या यशोमालिकांनी आपल्या राष्ट्राची सेवा करण्याचे सद्भाग्य भावी पिढ्यांना लाभेल अशी आशा आपण करू या.'

या आशयाच्या नामदार गोखले यांच्या उद्गारानंतर जवळ जवळ पाऊण शतकाचा काळ उलटला आहे. परंतु भारतीय शिक्षणाचा दर्शनकार म्हणून ज्यांचे यथार्थ वर्णन करता येईल त्यांना मात्र त्यांच्या शैक्षणिक परिवर्तनाच्या मूलभूत प्रयत्नांत उदात्त अपयशात सामावलेल्या गौरवाचे श्रेयच केवळ अखेर स्वीकारावे लागले.

सुरुवातीचे अवतरण ज्या लेखातून घेतले आहे तो लेख जे.पी. नाईक यांच्या वयाला सत्तर वर्षे पूर्ण झाली त्या वेळी काढलेल्या The Social Context of Education या गौरवग्रंथात ग्रथित केलेल्या त्यांच्या लेखातून घेतला आहे. या लेखाचे या ग्रंथातील शीर्षक 'To Begin a Revolution with a Revolution' असे आहे. लेखाच्या प्रारंभी जे.पी.नाईक यांनीच एक प्रास्ताविक लिहिले आहे. त्यात ते म्हणतात :

'जीवनातील क्रांती व शिक्षणातील क्रांती या एका गतीने पुढे सरकाव्या लागतात, कारण शिक्षण हेच जीवन आहे. १९४७ मध्ये आपण स्वातंत्र्य मिळविल्यानंतर झालेल्या राजकीय क्रांतीतून शैक्षणिक क्रांती होऊ शकली असती (आणि व्हावयासही पण हवी होती). अशा क्रांतीची शक्यता व तिची आवश्यकता या गोष्टीवर पंडित जवाहरलाल नेहरू यांनी अगदी प्रारंभीच १९४८ साली भर दिला होता. त्यावर्षी शिक्षण मंत्रालयाने बोलावलेल्या शैक्षणिक परिषदेत भाषण करताना जवाहरलालजी म्हणाले होते :

'यापूर्वी ज्या ज्या वेळी भारतात शैक्षणिक नियोजन करण्यासाठी म्हणून परिषदा बोलावण्यात येत असत, त्यावेळी आहे ती व्यवस्था मूलतः तशीच राखून काही मामुली फेरबदल करण्याचीच परिषदांची प्रवृत्ती असे. हे आता घडता कामा नये. देशात महत्त्वाचे बदल घडून आलेले आहेत आणि शिक्षणव्यवस्थेने या परिवर्तनाच्या गतीशी आपली गती जुळवून घेतली पाहिजे. आपल्या शिक्षणाच्या संपूर्ण मूलभूत रचनेतच क्रांतीची आवश्यकता आहे.'

हे उद्धृत केल्यानंतर जे.पी. नाईक पुढे उदास मनाने सांगतात :

'आपण या संधीचा जितका लाभ उठवावयास हवा होता तितका उठवला नाही. परिणामतः भारतात शिक्षण आणि जीवन या दोहोंचीही हानी झाली.'

जे.पी. नाईक यांच्यावर असे हताश उद्गार काढण्याची पाळी आली या घटनेतील संपूर्ण आशयाचे आकलन व्हावयास हवे असेल तर जे.पी. नाईक यांच्या त्रोटक जीवन-वृत्तांताचेही त्या विवेचनात महत्त्वाचे स्थान राहील.

## २

वर निर्देश केलेल्या ग्रंथातच डॉ. चित्रा नाईक यांनी जे.पी. नाईक यांच्या चरित्राची रूपरेखा दिली आहे. तिचा आशय संक्षेपाने असा :

जन्म : ५ सप्टेंबर १९०७ . कोल्हापूर जिल्ह्याच्या

मागास विभागातील वहिरेवाडी या लहानशा खेड्यात. कुटुंबात माणसे खूप, दारिद्र्यही खूप. वयाच्या पाचव्या वर्षापासून गुरे वळणे व शेतावर काम करणे याचा प्रारंभ. वयाच्या सातव्या वर्षी खेड्यातीत शाळेत प्रवेश. शाळा एक ते चार इयत्तांची. चार वर्षांचा अभ्यास दोन वर्षांत पुरा करून पुन्हा गुरे वळणे व शेतकाम सुरू.

सुदैवाने वहिणीचे लग्न वेळगावच्या वेळहोंगळ येथील कुटुंबातील तरुणाशी झाले. मेहुण्याने इंग्रजी १ ते ३ इयत्तांसाठी शिक्षणाला बोलावून घेतले. वेळहोंगळ येथे त्या वेळी इंग्रजी तिसरीपर्यंतच शाळा होती. मेहुण्याने नंतरच्या इंग्रजी चौथी ते सातवी पर्यंतच्या शिक्षणाची सोय वेळगाव येथे केली. १९२४ मध्ये मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण

नंतर प्रथम कर्नाटक कॉलेज, धारवाड व मागाहून आर्थिक अडचणीमुळे राजाराम कॉलेज, कोल्हापूर येथे महाविद्यालयीन शिक्षण. १९२९ मध्ये गणित हा विषय घेऊन बी.ए. ची पदवी संपादन.

१९३० : राजाराम महाविद्यालयात नुकतीच लागलेली नोकरी सोडून सविनय कायदेभंगाच्या चळवळीत सहभाग, अटक व वेल्लारी येथील तुरुंगात एक वर्षाहून अधिक काळ वास्तव्य. या काळातील आत्मचिंतनातून शिक्षण व ग्रामीण जनतेची सेवा ही आपली कार्यक्षेत्रे ठरविण्याचा निर्णय.

तुरुंगातील रुग्णालयात 'चीफ ऑर्डरली' म्हणून काम. त्यातून औषधोपचाराचे व रुग्णसेवेचे व्यावहारिक उपयोगी ज्ञान.

१९३२ : तुरुंगातून सुटका. धारवाड जिल्ह्यातील उप्पिन-वेटीगेरी या खेड्यात वास्तव्य. तेथे प्राथमिक शाळेतील अध्यापन, दवाखाना, व खादी कार्य. प्रौढ शिक्षणाचे वर्ग. खेड्यातील लोकांच्या सामाजिक व आर्थिक उन्नतीसाठी कार्य. खेड्यातील लोक पाळीपाळीने भाकरी व दह्याचा वाडगा देत व वरखर्चासाठी वर्गणी करून महिना पाच रुपये देत. या कार्यामुळे उप्पिन-वेटीगेरी या खेड्याला १९३७ मध्ये ग्रामीण विकासाची सर फ्रेडरिक साइक्स या मुंबई राज्याच्या गव्हर्नरांच्या नावे ठेवलेली ढाल मिळाली.

१९३७ : खेर मंत्रिमंडळाकडून प्राथमिक व प्रौढ शिक्षणासाठी नेमलेल्या मंडळावर काम करण्यासाठी आमंत्रण. शासकीय नोकर नसलेला शिक्षणतज्ज्ञ म्हणून राज्यस्तरावरील कामाचा प्रारंभ. १९४० पर्यंत हे कार्य. याच कालखंडात धारवाड तालुक्यातील मागास भागात ३० प्राथमिक शाळा चालविणाऱ्या धारवाड प्राथमिक शिक्षणप्रसार मंडळाची स्थापना.

१९४०-४७ : कोल्हापूर येथील कार्य. कोल्हापूर संस्थानचे त्या वेळेचे शिक्षणमंत्री राववहादूर पी.सी. पाटील यांच्या निमंत्रणावरून अंशवेळ शिक्षण मार्गदर्शक म्हणून १९४० मध्ये कोल्हापूर येथे आगमन. लवकरच विकास खात्याच्या सचिव पदापर्यंत पदोन्नती. वेतन न घेणारा परंतु विकासाच्या सर्व क्षेत्रांत दिवसातून अठरा तास काम करणारा लोकविलक्षण अधिकारी. (वेषही विलक्षण : अर्धी चड्डी व अर्ध्या वाह्यांचा सदरा) कोल्हापूर शहराची पुनर्रचना व सुधारणा, खेड्यात वैद्यकीय मदतीची सुटसुटीत योजना व कोल्हापूर संस्थानचा पंधरा वर्षांच्या विकासक्रमाचा आराखडा ही या कालखंडातील वैशिष्ट्यपूर्ण कामे.

१९४८-१९५९ : कोरगावकर ट्रस्ट, कोल्हापूर या संस्थेच्या सेवक संघाचे सदस्यत्व. १९४८ मध्ये इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ एज्युकेशन या शिक्षणक्षेत्रात संशोधन करणाऱ्या संस्थेची स्थापना. याच कालखंडात शिक्षणाच्या क्षेत्रात पूर्वप्राथमिकपासून ते पदव्युत्तर संशोधनापर्यंत सर्व स्तरांवरच्या संस्था व कार्य असणाऱ्या मौनी विद्यापीठाची स्थापना व त्या विद्यापीठाच्या उभारणीचे कार्य.

१९५९ मध्ये दिल्लीला आमंत्रण. १९५९ ते १९७३ या कालखंडात केंद्रीय शिक्षणमंत्रालयात शिक्षण सल्लागार म्हणून व अनेक समित्यांचा सभासद म्हणून कार्य. श्रीमाळी, हुमायून कवीर, फक्रुद्दिन अली अहमद, छागला, त्रिगुण सेन, व्ही.के.आर.व्ही.राव, सिद्धार्थ शंकर रे, नुरूल हसन व प्रतापचंद्र चंदर अशा ओळीने नऊ केंद्रीय शिक्षण मंत्र्यांबरोबर काम. कोठारी शिक्षण आयोगाचा सभासद सचिव म्हणून १९६४ ते १९६६ या कालखंडात कार्य व त्या अहवालाच्या रचनेत मूलभूत महत्त्वाचा सहभाग.

दिल्लीतही गारगोटीचीच साधी राहणी व निर्वेतन काम. जगातील नामवंत शिक्षणतज्ज्ञांना जे.पी.नाईक यांचे नाव माहीत नाही असे राहिले नाही व भारतात शिक्षणक्षेत्रात काहीही काम आस्थेने, कर्तृत्वाने करणाऱ्या व्यक्तीचे नाव जे.पी. नाईक यांना माहीत नाही असेही झाले नाही. केंद्रात आणि सर्व राज्यांत शिक्षणमंत्री, शिक्षणखात्याचे सचिव,






शिक्षण संचालक, वरिष्ठ अधिकारी या सर्वांना जे.पी. नाईक यांचा परिचय होता व या सर्वांच्याकडे त्यांच्या शब्दाला मान होता. अशीच मान्यता त्यांना आंतरराष्ट्रीय स्तरावर काम करणाऱ्या परदेशांतील संस्थांतूनही होती.

१९६७ ते १९६९ या कालखंडात त्यांनी इंडियन कौन्सिल ऑफ सोशल सायन्स रिसर्च या संस्थेचा आराखडा मान्य करून घेतला. १९६९ मध्ये स्थापन झालेल्या या संस्थेचे ते १९७८ पर्यंत सभासद-सचिव होते. गणित विषय घेऊन बी.ए. झालेल्या जे.पी. नाईक यांना सर्वोच्च श्रेणीच्या भारतीय समाजशास्त्रज्ञांतही पितृतुल्य मान होता.

हा सर्व तपशील या ठिकाणी हेतुपूर्वक देण्यात आला आहे. अशी बुद्धिमत्ता, असे कर्तृत्व, अशी मान्यता व संधी असलेल्या प्रतिभावान, सत्वशील, निरलस, उद्यमशील माणसाला देखील तीन दशकांच्या अखंड धडपडीनंतर भारताच्या शैक्षणिक परिवर्तनाच्या प्रयत्नांत पराभव मान्य करावा लागला ही भारतीय परिस्थितीची शोकांतिका आहे. 'An ineffectual angel beating in the void his luminous wings in vain' अशीच शेवटपर्यंत त्यांची स्थिती राहिली.

हे असे कसे झाले? का झाले?

३

'मी सर्वसत्ताधीश असतो तर....' या आपल्या लेखात काहीशा खेळकरपणाने परंतु उत्कटतेने जे.पी. नाईक यांनी आपले शिक्षणाच्या रचनेविषयीचे स्वप्न रंगविले आहे. ते लिहितात :

"मला आठवतं, शैक्षणिक पुनर्रचनेचा विचार करण्यासाठी मी एक माझ्या मंत्रिमंडळाची बैठक बोलावली होती. विविध खात्यांच्या सचिवांना पण बोलावलं होतं. सर्वांत शेवटी शिक्षण मंत्रालयाचा सचिव आला होता. शिक्षण आयोगाच्या अहवालाचे खंड, उपखंड स्वतः वाहून आणण्याच्या प्रयत्नात विचारा खाली कोसळला होता व त्याला तातडीने रुग्णालयात पोचवावे लागले होते. या सगळ्या गोंधळात त्याच्याजवळ असलेली शिक्षण आयोगाच्या अहवालाची एकमेव अखेरची प्रत कुठेतरी गायब झाली होती. थोडा वेळ कुणालाच काय करावं हे सुचेना.

"अर्थ मंत्रालयाच्या सचिवाचे प्रसंगावधान मात्र शाबूत होते. तो म्हणाला, 'शिक्षण आयोगाच्या अहवालाची चर्चा आता संपुष्टात आलेली असल्यामुळे आपण कार्यक्रमाच्या कार्यवाहीचा प्रश्न हाती घेऊ शकतो.

"याच वेळी आणखीही दोन चांगल्या घटना घडून आल्या. प्रगत देशातील आमच्या सर्व मित्र राष्ट्रांनी आम्हांला कळवलं की, त्यांचे 'तज्ज्ञ' आम्हाला मार्गदर्शन करण्यासाठी उपलब्ध होऊ शकणार नाहीत. कोणतीही आर्थिक मदत (शेपूट असलेली किंवा नसलेली) यापुढे त्यांच्याकडून उपलब्ध होऊ शकणार नाही हेही त्यांनी त्याच वेळी स्पष्ट केलं. गृहखात्याचा सचिव म्हणाला, 'हे मोठं छान झालं. आता आपल्याला चुकीचे मार्गदर्शन करायला 'तज्ज्ञ' असणार नाहीत आणि उधळायला आपल्याकडे पैसा नसल्यामुळे आपले लक्ष मूलभूत गोष्टीवर साहजिकपणेच केंद्रित होईल.' (मला याच ठिकाणी हेही सांगितलं पाहिजे की, सर्वसत्ताधीश झाल्यानंतर मी लेखणीच्या पहिल्या फटकाऱ्याने जर कोणती गोष्ट केली असेल तर ती म्हणजे 'प्लॅनिंग कमिशन' बरखास्त करणे ही होय; नियोजन सुधारावे या हेतूने नव्हे तर निदान काही प्रमाणात तर नियोजन करता येणे शक्य व्हावे म्हणून.)

"थोड्या चर्चेनंतर आमच्या लक्षात आलं की, आपल्यासमोर दोन प्रचंड अडचणी उभ्या आहेत. पहिली अडचण 'प्रारंभ कुठे करावा'? ही होती. शिक्षण सचिव म्हणाला, 'स्वातंत्र्य मिळाल्यानंतर याविषयी आलेल्या सर्व सूचना जर एकापुढं एक ओळीने मांडल्या तर आपण सहज चंद्रावर जाउन पोचलो असतो इतक्या लांबीचा तो रस्ता झाला असता.' (म्हणजे अमेरिकेच्या आधी चंद्रावर पाऊल ठेवण्याचे आमचे यश आमच्या हातून थोडक्यातच निसटले म्हणायचे. असो.)

"दुसरी महत्त्वाची अडचण अशी होती की, एखादा महत्त्वाचा कार्यक्रम गाजावाजा करून तो कसा सुरू करावा याविषयी जगात माहीत असलेली सर्व तंत्रं आमची वापरून झाली होती. त्या सर्व तंत्रांच्या अपयशाचा भरभक्कम अनुभव तेवढा आमच्या पदरी होता.

"आम्ही सर्वजण अशा कोंडीत सापडलो असताना माझी बायको नेहमीप्रमाणे चहा आणि काजू घेऊन तेथे आली. (मला स्वप्ने सामान्यपणे कमी पडतात. त्यामुळे मला नक्की माहीत नाही; बहुतेक पुरुषांच्या स्वप्नात स्त्रिया येत असाव्यात, परंतु स्वतःची बायको स्वप्नात येते का हाही प्रश्नच आहे. हेही असो.)

"ती आली याचा आनंद झाला. माझ्या प्रत्येक काळजीला तिच्याकडे उतारा असतो. (आणि म्हणूनच तर खरं मी तिच्याशी लग्न केलं!) माझ्या काळजीचं कारण समजताच ती आपलं नेहमीचं सुप्रसन्न हास्य करीत म्हणाली, 'हा काय वेडेपणा आहे! यात काळजी करण्यासाखं ते काय आहे? शिक्षण कुणासाठी असतं?' 'अर्थात, अशिक्षितांसाठी' मी म्हणालो.' 'मग त्यांना विचारा' ती म्हणाली. झालं, संपलं. प्रश्न मिटला. आतापर्यंत मला मिळालेल्या सूचनांत ही सर्वोत्कृष्ट सूचना होती- आणि समजा नसती तर आपल्या बायकोनं केलेली सूचना (आणि ते देखील ती सर्व सत्ताधीशाची वायको असताना) कोणाला डावलता येईल काय? अशिक्षित लोक मिळवणं तसं कठीण नव्हतं. कोणत्याही सचिवाकडे मला मिळण्यासारखं मार्गदर्शन नव्हतं; परंतु प्रत्येकाकडे एकतरी निरक्षर नोकर सहजपणे उपलब्ध होण्यासारखा होता.

"या सेवकांची बैठक चांगली झाली. आमच्या नेहमीच्या समिती मंडळाच्या बैठकीत अनेक वर्षे तात्त्विक गुळचट चर्चांची सवय झालेली असल्यामुळे या लोकांच्या झणझणीत व्यावहारिक सूचनांचा तिखटपणा सुरुवातीला चांगलाच जाणवला. परंतु बैठकीचा प्रत्येक क्षण कारणी लागला.

"या मंडळींनी मला एक साधी गोष्ट शिकवली. खरी क्रांती जर करायची असेल तर तिची सुरुवात एखाद्या बॉंवस्फोटासारखी नाहीतर एखाद्या शेवाळलेल्या डवक्यात धाडकन मोठा दगड टाकल्यागत 'दणक्यात' झाली पाहिजे.

"या वातावरणात मी एक निर्णय घेतला. भारतात सर्वत्र शैक्षणिक वर्ष एकाच दिवशी सुरू करायचं. १४ नोव्हेंबर ही तारीखही निश्चित केली. दुसरा महत्त्वाचा निर्णय मी घेतला की, शिक्षणसंस्था आपला नियत अभ्यासक्रम वर्षातील सहा महिन्यांत पूर्ण करतील. यानंतर साहजिकच प्रश्न समोर आला की, उरलेल्या सहा महिन्यांचं काय करायचं?

"हा खरं तर अवघड प्रश्न नव्हता! कारण विद्यार्थी, शिक्षक, शिक्षणाधिकारी वर्षभर तेच असणारे होते. शिक्षक व शिक्षणाधिकाऱ्यांना वर्षभर त्यांचा पगार पूर्वीप्रमाणेच मिळणार होता. अपेक्षा एवढीच, की या सहा महिन्यांत आपले ज्ञान व आपली शक्ती त्यांनी राष्ट्रीय सेवेच्या कामात वापरावी. यासाठी काही थोडासा अधिक खर्च लागला तर त्याची तरतूद सहजपणे करता येण्यासारखी होती. कार्यक्रमाचाही प्रश्न अवघड वाटण्याचे कारण नव्हते. प्रत्येक शिक्षणसंस्थेच्या परिसरात राष्ट्रसेवेची करण्यासारखी कितीतरी कामे असतात. प्रत्येक शिक्षणसंस्था स्वतः आखून आपला कार्यक्रम कार्यवाहीत आणू शकेल. हे उत्तरदायित्व शिक्षणसंस्था, प्राध्यापक -अध्यापक व विद्यार्थी यांच्यावर टाकण्यात कोणतीच अडचण नव्हती.

"गृहपाठ या शब्दाचा आशयच बदलण्यात आला. शाळेत नेमून दिलेला परंतु विद्यार्थ्याने घरी करावयाचा अभ्यास हे स्वरूप काढून टाकून आपल्या कुटुंबासाठी विद्यार्थ्याने आपल्या घरी केलेलं काम असा त्याचा अर्थ करण्यात आला व अशा कामाची नोंद ठेवण्याची पद्धत सुरू केली. उत्तीर्ण होण्यासाठी या 'गृहपाठा'तील गुणही आवश्यक मानले जाऊ लागले".

घरातील कामांचे व समाजसवेचे अनेक तपशील जे.पी. नाईक यांच्या या स्वप्नात आहेत. आपल्याला आपल्या जागेपणी त्यात अनेकविध भरही घालता येण्यासारखी आहे. जे.पी. नाईक या कार्यक्रमाकडे विद्यार्थ्यांनी व शिक्षकाने करावयाची एक पूरक वेठविगारी या दृष्टीने पाहत नाहीत. शैक्षणिक गुणवत्तेचा व व्यक्तिगत विकासाचा एक अति-आवश्यक कार्यक्रम या दृष्टीनेच ते या कार्यक्रमाकडे पाहतात.

या स्वप्न-भारतातील मुलांचे ध्येयस्वप्न त्या मुलांनी गांधीजी व पंडित जवाहरलाल नेहरू यांना लिहिलेल्या एका पत्राच्या रूपाने त्या स्वप्नात समाविष्ट केले आहे. ती मुले लिहितात :

"प्रिय बापूजी आणि चाचाजी, भारताचा शोध घ्यावयास तुम्ही आम्हाला शिकविले, भारताच्या भाग्यध्येयाची दिशा दाखविली आणि त्या दिशेने वाटचाल करण्याचा निर्धार आमच्यात निर्माण केला. आता आमच्यात आत्मविश्वास आहे आणि उज्ज्वल भारत आम्ही उभा करू अशी आमची श्रद्धा आहे.

"समता व न्याय यांवर आधारित अशी समाजरचना आजच्या काळात व्यक्तीला खरे संरक्षण देऊ शकते हे आम्ही ओळखतो. व्यक्तिगत स्वार्थ हा व्यक्तीच्याही दृष्टीने आपले खरे सुख साधण्याचा मार्ग नाही. समाजहिताचे प्रश्न समोर आले असता आमच्या व्यक्तिगत आशा-आकांक्षाना गौण स्थान देण्याचा आमचा सदैव प्रयत्न राहील.






"आपला भारत आज दरिद्री व अप्रगत आहे याची आम्हाला तीव्र जाणीव आहे. यातून जर आपल्याला प्रगती साधावयाची असेल तर साधी राहणी व अविश्रांत श्रम (अनेकदा केवळ कंटाळवाणे कष्ट) याखेरीज आज दुसरा मार्ग नाही. आम्ही हे आनंदाने सहन करू; कारण उद्याच्या सुखप्रद प्रभातकालाकडे आमचे डोळे लागलेले आहेत.

"आमच्या पिढीचे हे विशेष भाग्य आहे. नवा समृद्ध भारत उभा करण्याचे आव्हान व तशी संधी आमच्या आधीच्या पिढ्यांसमोर नव्हती; आणि आम्ही आमचे काम निर्धाराने पूर्ण केले तर आमच्यानंतरच्या पिढीसमोरही हे आव्हान या स्वरूपात राहणार नाही. हे भाग्य पेलण्यासाठी कितीही मोल मोजावे लागले तरी ते अपुरेच आहे या भावनेने आम्ही ते आनंदाने मोजू."

जे.पी. नाईक यांनी या पत्राचा निर्देश Testament असा केला आहे. त्यांच्या स्वप्न-भारतातील मुलांचे हे प्रतिज्ञापत्र जे.पी. नाईक यांचे स्वतःचेही भावनोत्कट प्रतिज्ञापत्र होते.

४

या स्वप्नशील स्वप्नापेक्षा कमी स्वप्नील असे जे.पी. नाईक यांचे 'वास्तविक' स्वप्न कोठारी शिक्षण आयोगाच्या अहवालात प्रतिबिंबित झाले आहे.

कोठारी शिक्षण आयोग (१९६४-६६) हा सर्व शिक्षणक्षेत्राचा साकल्याने विचार करणारा भारतातील पहिला शिक्षण आयोग होता. भारतासाठी राष्ट्रीय शिक्षण व्यवस्थेचा एकत्रित आराखडा तयार करण्याचा तो प्रयत्न होता. या आयोगाचे सचिव म्हणून व एक प्रभावी सदस्य या नात्याने जे.पी. नाईक यांच्या विचारधारणेचा स्पष्ट ठसा या आयोगाच्या अहवालावर साहजिकपणेच पडला आहे.

आयोगाने उद्याच्या नवभारताचे कोणते चित्र आपल्याला अभिप्रेत म्हणून नजरेसमोर ठेवले होते? लोकशाही, धर्मातीतता व समता ही भारतातील समाजरचनेची प्रमुख त्रिसूत्री आयोगाने मानली होती. या समाजरचनेकडे जाण्यासाठी विज्ञान व अध्यात्मिक मूल्ये यांची कास धरून शास्त्रज्ञान व तंत्रज्ञान यांचा मानवी जीवनाला हितावह असा उपयोग करता येईल व जनतेचे दारिद्र्य व अज्ञान दूर करता येईल अशी या आयोगाची अपेक्षा होती. मानवाच्या व्यक्तिमत्वाच्या केवळ एकाच अंगाचा विकास होईल अशा रीतीने विज्ञान वापरण्याऐवजी अध्यात्मिक मूल्यांशी विज्ञानाची सांगड घातली तर मानवाच्या संपूर्ण व्यक्तिमत्वाचा समतोल विकास होऊ शकेल अशी यामागील भूमिका होती. तोपर्यंत चालत आलेली शिक्षणव्यवस्था भारतात मुख्यत्वेकरून अस्तित्वात असणाऱ्या सरंजामशाही समाजरचनेचे ताण व भारतात राज्य करणाऱ्या ब्रिटिश साम्राज्यशाहीची गरज यांच्या संतुलनातून निर्माण झालेली होती. भारताला आपल्या नव्या उद्दिष्टांकडे वाटचाल करावयाची असेल तर पूर्वीच्या शिक्षणव्यवस्थेचा सर्व अंगांमध्ये मूलभूत बदल करणे अटळ आहे असे आयोगाचे सांगणे होते. नवी राष्ट्रीय शिक्षणव्यवस्था अस्तित्वात आणावयाची असेल तर अशा शैक्षणिक क्रांतीपासून प्रारंभ केला पाहिजे, या भूमिकेतून आयोगाने या क्रांतीचा कार्यक्रमात्मक तपशील सांगण्याकडे आपले लक्ष केंद्रित केले.

आयोगाने सांगितलेले राष्ट्रीय शिक्षणव्यवस्थेच्या तपशिलाचे स्वरूप थोडक्यात खालीलप्रमाणे होते.

१) भारतीय परंपरेतील मंगल भागाशी या शिक्षणव्यवस्थेचा अतूट संबंध असेल. २) भारताच्या राज्यघटनेत दिग्दर्शित केलेल्या समाजरचनेशी तिची बांधिलकी राहील. ३) ज्ञानार्जन व ज्ञानवितरणाचे कार्य ती प्रभावीपणे करील. ४) धर्म, वर्ण, जाती, वर्ग असा कोणताही भेद न करता सर्वांसाठी शिक्षणाची समान संधी ही शिक्षणव्यवस्था उपलब्ध करून देईल. ५) वयोगट ६ ते १४ मधील सर्व मुलांना प्राथमिक शिक्षण देण्यात येईल व सर्व निरक्षर प्रौढांना साक्षर केले जाईल. ६) प्राथमिक शिक्षणाच्या वरील स्तराचे शिक्षण ज्यांना घेण्याची इच्छा असेल व बौद्धिक कुवत असेल त्या सर्वांना समान संधीच्या तत्त्वावर उपलब्ध असेल. ७) सर्व नागरिकांना कोणत्याही वयात (जीवनात सर्वकाळ) पुढचे शिक्षण देण्यासाठी निरंतर शिक्षण योजनेची तरतूद या व्यवस्थेत असेल. ८) समाजाच्या सर्व स्तरांतून गुणवत्तेचा शोध घेऊन गुणी विद्यार्थ्यांचा विशेष विकास करण्यासाठी ही व्यवस्था प्रयत्नशील राहील. ९) विशेष गुणी विद्यार्थ्यांच्या शिक्षणाचा खर्च शासन करील. १०) सर्व स्तरांवर गुणवत्ता सतत चढतीवाढती राहील व काही विशेष महत्त्वाच्या क्षेत्रांत तर ती गुणवत्ता आंतरराष्ट्रीय तुलनेत तुल्यबळ असेल अशी दक्षता ही शिक्षणव्यवस्था घेईल.








कोठारी शिक्षण आयोगाच्या सूचनांमागील या प्रमुख दहा सूत्रांवर जे.पी. नाईक यांचा अखेरपर्यंत दृढ विश्वास होता. या सूत्रांच्या अनुरोधाने कार्यक्रम कसे उभे करावयाचे याचा विचार करण्याचे उत्तरदायित्व प्रत्येक पिढीतील शिक्षक, विद्यार्थी, शिक्षणाधिकारी व शिक्षणक्षेत्राविषयी चिंतन करणारे विचारवंत यांनी स्वीकारले पाहिजे, अशी त्यांची अपेक्षा होती.

५

शिक्षण आयोगाच्या सूचनांचे पुढे काय झाले?

याविषयी जे.पी. नाईक यांना आलेला अनुभव अतिशय निराशाजनक होता. या अहवालाची प्रसिद्धी व गाजावाजा तर खूप झाला. आजवर इतर कोणत्याही शैक्षणिक अहवालाला न मिळालेला मान या अहवालाला मिळाला. तो मान म्हणजे या अहवालाचा विचार करून त्या अनुरोधाने राष्ट्राचे शिक्षणविषयक धोरण जाहीर करण्यासाठी लोकसभेतील सभासदांची एक समिती नियुक्त करण्यात आली. सर्व राजकीय पक्षांचे प्रतिनिधी या समितीवर होते. या चर्चेतून अहवालाच्या कार्यवाहीला मदत होण्याऐवजी तिच्यात अडथळे निर्माण झाले.

शिक्षण आयोगाने एक अंतर्गत दृष्ट्या सुसंगत व एकसंध कार्यक्रम सुचविण्याचा प्रयत्न केला होता. (Package deal) अहवालावरील चर्चेत भाग घेणाऱ्यांनी मात्र अशा एकात्म दृष्टीने त्याच्याकडे पाहण्याऐवजी आपले हितसंबंध ज्यांत गुंतलेले आहेत अशा सूचनांच्याचकडे आपापल्या स्वार्थी दृष्टिकोणातून लक्ष दिले. कुलगुरूंच्या परिषदेने काही प्रगत विद्यापीठांचा विशेष विकास करण्याची Major Universities ची कल्पना अनेक विद्यापीठांचा त्यात समावेश होणार नाही हे स्पष्ट असल्यामुळे फेटाळून लावली. लोकसभेच्या समितीच्या सदस्यांचा बहुतेक वेळ आयोगाच्या भाषाविषयक सूचनांवर वादंग माजवण्यात खर्च झाला. या समितीच्या अहवालाला शेवटी अनेक भिन्न मतपत्रिका जोडण्यात आल्या. शासनाला यातून कोणतेच स्पष्ट मार्गदर्शन झाले नाही. यामुळे १९६८ साली जाहीर करण्यात आलेले राष्ट्रीय शैक्षणिक धोरणाविषयीचे निवेदन, सर्व वाद टाळण्याच्या प्रयत्नात व कणखर धोरणाच्या अभावी, प्रभावी कार्यात्मक मार्गदर्शनाला निरुपयोगी असे एक सात्विक सद्भावनांचे मिळमिळीत निवेदन अशा स्वरूपात प्रकट झाले.

या चर्चेतील निष्फळ काथ्याकुटाला कंटाळून आयोगाचे अध्यक्ष डॉ. डी.एस्. कोठारी शेवटी उद्वेगाने एकदा म्हणाले : 'सर्व अहवालाचा एकसंध विचार होण्याची आशा मी कधीच सोडून दिली आहे. आता कोणत्याही, निदान एका सूचनेचा या लोकांनी नीट विचार केला तरी मी समाधान मानावयास तयार आहे.'

ते समाधानही डॉ. कोठारींना मिळाले असेल असे वाटत नाही. (प्राध्यापकांची वेतनश्रेणी सुधारली एवढे समाधान त्यांना पुरेसे वाटत असल्यास गोष्ट वेगळी.) डॉ. कोठारी यांच्या मनातील वेदना व जे.पी. नाईक यांच्या मनातील वेदना एकच होती.

कोठारी आयोगाचा अहवाल सादर झाल्या-नंतरच्या कालखंडातील आपल्या देशातील शैक्षणिक कार्याचे जे.पी. नाईक यांनी वस्तुनिष्ठ मूल्यमापन केले आहे. ते लिहितात :

"शिक्षण आयोगाने आपल्या कार्यक्रमांचे परिवर्तन, गुणवत्ता व विस्तार असे तीन भाग केले होते व त्या कार्यक्रमांचे आयोगाच्या दृष्टीने महत्त्वही त्याच क्रमाने होते. परंतु प्रत्यक्ष व्यवहारात मात्र नेमके त्याच्या उलट घडले. लोकसभा समितीचा व राजकीय पक्षांचा भर सवंगपणे लोकप्रिय अशा विस्तारांच्या कार्यक्रमावर होता. यामुळे विस्ताराचा कार्यक्रम शक्य तितक्या वेगाने पार पाडण्यात आला, गुणवत्तेकडे दुर्लक्ष झाले व परिवर्तनाचा तर कोणी विचारही केला नाही. यामुळे विस्तार होऊनही आज परिस्थिती कशी आहे?

"(१) दहा वर्षांहून अधिक वय असणाऱ्या लोकसंख्येपैकी साठ टक्के लोक आजही निरक्षर आहेत. राष्ट्रातील या अवाढव्य शिक्षणव्यवस्थेपासून त्यांना काहीही लाभ मिळालेला नाही.

"(२) सुमारे वीस टक्के मुले शाळेत प्रवेश घेण्याच्या टप्प्यापर्यंत देखील पोचत नाहीत. औपचारिक शिक्षणव्यवस्थेने त्यांचा विचार करावयाचेच सोडून दिले आहे.

"(३) शाळेत जाणाऱ्या विद्यार्थ्यांपैकी पन्नास टक्के पाचव्या इयत्तेपर्यंत गळतात; ७५ टक्के आठव्या इयत्तेपर्यंत गळतात; केवळ पंधरा टक्के बारावीच्या वर्गापर्यंत जाऊन पोचतात व विद्यापीठाची पहिली पदवी संपादन करणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या एक टक्का देखील नसते.






"(४) सध्याची शिक्षणव्यवस्था जनतेतील दरिद्री वर्गाला उपयोगी अशा साक्षरता प्रसार, सार्वत्रिक प्राथमिक शिक्षण, अनौपचारिक शिक्षण यांसारख्या कार्यक्रमांवर कमी भर देते व देशातील लोकसंख्येपैकी केवळ तीस टक्के वरिष्ठ लोकांनाच उपयोगी अशा दुय्यम व उच्चस्तरीय शिक्षणावर आपले लक्ष अधिक केंद्रित करते."

आजच्या शिक्षणव्यवस्थेचा कल हा स्पष्टपणे समाजातील वरिष्ठ व मध्यमवर्गाकडे झुकलेला आहे असा जे.पी. नाईक यांचा आरोप आहे. आजची शिक्षणव्यवस्था ही गरीबांना शिक्षण देण्याऐवजी त्यांना शिक्षणापासून वंचित ठेवण्यासाठी निर्माण झालेली आहे आणि वरिष्ठ व मध्यमवर्ग यांचे हितसंबंध कायम ठेवून त्यांना त्यांच्या स्थानावर कायम राहण्यास मदत करणे एवढेच या यंत्रणेचे कार्य प्रत्यक्षात घडून येते असा त्यांचा भारताच्या शिक्षणव्यवस्थेवर तीव्र कडवट आरोप आहे.

या घटनेकडे थोडे अधिक निरखून पाहिले पाहिजे. या निरीक्षणात जे.पी. नाईक यांच्या व्यक्तिमत्वाच्या निरीक्षणाचा व त्यांच्या कार्याच्या आदरयुक्त परंतु सुयो मूल्यमापनाचाही प्रश्न निर्माण होतो. त्यांची चैतन्यशील चरित्ररेखा आपण प्रारंभी काहीशा तपशिलाने पाहिली ती याच हेतूने.

## ६

आपल्या हरप्रयत्नांनीदेखील भारताच्या शिक्षण व्यवस्थेला इष्ट असे वळण आपल्याला देता येत नाही याची जाणीव जे.पी. नाईक यांना शिक्षण आयोगावर जी चर्चा झाली व त्या आयोगाने केलेल्या सूचनांची जी वासलात लागली तेव्हापासून आली होती. आपल्याकडून शिक्षण आयोगाच्या अहवालात एक महत्त्वाची उणीव राहून गेली याची त्यांना खंत होती. ती त्यांनी प्रकटही केली आहे. ते लिहितात :

"आयोगाच्या अहवालाची एक महत्त्वाची उणीव अशी राहून गेली की अहवालाने आर्थिक विकासाच्या अनेक महत्त्वाच्या समस्यांना स्पर्शही केला नाही. या समस्यांमध्ये जागतिक पातळीवर राष्ट्राराष्ट्रांतील विषम आर्थिक विकासाच्या समस्येचा आणि प्रगत राष्ट्रांकडून अप्रगत राष्ट्रांच्या होणाऱ्या शोषणाचा समावेश होतो. राष्ट्रांतील अंतर्गत विकासाच्या प्रश्नांच्या संदर्भात राष्ट्रातील आर्थिक सामाजिक-राजकीय विषमतेतून निर्माण होणाऱ्या अनेक समस्या पुढे येऊन उभ्या राहतात. अशा समस्यांना आपण खंबीरपणे सामोरे गेले पाहिजे असा निर्देश आयोगाने आपल्या अहवालात केला होता; परंतु या गोष्टी जितक्या आग्रहाने व स्पष्टपणे अहवालात मांडल्या जावयास हव्या होत्या तशा मांडल्या गेल्या नाहीत. ही उणीव राहिली याची जबाबदारी मला स्वीकारली पाहिजे. मला याविषयीची जी थोडी माहिती होती व आयोगापुढे झालेल्या चर्चांतून व आलेल्या निवेदनांतून जेवढी गोष्ट स्पष्ट झाली होती तिचाही समावेश करण्याचे माझ्याकडून राहून गेले. परंतु याखेरीज मला हेही मान्य केले पाहिजे की, त्या काळात माझे विकासाच्या प्रश्नांविषयीचे ज्ञानही फारच मर्यादित असे होते. शिक्षण आयोगाचा सभासद-सचिव म्हणून काम केल्यानंतरच्या कालखंडात मी इंडियन कौन्सिल ऑफ सोशल सायन्स रीसर्च या संस्थेचा सभासद-सचिव झालो. हा कालानुक्रम जर याच्या उलट राहिला असता तर कदाचित ही उणीव माझ्याकडून राहिली नसती."

जे.पी. नाईक यांनी याप्रमाणे खिलाडूवृत्तीने या परिस्थितीचा दोष जरी आपल्याकडे घेतला असला तरी केवळ तेवढ्यावर या प्रश्नाला किंवा जे.पी. नाईक यांनाही आपण न्याय केला असे होणार नाही. या प्रश्नाचे स्वरूप असे ठामपणे मांडण्याची उणीव राहून गेली ही गोष्ट खरी, परंतु ती तशी मांडली गेली असती तर आयोगाने सुचविलेल्या कार्यक्रमाच्या दिशेत व रचनेत काही फरक पडला असता असे नाही. तो कार्यक्रम अधिक क्रांतिकारक वेगाने पुढे रेटला पाहिजे एवढाच आणखी आग्रह मग त्या मांडणीत आला असता. परंतु परिवर्तनाचा कमी वेगही ज्यांच्या प्रकृतीला मानवत नव्हता त्या राज्यकर्त्यांच्या पुढे अधिक वेगाचे मूलभूत समर्थन करून तरी काय उपयोग होता? अशा राज्यकर्त्यांकडून काही विशेष अपेक्षा बाळगणे ही एक भोळी आत्मवंचनाच होय.

जे.पी. नाईक यांना जाणीव होती परंतु त्यांचा आशावाद दुर्दम्य होता (किंवा निराशेपुढे हार खाण्याची त्यांची वृत्ती नव्हती). त्यामुळे सामाजिक, आर्थिक, राजकीय परिवर्तन केल्याखेरीज शिक्षणक्षेत्रात काही बदल घडवून आणण्याचे प्रयत्न करणे म्हणजे मूळ गाभ्याला हात घालता येत नसता केवळ बाजूची टोके कुरतडण्यासारखे आहे याचे भान असूनही तेथेही त्या मर्यादेत जे करता येण्यासारखे होते ते


अनुक्रमणिका

ते उत्साहाने करत राहिले. प्रश्नांच्या मूलभूत गाभ्याला हात घालावयाचा तर प्रत्यक्ष राजकारणाच्या क्षेत्रातच उतरणे अटळ होते. असहकार आंदोलनात भाग घेतलेल्या जे.पी. नाईकांनी हे केले नाही. कारण आपला मूळ पिंड अशा राजकारणी मनोवृत्तीचा नाही हे त्यांनी ओळखले होते. परंतु या भूमिकेपर्यंत आलेल्या लोकांनी मूलभूत परिवर्तनाच्या प्रयत्नासाठी राजकारणात उतरणे आवश्यक आहे हे त्यांना मान्य होते. 'ज्यांचा जसा पिंड आहे त्यांनी अवश्य त्या मार्गाने जावे. माझ्या शुभेच्छा सदैव त्यांच्या पाठीशी राहतील,' असा निर्देश त्यांनी आपल्या एका व्याख्यानात केला होता.

राज्यकर्त्या पक्षाला देशातील मूलभूत परिवर्तनाविषयी आस्था नाही (पक्षाच्या अंतर्गत रचनेतून आलेला मूलभूत विरोधच आहे) व अन्य राजकीय पक्षांनाही निवडणुकीच्या राजकारणापलीकडे परिवर्तनात वा शिक्षणात रस नाही असा त्यांचा नाऊमेद करणारा अनुभव होता. हे परिवर्तन करण्याची जबाबदारी राज्यकर्त्या पक्षाची आहे. त्याने आपली धोरणे विचारपूर्वक निश्चित केली पाहिजेत. आणि नंतर निर्धारपूर्वक कणखरपणे ती अमलात आणली पाहिजेत. मार्गदर्शक प्रयोग (pilot projects), संशोधन वगैरे कालहारक कार्यक्रमांच्या मागे न लागता काही तडाखेबंद कार्यक्रम जनशक्तीचे सहकार्य घेऊन पार पाडले पाहिजेत अशी त्यांची धारणा होती. देशाला साक्षर करण्याचा कार्यक्रम आपल्या राज्यकर्त्यांमध्ये पुरेसा राजकीय निर्धार असता तर दहा वर्षांच्या कालावधीत कधीच पार पडला असता असे त्यांचे विवेचन असे. देशात काँग्रेस पक्ष अखंडपणे तीस वर्षे केंद्रात सत्तेवर राहिला असताना व अनेक राज्यांतही त्याच पक्षाचे राज्य असतानाही हा निर्धार त्या पक्षाने का व्यक्त केला नाही याची सविस्तर कारणमीमांसा जे.पी. नाईक यांनी केली नाही. परंतु त्या पक्षातील ज्या अंतर्गत परस्परविरोधी ताणांमुळे त्या पक्षाचे जे.पी. नाईक यांना अभिप्रेत असलेल्या क्रांतिकारक परिवर्तनाकडे निर्धाराने पाऊल टाकणे अशक्य होते त्या ताणांचा अनुभव त्यांनी शासकीय व्यवहारात जवळून घेतला होता. अधिकारावर असलेल्या राज्यकर्त्या पक्षाच्या सर्वमान्य राष्ट्रीय नेत्याची भूमिका या परिवर्तनाच्या बाबतीत आपल्यासारखीच आहे असे त्यांना आढळून आले तेव्हा त्यांच्या आशा पुन्हा पल्लवित झाल्या. याच उत्साहाच्या आवेगात त्यांनी Education for our people : A Policy Frame for the Development of Education (१९७८-८७) हा आराखडा तयार केला. हा आराखडा Citizens for Democracy या संस्थेने प्रकाशित केला आहे. या आराखड्यावर देशातील प्रमुख अशा सुमारे चाळीस विचारवंतांच्या सह्या आहेत. ही नामावलीही जे.पी. नाईक यांच्या सर्वसमावेशक उदार अंतःकरणाच्या लोकसंग्रहाचीच निदर्शक आहे.

परंतु सर्वांत प्रमुख गोष्ट म्हणजे या आराखड्याच्या प्रकाशनाला जयप्रकाश नारायण यांची प्रस्तावना आहे. आपल्या प्रस्तावनेत जयप्रकाशजी म्हणतात : " या आराखड्यात हे परिवर्तन कसे घडवून आणावयाचे याविषयी सात सूचना केल्या आहेत, ही गोष्ट सर्वांत महत्त्वाची आहे. त्या सूचना अशा :

"(१) एकूण सामाजिक संदर्भ लक्षात घेऊनच शिक्षणाचे नियोजन केले पाहिजे. सध्याची विषम सामाजिक रचना व विषम वेतनश्रेणी यांत बदल केला पाहिजे. सामाजिक व शैक्षणिक परिवर्तनाचे हे कार्य एकमेकांना पूरक अशा पद्धतीने एकसाथ चालू राहिले पाहिजे.

"(२) आजच्या शिक्षणव्यवस्थेचे रूप बदलले पाहिजे. ती विकेंद्रित, विविधरूपात्मक, लवचिक व गतिशील केली पाहीजे. शिक्षणाचा भर अध्यापनातून ज्ञान ओतत राहण्याऐवजी अध्ययनातून ज्ञान आत्मसात करण्यावर असला पाहिजे. यासाठी प्रासंगिक व अनौपचारिक शिक्षणपद्धतीचाही वापर करावा व केवळ प्रशिक्षित शिक्षक वर्गावरच विसंबून न राहता संपूर्ण समाजाला ज्ञानदान प्रक्रियेत सहभागी करून घ्यावे.

"(३) शिक्षणक्षेत्रात काम करणारे कार्यकर्ते, सामाजिक व राजकीय कार्यकर्ते यांनी एकाच वेळी व एकदिलाने या क्रांतिकारक परिवर्तनाचे आंदोलन सुरू केले पाहिजे.

"(४) शिक्षणव्यवस्थेतील सर्व वातावरण बदलून टाकण्याच्या कार्यक्रमाला अग्रक्रमाचे महत्त्व राहील. ज्ञानार्जन, गुणोत्कर्ष व समाजपरिवर्तन या ध्येयांनी प्रेरित होऊन निरलस निष्ठेने काम करीत राहण्याचे ते वातावरण असेल.

"(५) शिक्षणव्यवस्था जर हेतुपूर्ण व प्रभावी करावयाची असेल तर शैक्षणिक व राजकीय क्षेत्रांत काही कठोर निर्णय घेऊन त्यांची निर्धाराने कार्यवाही करावी






लागेल.

"(६) जनतेत सर्वांत खालच्या स्तरापर्यंत जाऊन काम करण्याची सिद्धता ठेवावी लागेल.

"(७) सामान्य जनतेचे दैनंदिन प्रश्न सोडविण्याच्या जनआंदोलनाचे या व्यवस्थेत महत्त्व असेल. या आंदोलनातून जनतेची अस्मिता जागृत होईल आणि सामाजिक व आर्थिक परिवर्तनाची शक्ती निर्माण होईल. या सर्वांतून इष्ट शैक्षणिक परिवर्तनाला गती मिळेल व शैक्षणिक परिवर्तनातून अभिप्रेत समाजपरिवर्तनही अधिक गती घेईल."

जयप्रकाशजी यानंतर पुढे लिहितात :

"मी या सर्व सूचनांचे हार्दिक स्वागत करतो. या सूचनांची कार्यवाही यशस्वी होणे हे अर्थातच शैक्षणिक, सामाजिक व राजकीय क्षेत्रांतील कार्यकर्ते किती एकदिलाने काम करतात यावर अवलंबून राहील. याहूनही अधिक म्हणजे या ध्येयासाठी व त्याच्या सिद्धतेसाठी करावयाच्या कार्यवाहीसाठी किती गुणी व ध्येयनिष्ठ कार्यकर्ते पुढे येतात यावर या कार्यक्रमाची यशस्विता अवलंबून राहील. भारताच्या इतिहासातील या विशेष कालखंडात शासनापुढे व शैक्षणिक, सामाजिक व राजकीय कार्यकर्त्यांपुढे हे एक भव्य आव्हान उभे आहे. भारतीय जनतेच्या धैर्याने व सुजाणपणामुळे आपले भवितव्य घडविण्याची पुन्हा एकवार ही संधी आपल्याला उपलब्ध झालेली आहे व काळाची निकड ओळखून सर्व कार्यकर्त्यांनी हे अद्वितीय आव्हान स्वीकारावे असे माझे त्यांना आग्रहाचे आवाहन आहे."

पुन्हा एकदा इतिहासाचे चक्र फिरले आणि जे.पी. नाईक यांची ही आशाही विफल झाली. जनता पक्ष कदाचित काही काळ अधिकारावर राहिला असता तरी त्याने जयप्रकाश नारायण यांच्या आवाहनाला किती प्रतिसाद दिला असता याचीही शंकाच आहे. राजकीय निकड असतानाही जे एकत्र राहू शकले नाहीत ते मूलभूत परिवर्तनाविषयीच्या आपल्या कल्पना विभिन्न असताना शिक्षणासारख्या तात्कालिक कमी निकडीच्या कार्यक्रमासाठी निर्धाराने व एकदिलाने उभे राहिले असते अशी अपेक्षा कोण कशी राखू शकेल?

७

शैक्षणिक क्रांतीविषयीचे जयप्रकाश नारायण यांचे विचार व जे.पी. नाईक यांचे विचार इतके मिळतेजुळते होते हा काही केवळ एक अपघात नव्हता. राष्ट्रीय नेत्यांच्या विचार-सरणीशी आपले विचार जुळवून घ्यावेत अशी एखाद्या विचारवंताने केलेली ती तडजोड नव्हती. त्याचप्रमाणे आपल्या समोर आलेल्या एखाद्या आकर्षक क्रांतिकारक विचाराला एक औपचारिक पुरस्कार लिहावा अशीही जयप्रकाश नारायण यांच्या पुरस्काराच्या मागील भावना नव्हती. दोघेही आपापल्या परीने व पद्धतीने ही विचारसरणी मांडण्याचा अखंड प्रयत्न करीत होते. जयप्रकाश नारायण यांच्याशी दूरान्वयानेही आपली तुलना होणे जे.पी. नाईक यांना रुचले नसते; परंतु त्या दोघांच्याही जीवनातील त्यागमय कार्याची प्रेरणा एकच होती. जे.पी. नाईक शासकीय मार्गाने काही घडविता येईल या आशेने जवळजवळ दोन दशके दिल्लीला धडपडत राहिले व या शासकीय यंत्रणेतून एका विशिष्ट मर्यादेपलीकडे काही घडविता येणार नाही, अशा निष्कर्षापर्यंत शेवटी येऊन पोहोचले. शासकीय यंत्रणेतून समाजाचे मूलभूत परिवर्तन होणार नाही या विचाराने जयप्रकाश नारायण यांनी शासनाकडे निर्धाराने पाठ फिरविली व जनजागृती करण्याचे विविध प्रयत्न केले. त्यांच्याही पदरी शेवटी उदात्त विफलतेखेरीज काही पडले नाही. या सर्वांचे विश्लेषण करावयाचे तर खोल विवेचनात शिरावे लागेल. तो या लेखाचा हेतू नाही.

१९७५ मध्ये पुणे विद्यापीठात दिलेल्या टागोर व्याख्यानमालेत 'समता, गुणवत्ता व संख्या : भारतीय शिक्षणक्षेत्रातील एक चकवा देणारा त्रिकोण' (Equality, Quality and Quantity: The Elusive Triangle in Indian Education) या विषयावरील आपल्या विवेचनाचा समारोप करताना जे.पी. नाईक म्हणाले होते :

"सामाजिक व शैक्षणिक पुनर्रचना एकाच वेळी साध्य करण्याचा हा प्रयोग जर यशस्वीपणे सिद्ध करावयाचा असेल तर त्यासाठी एका राष्ट्रव्यापी जनआंदोलनाची आवश्यकता आहे. या आंदोलनाच्या पाठीशी राजकीय सामर्थ्य पूर्णपणे उभे असलेले पाहिजे व या आंदोलनात प्रत्येक व्यक्तीने हिरिरीने सहभागी झाले पाहिजे. दुर्दैवाने राज-कारणाच्या क्षेत्रात शिक्षणाला अगदी कोपऱ्यात स्थान मिळते आणि राजकीय चर्चांत किंवा वादविवादांत मूलभूत शैक्षणिक प्रश्नांवर कधी प्रकाशझोत टाकला जात नाही. आपल्याला एकतर आज अस्तित्वात असलेल्या राजकीय पक्षांचे

शिक्षणक्षेत्रातील समस्यांच्या महत्त्वाविषयी व ते प्रश्न सोडविण्याच्या निकडीविषयी प्रबोधन करावे लागेल किंवा या प्रश्नांविषयी निकराची आस्था असणाऱ्या नव्या सामाजिक आणि राजकीय शक्ती निर्माण व्हाव्या लागतील."

यानंतर जे.पी. नाईक जे म्हणाले त्यावर त्यांच्या जीवनचरित्राची छाया आहे, त्याचप्रमाणे त्यांना जयप्रकाश नारायण यांच्याशी वैचारिक व भावनात्मक पातळीवर जोडणारा तो महत्त्वाचा धागाही आहे. जे.पी. नाईक म्हणाले होते :

"या महान प्रयोगाची आखणी करण्यासाठी व तो प्रयोग यशस्वीपणे सिद्ध करावयाच्या प्रयत्नात गांधीजींचे विचार उपयुक्त आहेत, त्याचप्रमाणे मार्क्सचेही विचार उपयुक्त आहेत. गांधीवाद व मार्क्सवाद यांच्यातील परस्पर विचारविनिमयाची आज गरज आहे. गांधीवाद-मार्क्सवाद यांमधील अशा वाद-सुसंवादातूनच भारताच्या विशिष्ट सांस्कृतिक परिस्थितीच्या संदर्भात शैक्षणिक व सामाजिक पुनर्रचनेचे काही प्रभावी कार्यक्रम आपल्या हाती लागू शकतील व त्यांची आपल्याला यशस्वीपणे कार्यवाही करता येऊ शकेल." या उद्‌गारांच्या मागे जे.पी. नाईक यांना त्यांच्या शिक्षणक्षेत्रातील कार्यातून आलेला कोणता अनुभव होता?

(१) राज्यकर्त्या पक्षाला शिक्षणक्षेत्रातील परिवर्तनाविषयी कोणतीही आस्था नाही, याचे गमक म्हणजे त्या पक्षाने या प्रश्नाचा मूलभूत विचार कधी केला नाही व एखादे क्रांतिकारक धोरण स्वीकारून त्याप्रमाणे कणखरप्रमाणे कार्यवाही करावयाचे आपले उत्तरदायित्व आहे असे मानले नाही. याचाच परिणाम म्हणून जे.पी. नाईक ज्या सूचनेचा आग्रह धरीत होते ती सूचना – म्हणजे भारताचे पंतप्रधान व सर्व राज्यांचे मुख्यमंत्री यांची केवळ याच विषयाची चर्चा करण्यासाठी बैठक व्हावी व मूलभूत काही निर्णय त्या बैठकीत घेतले जावेत – कधीच कार्यवाहीत येऊ शकली नाही. काँग्रेस पक्ष सत्तेवर असताना नाही किंवा जनता पक्ष सत्तेवर आल्यानंतरही नाही. शिक्षण हा एक व्यासपीठावरून गौरविण्याचा व व्यवहारात उपेक्षा करण्याचा विषय आहे अशीच याविषयीची नेहमीची भावना राहिली . शिक्षणखाते हे त्यातल्या त्यात कमी राजकीय प्रभावाच्या पक्षातील कार्यकर्त्याला मिळावयाचे हा जवळजवळ संकेतच झाला.

(२) विरोधी राजकीय पक्षातही शैक्षणिक क्रांतीविषयी कोणाचा आग्रह नव्हता. कोणती भूमिका घेतली असता आपण अधिक लोकप्रिय होऊन आपल्याला अधिक मते मिळण्याची शक्यता आहे, या दृष्टिकोनातूनच विरोधी पक्षही शैक्षणिक प्रश्नाकडे पाहत असत. सर्व राजकीय पक्षांचे प्रतिनिधी असणारी समिती शिक्षण आयोगाच्या अहवालाचा विचार करण्यासाठी नेमली गेली हे शेवटी हानिकारकच झाले असे जे.पी. नाईक यांनी म्हटले आहे. राज्यकर्त्या पक्षाने पूर्ण विचार करावा व ठरविलेले धोरण कणखरपणे पार पाडावे हे अधिक इष्ट झाले असते असे साहजिकच त्यांना वाटू लागले.

(३) एखाद्या विधायक स्वरूपाच्या कार्यक्रमावर सर्व राजकीय पक्ष एकत्र येऊन काम करतील ही आशाही फोल आहे असे आढळून आले. काँग्रेस व विरोधी पक्ष यांमधील अविश्वासाचा प्रश्न सोडला तरी जनता पक्ष या नावाखाली आपले स्वतंत्र अस्तित्व विलीन केलेले राजकीय पक्षही प्रौढशिक्षण योजनेसारखा मूलभूत महत्त्वाचा विधायक कार्यक्रम राबवितानादेखील आपले मूळचे हितसंबंध बळकट करण्याचा प्रयत्न करतात असे आढळून आले.

हे सर्व परिवर्तन राजकीय पक्षांनाच निर्धाराने करावे लागेल, त्यांनी ते केले नाही तर अन्य कोणीच ते करू शकणार नाही असे आग्रही उद्‌गार जे.पी. नाईक यांनी काही ठिकाणी काढले आहेत. ज्या पद्धतीची क्रांती आपल्याला अभिप्रेत आहे त्यासाठी आवश्यक असणाऱ्या सामाजिक, आर्थिक, राजकीय क्रांतीशी बांधिलकी असलेला कर्तृत्वशाली राजकीय पक्ष दीर्घकाळ अधिकारावर असणे आवश्यक आहे, या अर्थाने हे विधान निरपवाद समजावयास हवे. परंतु अशी संधी दीर्घकाळ लाभलेला काँग्रेस पक्ष हा वरिष्ठ वर्गांचेच प्रामुख्याने प्रतिनिधित्व करीत राहणार ही गोष्ट स्पष्ट झाल्यानंतर व त्या पक्षाला बाजूला करणारा विविध पक्षांचा समुदाय असा जनता पक्ष कधी खऱ्या अर्थाने क्रांतिकारक एकसंध प्रभावी पक्ष होईल, ही आशा मावळल्यानंतर जे.पी. नाईक यांना आपल्या नैराश्यातून बाहेर पडण्यासाठी खरा मार्गच उपलब्ध राहिला नाही.

या कालखंडातच जे.पी. नाईक यांनी पुण्यात भारताच्या शैक्षणिक समस्येवर एक व्याख्यान दिले होते. जे.पी. नाईक यांना ज्यांच्या विषयी स्नेहादराची भावना होती असे एक त्यांचे सहकारी, कार्यक्रमाच्या योजनेप्रमाणे, त्यांच्या भाषणावर त्या सभेतच टीकाटिप्पणी करणार होते. आपल्या भाषणात हे सहकारी म्हणाले - 'जे.पी. नाईक यांच्यापुढे जी खरी समस्या उभी आहे तिचा तर्कसुसंगत निष्कर्ष जर






काढावयाचा असेल तर जे.पी. नाईक यांना आपले इतर स्वरूपाचे कार्य बाजूला ठेवून आज समाजपरिवर्तनासाठी झगडणारे जे युवकांचे गट आहेत त्यांच्या पाठीशी उभे राहिले पाहिजे.'

मला त्या वेळी त्यांचे हे उद्‌गार थोडेसे अनुचित वाटले होते. आज मला ते तितकेसे तसे वाटत नाहीत. परंतु आपल्याला जर या पद्धतीचे शैक्षणिक परिवर्तन अभिप्रेत असेल तर त्यासाठी आवश्यक त्या स्वरूपाच्या सर्वांगीण क्रांतीसाठी प्रयत्नशील असणे निकडीचे आहे, या निष्कर्षापासून शिक्षणक्षेत्रात कार्य करणाऱ्या व मूलभूत निकड असणाऱ्या लोकांना फार काळ दूर राहता येणार नाही. या निष्कर्षापर्यंत न येता केलेले शैक्षणिक सुधारणांचे व संशोधनाचे कार्य हे अगदीच विफल नसले तरी त्याला काही अत्यंत मर्यादित असेच यश येणे अटळ आहे.

जे.पी. नाईक यांना याची जाणीव होती. राजकीय पक्षांच्या आधाराखेरीज जर हे कार्य करावयाचे असेल तर अपक्ष भूमिकेतून समाजपरिवर्तनाच्या क्षेत्रात प्रत्यक्ष काम करणारे गट अधिक कसे प्रभावी होतील हे पाहिले पाहिजे. या भूमिकेतून या सर्व गटांच्या कार्यात काही एकसूत्रता आणता येते काय हे पहावे, या हेतूने त्यांनी महाराष्ट्रातील पंधरा-वीस अशा गटांच्या कार्यकर्त्यांची एक बैठक घडवून आणली होती. याखेरीज समाजपरिवर्तनाच्या क्षेत्रात ध्येयवादी शिक्षक, प्राध्यापक सहभागी करून घेता आले तरी परिवर्तनाच्या कामाला गती येईल अशी त्यांची धारणा होती व ती त्यांनी वेळोवेळी मांडलेलीही आहे. शिवाजी विद्यापीठाच्या प्राध्यापक संघटनेने 'प्राध्यापक व समाजपरिवर्तन' या विषयाचा विचार करण्यासाठी बोलाविलेल्या परिषदेत त्यांनी उत्साहाने प्रमुख भाग घेतला होता व त्या परिषदेच्या निष्कर्षाविषयी ते आशावादी होते. या दोन्ही प्रयत्नांचे आजवरचे प्रत्यक्ष फलित हे मर्यादितच राहिले आहे.

प्रत्यक्ष व्यावहारिक आचरणाचे कितीतरी कार्य करावयाचे राहिले आहे हे जसे खरे आहे त्याचप्रमाणे, गांधी-वाद व मार्क्सवाद यांचा समन्वय करण्याची भारतीय परिस्थितीत आवश्यकता व शक्यता आहे हे मान्य केले तरी, त्या तात्त्विक विचारमंथनाचेही कितीतरी काम अद्याप व्हावयाचे आहे. जे.पी. नाईक यांच्या मनोधारणेतून या प्रश्नाकडे पाहणाऱ्या सर्वजणांच्या समोर ही आव्हाने उभी आहेत.

८

परिस्थितीने जे.पी. नाईक यांच्या आशावादाची कठोर कसोटी पाहिली. एक स्वभावधर्म म्हणून आणि या निराशेवर उतारा म्हणून त्यांनी अखंड आपल्याला नव्या नव्या कल्पनांत, प्रयोगांत गुंतवून ठेवले. आपल्या मित्रांना ते काही वेळा म्हणत : 'ही माझी अफू आहे; ती मला घेऊ द्या.' या उद्‌गाराच्या मागे एक तीव्र वेदना लपलेली होती. शिक्षणाच्या समस्येवर बोलताना जे.पी. नाईक नेहमीच उत्कटतेने बोलत. अशाच एका भाषणाच्या शेवटी स्वतःविषयी ते म्हणाले :

'शेवटी मी तरी कोण आहे?
A child crying in the night
A child crying for the light
With no voice but a cry.

'With no voice but a cry' हे म्हणताना त्यांचा आवाज कातर झाला होता व त्यांच्या डोळयात पाणी तरारले होते.

एका भव्य उदात्त विफलतेचा तो आर्त विव्हल उद्‌गार होता.

◆◆◆

ज्याला शिकण्याची इच्छा नाही त्याला शिकविण्याचा प्रयत्न करू नये.

ज्याला शिकण्याची इच्छा आहे त्याला काहीही शिकवता येते.

ज्याला काहीही शिकण्याची इच्छा नाही असा एकही माणूस जगात नाही.

कोणाला काय शिकवायचे आहे हे ओळखून त्याला ते शिकविण्याची व्यवस्था करणे हे शिक्षणव्यवस्थेचे कार्य आहे.

जिज्ञासा जागृत करतो, अधिकाधिक प्रखर करतो व ती शमविण्याचे मार्ग आपले आपण कसे शोधावेत याचे मार्गदर्शन करतो तोच खरा शिक्षक -

नव्हे,
परात्पर गुरु.

- देवदत्त दाभोलकर

# शिक्षण व समाज परिवर्तन : स्वप्न, वास्तव आणि आशा

देवदत्त दाभोलकर

**प्रारंभ**

माझ्या विवेचनाचा आशय प्रारंभीच स्पष्ट करून ठेवणे उपयुक्त होईल असे मला वाटते. तो असा :

१. शिक्षण हे समाजपरिवर्तनाचे प्रभावी साधन होऊ शकते व व्हावयास हवे.

२. परंतु अनेकद्दा शिक्षण हे स्थिती व समाज-रचनेच्या हातातील एक अमोघ शस्त्र होते व परिवर्तनाला विरोधक होते.

३. यातील प्रागतिक भूमिकेकडे शिक्षणाला नेले जाऊ शकते. ते दुष्कर आहे. परंतु अशक्य नाही. किंवहुना, 'एषः पन्था, एतत् कर्म, नान्यः पन्था विद्यते अयनाय।' अशा अटळतेचे आहे.

४. या प्रयत्नात शिक्षणाशी संबंधित सर्व घटकांचा सहभाग हवा. विद्यार्थी, शिक्षक, पालक, शिक्षणसंस्था, शासनसंस्था व एकूण सर्व समाज या सर्वांचाच या प्रक्रियेत सहभाग हवा.

५. पुरोगामी, प्रतिगामी असे या घटकांपैकी कोणाचे वर्गीकरण करता येणार नाही. प्रत्येक गटाचे स्वरूप व्यामिश्र असू शकते. किंवहुना निखळ एका वर्गात बसणारा गट, संस्था, व्यक्ती सापडणे अशक्यप्राय आहे. यामुळे अडचण आहे, परंतु आशाही आहे. कारण निखळ पुरोगामी असे कोणी नाही त्याचप्रमाणे निखळ प्रतिगामी असेही कोणी असत नाही. प्रत्येकाचे अधिकाधिक पुरोगामी परिवर्तन करता येणे त्यामुळेच शक्य आहे.

६. हे मिश्रण सर्वच स्तरावर व सर्वत्र अधिकाधिक पुरोगामी कसे होत जाईल; व त्यासाठी व्यावहारिक दृष्ट्या काय करता येईल हाच महत्त्वाचा प्रश्न आहे.

७. सर्व प्रयत्न त्या दिशेने व्हावयास हवेत. प्रत्यक्ष कार्यक्रमाविषयी वादविवाद व मतभेद होऊ शकतील. परंतु केवळ भांडणतंडण होता कामा नये व मतभेद तर होताच कामा नयेत. भारताला आजच्या परिस्थितीत ही चैन परवडणारी नाही.

८. या सर्व प्रयत्नांत महत्त्वाचा व विशेष कृतिशील घटक शिक्षक हाच असणार आहे. पुरोगामी परिवर्तनासाठी प्रयत्नशील असणे हे त्याचे सामाजिक व व्यावसायिकही उत्तरदायित्व आहे.

९. या लेखाचा मुख्य भर Formal Education मधील शक्यतांवर असला तरी Non-Formal Education, Informal Education, Education through mass action हीही शिक्षणाची महत्त्वाची अंगे आहेत याची जाणीव आपण ठेवली पाहिजे. Formal System चा ऱ्हास होऊ द्यावयाचा व ते अपयश झाकून ठेवण्यासाठी Non-Formal ची रंगरंगोटी करावयाची अशी आत्मवंचना शिक्षणक्षेत्राकडून होत नाही याची आद्य दक्षता घेतली जावयास हवी. त्यानंतर समाजपरिवर्तनाच्या दृष्टीने या इतर शिक्षणपद्धतींचे महत्त्व ओळखून शक्य तेथे Formal system या सर्वांना पूरक काम कसे करू शकेल व स्वतः त्यातून किती आणि कशी प्रेरणा घेऊ शकेल याचे अवधान राखले पाहिजे.

१०. प्रत्येकाने निदान स्वतःपासून प्रारंभ केला पाहिजे.

**काय, मेकॉले हे म्हणाला?**

मेकॉले. याचे नाव उच्चारले की वेगवेगळ्या प्रतिक्रिया मनात येतात. भारतातील संस्कृतमधील व एकूणच ज्ञानाच्या स्तराविषयी त्यांच्या मनात अवहेलनेची भावना होती. परंतु 'हिंदुस्थानची राज्यरीति' या विषयावरील पार्लमेंटमधील आपल्या भाषणात मेकॉले म्हणाला :

'Are we to keep people of India ignorant in order that we may keep them submissive? Or do we think that we can give them knowledge without awakening ambition? Or do we mean to awake ambition and to provide it with no legitimate vent? Who will answer any of these questions in the affirmative?'

(भारतातील लोक आपल्याला नेहमी दबून असावे







अनुक्रमणिका

म्हणून आपण त्यांना अज्ञानात ठेवणार आहोत काय? त्यांना आपण ज्ञान दिले की त्यांच्या महत्त्वाकांक्षा जागृत होतील अशी भीती आपल्याला वाटते काय? आणि अशा महत्त्वाकांक्षा जागृत झाल्या की त्या आकांक्षांच्या पूर्तीसाठी आपण त्यांना वाव ठेवणार नाही का? या सर्व प्रश्नांना 'हो' असे उत्तर देण्याची हिंमत इथे कोणास आहे, सांगा.)

मेकॉले आपल्या भाषणात पुढे म्हणाला :

'We are free, we are civilized to little purpose, if we grudge to any portion of the human race an equal measure of freedom and civilization.'

(आपण स्वातंत्र्याची, संस्कृतीची कदर करतो असा आपला दावा असतो. परंतु ते स्वातंत्र्य, ती संस्कृती मानवजातीच्या दुसऱ्या वंशांना देण्यात आपण जर कांकू करत असू तर त्या आपल्या दाव्याला अर्थ तो काय राहिला?)

मेकॉले हे आपल्या इंग्रज बांधवांना सांगत होता. हिंदु समाजाला त्या आधीच्या सहस्रावधी वर्षात कोणी हे सांगितले नाही. अपवाद विवेकानंदांचा. वर्णवर्चस्वाचे साधन म्हणून शूद्रांना ज्ञानापासून हेतुपुरस्सर वंचित ठेवण्यात आले.

याचे परिणाम महात्मा फुले यांनी 'इतके अनर्थ एका अविद्येने केले' (विद्येविना मती गेली, मतीविना नीती गेली, नीतीविना गती गेली, गतीविना वित्त गेले, वित्ताविना शूद्र खचले, इतके अनर्थ एका अविद्येने केले.) या आपल्या एका कवनात सांगितले आहेत. मेकॉले व फुले यांचे हे दर्शन आता तरी भारताने प्रामाणिकपणे व कृतिशीलतेने स्वीकारले आहे असे म्हणता येईल काय?

**फुले, आगरकर परंपरा**

महात्मा फुले यांच्याइतकेच कडवट प्रहार लोकहितवादींनीही ब्राह्मणवर्गावर केले आहेत. आपल्या क्र. ६५ च्या पत्रात ते लिहितात :

"मागील पत्रांत धर्मसुधारणा लिहिली आहे. ती बहुतांस भयंकर व कितीएकांस दुर्घट वाटून किती एक पंडित आणि शास्त्री पुराणांतील वाक्ये, वर्णसंकर, कला आदि म्हणतील हे मला कळत आहे. परंतु, महाराज, तुम्ही विचार कराल तर हा वर्णसंकर नव्हे. आता आहे तो वर्णसंकर खरा. जे ब्राह्मण भडवेपणा करतात, त्यांस तुम्ही पंक्तीस घेता व नीतीमान शूद्रास नीच मानता हा वर्णसंकर खरा. शास्त्राचा आधार माझ्या मतास पुष्कळ आहे व तुम्ही विचार केला असता सापडेल. वेडात शिरू नका. ही धर्मसुधारणा केल्याशिवाय तुमचा बंद खुला होणार नाही."

महात्मा फुल्यांनी असा शास्त्राचा आधार शोधण्याचाही प्रयत्न केला नसता. त्यांचे आघात सरळ व स्वतंत्र होते. नवीन परिवर्तनासाठी आवश्यक अशा शैक्षणिक कार्याचा प्रारंभही त्यांनी शूद्रांसाठी, स्त्रियांसाठी शाळा व आधारकेंद्रे काढून केला. लोकहितवादी या प्रत्यक्ष कृतीच्या क्षेत्रात उतरले नाहीत. परंतु त्यांचीही धारणा तशीच होती. ते सांगतात : 'वास्तविक पाहिले तर कैकाडी लोक हे सुधारल्याच्या अंशी ब्राह्मणासारखे होतील, हे खचित आहे.' (पत्र क्र. ३८)

ब्राह्मण वर्गाला समाजपरिवर्तनाची प्रेरणा देण्याच्या हेतूने लोकहितवादी 'शतपत्रे' पूर्ण करताना लिहितात (पत्र क्र. १००) :

'तुमच्या प्राचीन काळच्या विद्या, ग्रंथ, तर्क व कल्पना यांचे शंभरपट आता चांगल्या विद्या व अधिक कल्पना निघालेल्या आहेत त्या सर्व पहा... धर्म-सुधारणा करा, म्हणजे टाकू नका, परंतु त्याचा अर्थ घ्यावयाचा तसा काळ पाहून घ्या... विद्या अधिक घेऊन तुमचे पाऊल पुढे पडू द्या. सर्व देशाची काळजी प्रत्येक जणाने करावी. राज्य कसे चालले आहे व राजा कोण, त्याची वर्तणूक कशी हे पाहत जा. माहीतगार व्हा... विद्या केली तर त्याप्रमाणे वागणूक पाहिजे; नाहीतर विद्या व्यर्थ आहे. विद्येचे सार्थक रोजगार नव्हे, ती मजुरी आहे. विद्या म्हणजे ज्ञान, जेणेकरून मनुष्य निर्मळ होतो, विचारी होतो, समर्थ होतो. विद्येपासून द्रव्यलाभही होतो, व दुसरे अनेक लाभ होतात.'

विद्या आणि समाजपरिवर्तन यांच्या परस्पर-संबंधाची चर्चा या कालखंडात व एकूण एकोणिसाव्या शतकात दुहेरी अंगांनी होत होती. सामाजिक सुधारणेचे अंग व राष्ट्रीय आंदोलनाचे अंग. यात तरतम भाव कसा करावा याबद्दल मतभेद होते व ते तीव्रही होते. परंतु तरीही सामाजिक अंगाला राष्ट्रीय व राष्ट्रीय अंगाला सामाजिक प्रगतिशील अशी आंतरिक अस्तरे धुरीणांच्या मनोभूमिकेत होती. वादाचा क्षोभ बाजूला ठेवला तर याची जाणीव अशा प्रतिपक्षीयांना होती.

लोकहितवादींच्या सामाजिक आवेशाला तितक्याच

आवेशाने निबंधमालेत उत्तर दिल्यानंतर विष्णुशास्त्री चिपळूणकर लिहितात :

'आता एवढेच सांगून पुरे करतो की, लोकहितवादींचा उद्देश जसा लोकात यथाशक्ति ज्ञानप्रसार करण्याविषयीचा होता व अद्याप आहे, तशीच आमचीही गोष्ट आहे. शिवाय हे ज्ञान भासरूप किंवा मिथ्या नसता ते यथार्थ व सत्य असावे असाही आमचा संकल्प आहे... आता दोघांच्या नजरेस जी गोष्ट आपापल्या परीने खरी वाटते त्यात भेद का पडावा असे कोणास कदाचित वाटेल, पण हा भेद मनुष्यस्वभावासच लागला आहे असे समजावे. लोकांत जसे रुचिवैचित्र्य आढळते तसे मतवैचित्र्यही दृष्टीस पडावयाचेच. फार तर काय, पण आपल्या ठिकाणीही समजुतीचा फेर किती होत असतो? ... दर एक पिढीत शेकडो विषयांवर याप्रमाणे मतांतर होत जाणे हा सृष्टिक्रमच आहे; व हे मतांतर कोणत्याही प्रकारे अनिष्ट नसून लोकांच्या विवेचनशक्तीचा प्रवाह अप्रतिबद्ध होत्साता चालू आहे याचे हे अत्यंत अभिनंदनीय निदर्शन होय.'

हाच धागा पुढेही चालू राहिला. विष्णुशास्त्री चिपळूणकर, टिळक, आगरकर यांनी न्यू इंग्लिश स्कूल पुण्यात स्थापन केले. त्यातून चार वर्षांनंतर डेक्कन एज्युकेशन सोसायटीची स्थापना झाली. "Cheapening and facilitating of education" असे तिचे ध्येय म्हणून सांगण्यात आले. परंतु ती केवळ काळाशी केलेली तडजोड होती व भारताच्या पुनरुत्थानासाठी एक महत्त्वाचे साधन म्हणून हे तिघेही शिक्षणक्षेत्राकडे वळले होते हे आता सांगावयास नको. "लब्धप्रकाश इतिहास निसर्गमाने" अशीच त्या तिघांचीही (सावरकरांप्रमाणे) ग्वाही होऊ शकते. त्यांच्या प्रतिपक्षीय समकालीनांनाही ते मान्य होते. "लोकमान्य टिळक : आठवणी व आख्यायिका" (खंड तिसरा) या ग्रंथाच्या आपल्या प्रस्तावनेत खापर्डे लिहितात :

"परंतु आगरकर, टिळक हे लोक बुद्धीपुरस्सर, विशेष प्रकारचा हेतू मनात धरून देशभक्तीच्या उद्योगास लागले होते. आरंभापासून शेवटपर्यंत त्यांच्या देशभक्तीचा आविष्कार एकच राहिला होता असे म्हणावयाचे नाही; तर पुढे कोणच्या तरी कारणाने ते देशभक्तीकडे वळले नसून पहिल्यापासूनच त्यांनी आपल्या जीविताची तशी योजना आखलेली होती होती असे सांगावयाचे आहे."

चिपळूणकर या शैक्षणिक कार्याला सुरुवात केल्यानंतर वर्षभरातच गेले. टिळकांनी काही वर्षांनी सोसायटी सोडून राजकारणात प्रवेश केला. 'मला मी माझ्या आयुष्याच्या ध्येयापासून दूर होत आहे असे वाटते' अशा शब्दांत त्यांनी आपल्या राजीनामापत्रात आपली खंत व्यक्त केली आहे. आगरकरही सोसायटीला दहाएक वर्षेच लाभले. परंतु या तिघांच्याही तेजाचे वलय आजही या संस्थेच्या नावाला संरक्षण देत उभे आहे. नामदार गोखले, महर्षि कर्वे आदि नावांनीही ती झळाळी कायम ठेवावयास मदत केली. आजीव सदस्यत्वाच्या प्रतिज्ञेची वर्षे पूर्ण केल्यावर गोखले यांनी सोसायटी सोडून सार्वजनिक क्षेत्रात शिरताना केलेले भाषण प्रसिद्ध आहे. (Farewell address to the Fergusson College). त्यात ते म्हणाले : "मी आता महासागरात प्रवेश करत आहे. तेथे कशी वादळे येतील, माझे काय होईल, माझे तारू शेवटी किनाऱ्याला लागेल की नाही हे कोणी सांगावे?"

**मर्यादा**

शिक्षण आणि समाजपरिवर्तनाच्या संदर्भात याठिकाणी काही गोष्टी आपण लक्षात घेण्यासारख्या आहेत असे मला वाटते :

१. शासकीय शिक्षणक्षेत्राच्या चौकटीतच हे काम चालले होते. अनुदान मिळाले नाही तरी चालेल परंतु आम्ही या पद्धतीनेच काम करू असा आग्रह कधीच धरला गेला नाही असे नाही. परंतु तसे प्रसंग अपवादात्मक आले व तसे निर्णायक नव्हते.

२. शिक्षणक्रमातून (क्रमिक किंवा पूरक) विद्यार्थ्यांची सामाजिक, राष्ट्रीय कृतिप्रवणता वाढविण्याचा सजग प्रयत्न केला गेला नाही.

३. राष्ट्रीय स्तरावर ज्यांची उंची सर्वमान्य झाली अशी माणसे या संस्थेत आली, कार्यरत राहिली यातून अप्रत्यक्ष जो प्रभाव विद्यार्थी वर्गावर पडला तेवढ्या प्रमाणातच ही प्रेरणा दिली-घेतली गेली अशा स्वरूपाचे काम होऊ शकले.

४. यातूनच प्रेरणा घेऊन त्याच वृत्तीने नंतर संस्थेत व इतरत्र काम करणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या मर्यादित राहिली.

याच स्वरूपाचे कमी-अधिक स्तरावरचे अनुभव नंतरच्या काळात स्थापन झालेल्या शिक्षणसंस्थांना आले. परंतु

समाज परिवर्तनाच्या दृष्टीने पाहिले तर त्यांच्या कामाच्याही याच मर्यादा राहिल्या.

### युवक संघटना

Formal system मधून या स्वरूपाचे काम चालू असतानाच त्याच्या समाजपरिवर्तन, राष्ट्रनिर्माण याच्या दृष्टीने असणाऱ्या मर्यादाही स्पष्ट होत होत्या. शिक्षणसंस्थांत काम करणारे लोक स्वतः कितीही क्रांतिकारक वृत्तीचे असले तरी जोपर्यंत त्या संस्था शासकीय अनुदानावर आधारित आहेत तोपर्यंत या मर्यादा अटळ आहेत. परकीय सत्ता असताना तर त्या मर्यादा अधिक जाचक असणारच. याच्या उलट, पारतंत्र्याच्या काळात संवेदनशील युवामनातील प्रतिक्रियाही अधिक तीव्र असणार.

आव्हानाचे युवक मनाला आकर्षण असते. किंवहुना, आव्हानाचे ज्याला आकर्षण असते त्यालाच युवक समजावे अशी युवकाची व्याख्याही करता येईल. स्वातंत्र्य संपादनाचे आव्हान या काळात युवापिढीपुढे उभे होते. तशा प्रकट प्रचाराला संघटनेला शिक्षण संस्थांत अवसर नव्हता. साहजिकच बाहेर अशा संघटना उभ्या राहिल्या. राष्ट्रीय स्वयंसेवक संघ व राष्ट्र सेवादल या अशा महाराष्ट्रातील संघटना होत. त्यांच्या ध्येयाविषयी, कार्यपद्धतीविषयी मतभेद होऊ शकतील. ती चर्चा आपल्याला याठिकाणी अभिप्रेत नाही. परंतु या दोन्ही कालखंडांत त्यांचा हा बहर ओसरला असला तरी अजूनही तो संपुष्टात आलेला नाही व आधी तयार झालेल्या कार्यकर्त्यांपैकी अनेकांनी नंतर आपापल्या क्षेत्रात नजरेत भरण्यासारखे कार्य केले यात शंका नाही. परंतु यात शिक्षणक्षेत्राचे योगदान किती?

'जवळजवळ शून्य' असेच या प्रश्नाचे उत्तर द्यावे लागेल. वरील वृत्तीच्या कार्यकर्त्यांनी ज्या शिक्षणसंस्था स्थापन केल्या त्यातून त्या त्या वृत्तीचे काही संस्कार देण्याचे प्रयत्न झाले. परंतु विद्यार्थ्यांवरील त्याचा परिणाम फार नव्हता. शिक्षक म्हणून निर्वाह करून आपापल्या पूर्वाश्रमीच्या संघटनांना पूरक कार्य बाहेरच्या क्षेत्रात करीत राहणे हेच कामाचे मुख्य स्वरूप राहिले.

### स्वातंत्र्य संपादनानंतर

भारत स्वतंत्र झाल्यानंतर या परिस्थितीत काही फरक पडला का? दुर्दैवाने या प्रश्नाचे उत्तर 'मूलभूत काहीही फरक पडला नाही' असेच द्यावे लागते.

### असे का झाले?

१९५० च्या सुमारास वल्लभभाई एका सभेतील आपल्या भाषणात म्हणाले : "दुर्दैवाने आम्ही अशा जाळ्यात अडकलो आहोत की -"

याला प्रतिसाद म्हणून विनोबाजी म्हणाले होते : "एखादा मोठा विचारवंतही असे म्हणाला असता तर ते आम्ही समजू शकलो असतो. परंतु शासनाची सूत्रेच ज्यांच्या हाती आहेत ते लोकच जेव्हा असे म्हणतात... जाळे कितीही विकट असेना, ते तोडलेच पाहिजे. स्वातंत्र्यात जसा जुना झेंडा चालू शकत नाही, त्याचप्रमाणे जुनी शिक्षणव्यवस्थाही चालता कामा नये."

जाळे तुटले का?

'नाही'.

भारतात उच्च स्तरातील वीस-तीस टक्के लोकांचेच वर्चस्व राहत आलेले आहे हे याचे कारण आहे. मॅकॉलेला दीडशे वर्षांच्याही पूर्वी जे उमगले ते या लोकांना आजही उमगत नाही. कोणताही राजकीय पक्ष याला अपवाद नाही. साक्षरतेच्या प्रसारात साम्यवादी पक्षांची सरकारे आघाडीवर आहेत ही गोष्ट खरी; परंतु सर्वोच्च स्तरापर्यंत गुणवत्ता व समान संधी यांचा शिक्षण क्षेत्रात प्रभावी आग्रह धरणारा एकही राजकीय पक्ष नाही हे कशाचे गमक समजावयाचे? (अनेक दशकांपूर्वी त्यावेळी केंद्रीय नियोजन मंडळाचे सदस्य असणाऱ्या एका सदस्यांना मी म्हणालो "S.C. व S.T. यांच्या शैक्षणिक परिस्थितीचे जसे अभ्यास झाले आहेत तसे ओबीसींचेही झाले पाहिजेत." ते मला म्हणाले : "त्यातून आपण गांधीलमाशांचे मोहोळ मात्र उठवू." त्यानंतर काही वर्षांनी मंडल आयोगाने हे मोहोळ उठवले व नव्या प्रश्नांना परिवर्तनवादी भूमिकेतून सामोरे जाण्याचे आव्हान आपल्यापुढे उभे केले इतके तर खरे.)

### युवक आणि समाजपरिवर्तन

भारतात आज सुदैवाने (होय सुदैवानेच) प्रत्येक क्षेत्रात अनेक आव्हाने उभी आहेत. तशी ती शिक्षणक्षेत्रातही आहेत. मंडल आयोग हे त्याचे केवळ एक अंग झाले. आव्हाने

शोधत, स्वीकारत जातो तो युवक अशी आपण युवकाची व्याख्या केली आहे. स्वातंत्र्यपूर्व काळातील आव्हानांचे स्वरूप ढोबळ व स्पष्ट होते. आजच्या परिस्थितीत आव्हानांचे स्वरूप गुंतागुंतीचे व प्रथमदर्शनी तितकेसे आकर्षक नाही. परंतु पीडितांना, दलितांना न्याय मिळालाच पाहिजे या ध्येयानेही अनेक स्वतंत्र राष्ट्रांतील तरुण प्रेरित होत आलेले आहेत. ध्येयवाद जितका उत्कट व बौद्धिक क्षमता जितकी अधिक तितकी ही प्रवृत्ती अधिक. (तीव्र बौद्धिक क्षमता असणारे अनेक जण 'करिअर'च्या मागे लागतात, त्याचप्रमाणे त्यांच्याच बौद्धिक क्षमतेचे काही 'करिअर'कडे पाठ फिरवून तळागाळात जाऊन काम करतात, हाही जगात सर्वच राष्ट्रांत येणारा अनुभव आहे.) असे विद्यार्थी शिक्षणसंस्था व शिक्षक यांच्या मार्गदर्शनाची किंवा मदतीची अपेक्षा राखत नाहीत. अनेकदा या दोघांनाही या 'भानगडी'पासून स्वतःला दूर ठेवावयाचे असते.

मला 'भाटघर आचार संहिते'विषयीची बैठक आठवते. काळ सुमारे तीन तपांपूर्वीचा. राजकीय पक्षांसाठी आचारसंहिता ठरवावी म्हणून समाज प्रबोधन संस्था व गोखले इन्स्टिट्यूट यांनी ही तीन दिवसांची बैठक आयोजित केली होती. राजकारणातील व वैचारिक क्षेत्रातील महाराष्ट्रातील प्रमुख सुमारे पंचवीस जण उपस्थित होते. धनंजयराव गाडगीळ, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, शंकरराव देव, कॉम्रेड डांगे, मधु लिमये, यशवंतराव चव्हाण यांचा नामनिर्देशही बैठकीच्या महत्त्वाचा पुरेसा निदर्शक व्हावा.

शिक्षणक्षेत्राशी संबंधित लोकांच्या आग्रहाने 'विद्यार्थ्यांना राजकारणापासून अलिप्त ठेवावे' असे धोरण संमत झाले. दुसऱ्या दिवशी यशवंतराव चव्हाण आल्यानंतर मधु लिमये यांनी आपला याविषयीचा आधीच व्यक्त केलेला विरोध परत मांडला व यशवंतराव चव्हाण यांना त्यांचे मत विचारले. यशवंतराव म्हणाले, "मला मधूची भूमिका मान्य आहे. किंबहुना मी त्यावेळी असा सहभाग घेतला नसता तर मी आज मुख्यमंत्री झालो नसतो."

शिक्षणसंस्था व शिक्षक यांच्यासमोर सतत उभी असणारी ही समस्या आहे. आपल्या देशात, त्याप्रमाणे अन्य देशांतही. या समस्येचे नेमके उत्तर आज कोणाकडेच नाही व कोणाला ते कधी सापडेल अशी शक्यताही नाही. हे उत्तर कालसापेक्ष, परिस्थितीसापेक्ष असेच राहणार. परंतु ही आपल्यापुढील समस्याच नाही अशी भूमिका कोणाला घेता येणार नाही.

भारतात आज या स्वरूपाचीच परिस्थिती नाही काय? बुद्धिमान युवकांचे डोळे अमेरिकेत जाऊन तेथेच स्थायिक होण्याकडे लागलेले आहेत. सामाजिक जाणीव फारच कमी युवकांत आढळते व जी काही ठिकाणी आढळते ती तिचे नीट संगोपन झाले नाही तर करपून जाईल अशाच परिस्थितीत आहे. हे संगोपन केवळ राष्ट्रीय सेवा योजना सारखे प्रकल्प राववून करता येत नाही हा आपला दीर्घकाळचा अनुभव आहे. संस्थात्मक रचना हे केवळ आधार, संरक्षण देणारे कुंपण होऊ शकते. समाजपरिवर्तनाच्या प्रेरणेची रोपे विद्यार्थ्यांच्या मनात वाढवायाची असतील तर समाजमानसाची भूमी सकस असावी लागते किंवा ती तशी तयार करावी लागते, व प्रागतिक विचारधारेचे सिंचन त्या रोपांवर होत राहावे लागते.

खरी अडचण त्यापुढेच येते. ही भावना जागृत झाल्यानंतर कृतिशीलतेचा प्रश्न अटळपणे पुढे येतो. महाराष्ट्र स्तरावरील अशा स्वरूपाच्या एका प्रयत्नात सुमारे चार दशकांपूर्वी कार्यवाह म्हणून मी सहभागी होतो. मी अध्यक्षांना म्हटले : "युवक जेव्हा जागृत व नंतर कृतिशील होतील तेव्हा त्यांच्या पाठीशी आपण उभे राहिले पाहिजे." त्यांनाही ते मान्य होते. परंतु त्यानंतर त्या प्रयत्नाने गती घेतली नाही.

ही समस्या अशी विविध कारणांनी विकट आहे. तिचे उत्तर आज कोणाकडेच नाही. नाही म्हणावयास एक अनुभव मात्र काही दिलासा देणारा आला. पुणे विद्यापीठात कुलगुरू म्हणून काम करताना एक छोटासा प्रयोग मी केला. त्यामागची संकल्पना अशी होती

ग्रामीण भागातून येणारे विद्यार्थी सुटीत आपापल्या घरी जातात. त्यांच्या जाण्यायेण्याच्या खर्चाचा वा निवास-भोजन खर्चाच्या व्यवस्थेचा प्रश्न निर्माण होत नाही. त्यांनी महिनाभरात आपल्या खेड्यात लोकशिक्षणाचे किमान दहा कार्यक्रम घ्यावेत. त्याविषयींचे प्रशिक्षण आधी त्यांना देण्यात येईल. मात्र आयोजन संपूर्ण त्यांनीच करावयाचे. खर्चासाठी त्यांना पन्नास रुपये देण्यात येतील. पहिल्या वर्षी ७५ विद्यार्थ्यांनी भाग घेतला. दुसऱ्या वर्षी पाचशे विद्यार्थी सहभागी झाले. तिसऱ्या वर्षी प्रयोग म्हणून मी पन्नास रुपये न द्यावयाचे ठरवले (ही माझी चूक झाली असेच मला आता वाटते) व





मुळीच प्रतिसाद आला नाही. अजूनही एखाद्या संस्थेत हा प्रयोग पुन्हा राबवून पाहण्यात मला रस आहे.

या विद्यार्थ्यांना ते जाण्यापूर्वी व सुटीहून परत आल्यानंतर मी भेटत असे. सहज लक्षात येण्यासारखा फरक म्हणजे त्यांचा आत्मविश्वास वाढलेला असे. याहूनही काही चांगले अनुभव आले. एक विद्यार्थी म्हणाला, मला माझ्या खेड्यातील सावकार म्हणाला, 'हे तू लोकांना का सांगतोस? तू सांगू नकोस; मी तुझा कॉलेजचा खर्च करीन.' अन्यत्र मी एका खेडेगावात अचानक गेलो. विद्यार्थ्याने धावपळ करून सभा घेतली. लोक जमवले. सरपंच आपल्या भाषणात म्हणाले, "या मुलाच्या कामामुळे आम्हाला नवी दृष्टी मिळाली. इतके दिवस आम्ही समजून चाललो होतो की या कॉलेजात जाणाऱ्या विद्यार्थ्यांचा आणि आमचा काही संबंध नाही. हे लोक काखोटीला ट्रॅन्झीस्टर लावून गाणे वाजवत फिरणार आणि मग आम्ही त्यांच्यासमोर आमची टोपी तिरकी ठेवूनच फिरणार."

या दोन्ही गोष्टी या क्षेत्रात अनेक वर्षे वावरत असूनही मला नवीन होत्या. जे अज्ञान सहज दूर करता येण्यासारखे आहे त्याच्या अस्तित्वामुळे इतक्या मोठ्या प्रमाणावर शोषण होऊ शकत असेल असे मला वाटले नव्हते. त्याचप्रमाणे जे ग्रामीण विद्यार्थी शहरात न्यूनगंडाच्या भावनेने वावरतात तेच विद्यार्थी आपल्या गावकऱ्यांपासून असे तुटत असतील हेही माझ्या लक्षात आले नव्हते.

त्यावेळी प्रकाशचंद्र चंदर केंद्रीय शिक्षणमंत्री होते. ते मला म्हणाले : तुमच्या प्रयोगाविषयी मी अनेक ठिकाणी बोललो.

परंतु ही साधी गोष्ट सहजपणे न होण्यामागील कारण मात्र तसे साधे नाही. शिक्षण आपण समाजपरिवर्तनासाठी वापरणार, की आजच्या समाजातील हितसंबंधी गटांचे स्वार्थ सांभाळले जावेत म्हणून समाजाला स्थितिजड ठेवण्यासाठी वापरणार या मूलभूत प्रश्नाचे निर्धारपूर्वक उत्तर दिल्याखेरीज आपल्याला पुढचे पाऊल टाकता येत नाही.

परंतु आपल्याला म्हणजे कोणाला?

दुसऱ्याकडे आरोपी म्हणून एक बोट दाखवताना आपल्याच हाताची तीन बोटे आपल्याकडे वळलेली असतात हे लक्षात घ्या अशा आशयाचे एक इंग्रजी वाक्य आहे.

आजच्या परिस्थितीला विद्यार्थी, शिक्षणसंस्था, पालक, शासन, एकूण समाज जबाबदार आहे असा तर्जनीनिर्देश आपली तीन बोटे आपल्या दिशेने वळलेली असतात हे प्राध्यापक-अध्यापक वर्गाने ओळखले पाहिजे.

असे विधान केले की त्याच्या तीव्र प्रतिक्रिया उमटतात असा माझा अनुभव आहे. तसे होणे स्वाभाविकही आहे.

### का, कोणी, कशासाठी?

प्राध्यापक-अध्यापक वर्गाकडे वळण्यापूर्वी एकूण पार्श्वभूमीचेच विश्लेषण आपल्याला मान्य आहे की नाही हे प्रत्येकाने स्वतःच्या मनाशी ठरवावे लागेल. मला मान्य असलेले विश्लेषण Education for Our People (१९७८) मध्ये आलेले आहे. त्या सर्व मांडणीवर माझी स्वाक्षरी आहे आणि अजूनही मला ते विश्लेषण जसेच्या तसे मान्य आहे.

'नवभारत'च्याच अलीकडच्या अंकात (जानेवारी २००३) ती आली असल्यामुळे ती पुन्हा येथे देत नाही. परंतु आजची विषमतेवर आधारलेली व्यवस्था बदलून शिक्षणाची समान संधी सर्वांना उपलब्ध व्हावी यासाठी आपण तळागाळापर्यंत प्रयोग-प्रबोधन आंदोलन उभे केले पाहिजे अशा आशयाची ती मांडणी आहे. ही मांडणीच मान्य नसणाऱ्या विचारशीलांशी मुक्त चर्चा करण्यात मला रस आहे.

हे विश्लेषण ज्यांना मान्य असेल त्यांच्या दृष्टीने मग वैचारिक बैठकीची समस्या राहत नाही. मग उरतात त्या कार्यवाहीच्या व्यावहारिक समस्या. त्याही अत्यंत बिकट अशाच आहेत; परंतु मनाशी दिशा तरी स्पष्ट झालेली असते.

### शिक्षक, शिक्षण आणि समाजपरिवर्तन

अशा प्रयत्नात प्राध्यापक-अध्यापकांचा सहभाग ही तर यशाची अटळ अट आहे. केवळ एवढी अटच पुरी होणे पुरेसे नाही याची मला जाणीव आहे, परंतु ही अट पुरी केली तर त्यातूनच नंतर इतर (विद्यार्थी, शिक्षणसंस्था, शासन, एकूण समाज) घटकांच्या सहभागाचे मार्ग आपोआप मोकळे होत जातील. या वर्गाचे असे महत्त्व तरी का आहे?

१. प्राथमिक स्तरापासून विचार केला तर आज सुमारे पन्नास लाख लोक शिक्षक आहेत.

२. संरक्षण खर्चावर होणाऱ्या खर्चाखालोखाल आपल्या राष्ट्रात शिक्षणावर खर्च होतो. आज राष्ट्रीय








उत्पन्नाच्या तो सुमारे पावणेचार टक्के आहे. या दशकात हे प्रमाण सहा टक्क्यांपर्यंत नेण्याची शासनाची घोषणा आहे.

३. सेनादलापेक्षा हे दल मोठे आहे व जनमानसावरील पकडीच्या दृष्टीने अधिक प्रभावीही असावायास हवे. नव्या पिढीची जडणघडण या वर्गाच्या हाती असते. आपल्या शक्तीचे भान कधी या वर्गाला झाले (जसे अचानक अन्य काही वर्गांना झालेले आपण पाहतो) तर हा वर्ग सहज उभा देश हलवू शकेल. स्वातंत्र्य, समता, लोकशाही, धर्मातीत वृत्ती, कर्तव्यदक्षता या वृत्ती जर या वर्गाने आत्मसात् केल्या तर तो त्या प्रेरणा विद्यार्थ्यांत व समाजमानसातही निर्माण करू शकतो.

४. आणि हे या वर्गाने केले नाही तर? मीठच जर आळणी झाले तर त्याला कशाने चव आणता येईल? स्वतः जागृत राहणे, शिक्षण क्षेत्रात व समाजपरिवर्तनात कृतिशील असणे, व वैचारिक नेतृत्व समाजाला पुरवणे हे या वर्गाचेच उत्तरदायित्व आहे.

### शिक्षणक्षेत्रातील परिवर्तन

शिक्षणक्षेत्रातील परिस्थिती अगदी असमाधान-कारक आहे हे भारतात एक सर्वमान्य सत्य आहे. (फक्त प्रत्येक घटक याची जबाबदारी आपल्या अंगावरून झटकून दुसऱ्याच्या अंगावर टाकण्याचा प्रयत्न करतो इतकेच.) भारतातील विद्यार्थी स्वतःच्या पायावर उभे राहून मानाचे जीवन जगू शकतील असे शिक्षण त्यांना आपण देत नाही. तसे सर्वांना व्यवसाय उपलब्ध राहू शकतील अशी आपली आर्थिक रचनाही नाही. नोकरी क्षेत्रातही त्यांना नोकऱ्या मिळत नाहीत कारण आपल्या शिक्षणव्यवस्थेतून तयार झालेले बहुसंख्य विद्यार्थी केवळ बेकार असतात असे नव्हे तर ते नोकरी देण्याच्या लायकीचे नसतात. (They are not unemployed but unemployable.) यात विद्यार्थ्यांचा दोष नाही, आपल्या शिक्षणव्यवस्थेचा, अध्यापनाचा, परीक्षापद्धतीचा आहे. आम्हाला योग्य शिक्षण मिळत नाही अशी तक्रार घेऊन विद्यार्थी ग्राहक संरक्षण कायद्याखाली नुकसानभरपाई मागू लागतील हा काळ फार दूरचा आहे असे मला वाटत नाही. त्यांच्या आयुष्याची अमोल सहा वर्षे घेऊन जर आम्ही त्यांच्या हातात बाहेर काही किंमत नसलेला एक प्रमाणपत्राचा कपटा देत असू तर त्यांची मागणी योग्यच म्हटली पाहिजे.

हे एक असे क्षेत्र आहे की ज्यात बाहेरील वातावरणात कितीही विरोधी असले तरी शिक्षक व शिक्षक संघटना महत्त्वाचे बदल घडवून आणू शकतात. अधिक ज्ञान स्वतः मिळवावे, अधिक ज्ञान विद्यार्थ्यांना द्यावे, चांगले अध्यापन करावे, परीक्षा नीट घेतली जावी व मूल्यमापन योग्य व्हावे अशा कार्यक्रमाला अन्य कोणाचा अल्पकालीन व हितसंबंधामुळे काही काळ विरोध होऊ शकेल; परंतु तो योग्य उदाहरणांनी, आदर्शांनी व संघटनांच्या सामर्थ्याने दूर करता येईल. अधिक खर्च न करता अधिक चांगले शिक्षण विद्यार्थ्यांना मिळाले तर ते कोणाला नको आहे?

या रचनेत, आज अधिक खर्च न करता असेही गृहीत धरले आहे. आज जर शिक्षणक्षेत्रात कोणत्या अधिक विनियोगाची (खर्चाची) गरज असेल तर ती चिंतनाच्या, विचाराच्या विनियोगाची आहे. हा कोठारी आयोगाचा निर्देश योग्यच आहे असे मी मानतो. शिक्षणक्षेत्रावरील एकूण खर्चापैकी ऐंशी टक्क्यांहून अधिक खर्च शिक्षकांच्या वेतनावर होतो ही वस्तुस्थिती आहे. त्यांच्या कार्यक्षमतेत वाढ झाली व ते राष्ट्रीय ध्येयवादाने प्रेरित झाले तर त्या शक्तीचे सामर्थ्य आजच्या दुपटीने तरी वाढवायास हरकत नाही. या रचनेत कोणालाही अकार्यक्षम लोकांना कार्यक्षम होण्याचा अवसर देण्याची व ती कार्यक्षमता तीन वर्षांच्या कालावधीत त्यांनी उचित पातळीपर्यंत वाढविण्याचा आग्रह धरण्याची कल्पना मात्र आहेच आहे. कोणत्याही प्रामाणिक शिक्षकाला या रचनेत भय नाही, अप्रामाणिक, निरुपयोगी शिक्षकाला संरक्षण नाही.

हे काही नवीन सांगितले जात आहे का? ठरावीक कालावधीनंतर शिक्षकाचे पुनर्मूल्यमापन रशियात अपेक्षित होते. यामुळे अनेकांची नोकरी जाते का, या प्रश्नाला त्यांचे उत्तर, 'तसे घडत नाही, कारण प्रत्येकजण ती दक्षता घेतोच' असे होते.

आपल्याकडे शिक्षक संघटनांना हे मान्य होईल का? पुनर्मूल्यांकनाची रचना तुम्ही ठरवा व तुम्हीच समाजाला पटेल, रुचेल अशा पद्धतीने पुनर्मूल्यांकन तुम्हीच करा, असे म्हटले तरी किती संघटना यासाठी तयार होतील. किती शिक्षक हे आव्हान स्वीकारतील?

शिक्षक संघटनांनी शिक्षकांना अधिकाधिक संरक्षण मिळवून देण्याचा प्रयत्न करणे योग्यच आहे (विनोबा तर म्हणाले होते - त्यासाठी तुम्ही खून केला तरी मला










चालेल.) परंतु ती शिक्षकांची संघटना असेल तर शिक्षकांचे उत्तरदायित्व शिक्षकांनी राष्ट्रहिताच्या, समाजहिताच्या दृष्टीने पार पाडले पाहिजे याविषयीही तिने आग्रह राखला पाहिजे.

सहसा हे कोणत्याच 'कामगार' संघटनेत घडत नाही. असा आग्रह नेतृत्वाने धरला तर ते नेतृत्वच बाजूला फेकले जाते. नव्याने येणाऱ्या खुल्या स्पर्धेत 'कामगार' संघटनांनाही हे परवडणारे नाही. याची जाणीव हळूहळू कामगारांनाही होऊ लागली आहे. आपली कार्यक्षमता वाढली नाही तर स्पर्धेत आपला व्यवसाय टिकणार नाही व आपण पूर्णपणेच बेकार होऊ हे त्यांच्या लक्षात येऊ लागले आहे.

ही गोष्ट शिक्षणक्षेत्रातील लोकांच्या लक्षात याहून अधिक आग्रहाने आली पाहिजे. आपण तयार केलेले विद्यार्थी जर योग्य कसाचे नसतील तर राष्ट्रच जागतिक स्पर्धेपुढे टिकणार नाही व सारेच रसातळाला जातील याचे भान शिक्षकांना आले की ते व्यावसायिक सुरक्षितता सांभाळून (व ती अंतिमतः सांभाळली जावी यासाठीही) गुणवत्तेच्या व कार्यक्षमतेच्या स्तराची दक्षता घेतील.

ही दक्षता घेताना अनेक तपशील पहावे लागतील, काही अग्रक्रम ठरवावे लागतील, परिवर्तनाच्या काळात काही अटळ तडजोडीही स्वीकाराव्या लागतील; परंतु मूळ दिशा जर निश्चित असेल तर ते अशक्य नाही. एकेकट्यानेही आपल्या मर्यादित क्षेत्रात अशी परिवर्तने घडवून आणल्याची उदाहरणे जगात, भारतात व महाराष्ट्रातही आहेत.

### शिक्षणक्षेत्राबाहेरील परिवर्तन

आम्ही शिक्षक म्हणून आमचे काम नीटपणे पार पाडले की आमचे कर्तव्य संपले, त्यानंतर इतर सामाजिक कार्याची जबाबदारी आमच्यावर का टाकता, हा एक सहज सुचणारा प्रश्न आहे. याचे काहीसे अप्रत्यक्ष विवेचन विद्यार्थी व सामाजिक परिवर्तन याविषयीच्या चर्चेत येऊन गेले आहे. विद्यार्थी हा समाजाचा एक अत्यंत सजग असा घटक असतो व असावयास हवा. या घटकाशी सतत जिवंत संबंध असणाऱ्या शिक्षकवर्गाला मग या संदर्भात उदासीन राहून कसे चालेल? नागरिक म्हणून तो आपल्या कर्तव्यात चुकला की नाही हा एक वेळ एक वेगळा प्रश्न मानता येईल, परंतु शिक्षक म्हणून तो अपुरा पडला हे तर निश्चित आहे.

आम्हाला निखळ ज्ञानार्जन करू द्या, इतर गोष्टी आम्हाला सांगू नका, तेवढी सवडच आम्हाला मिळत नाही असेही एखादा शिक्षक-प्राध्यापक म्हणू शकेल. प्राथमिक शिक्षकाच्या मागे अनेक उपऱ्या कामांचा ससेमिरा लावला जातो अशी त्या शिक्षकांची तक्रार ऐकू येते. तिच्यात तथ्य असलेही; आणि ज्ञानसंपादन व अध्यापन या कामावरच विपरित परिणाम होत असेल तर असा ससेमिरा अयोग्यच होय असे म्हटले पाहिजे. परंतु पैशाच्या खर्चापेक्षा, विचाराच्या विनियोगाने, परस्पर समजुतीने व सहकार्याच्या वृत्तीने यातील अनेक गोष्टींचा परिहार होऊ शकेल असे मला वाटते. शासन, जिल्हा परिषदा, नगरपालिका, प्राथमिक शिक्षक यांच्या सामंजस्याने हा प्रश्न कदाचित सुटू शकेल. कदाचित तो सुटण्याच्या मार्गातील अडचणी कोणत्या आहेत हे लक्षात येईल व त्या अडचणींचा परिहार अन्य कोणत्या मार्गाने होऊ शकेल का याचा शोध घेता येईल.

प्राध्यापकांची गोष्ट थोडी वेगळी आहे. अवांतर कामांचा त्यांच्यावर असणारा बोजा कमी असतो. त्यांना तशी सवड प्रामुख्याने ज्ञानार्जन व संशोधन यासाठी ठेवलेली असते. जगात ज्ञानाच्या कक्षा झपाट्याने विस्तारत चालल्या असताना आपापल्या विषयात ज्ञान आज कोणत्या सीमारेषेपर्यंत येऊन पोहोचले आहे हे शिक्षकाला माहीत असले पाहिजे. खरे ज्ञानार्जन म्हणजे काय हे ध्यानात येण्यासाठी संशोधनाची प्रक्रियाही त्याने अभ्यासिलेली असली पाहिजे. या दोन गोष्टींतच माझा सर्व वेळ जातो व माझ्याकडे समाजपरिवर्तनाच्या कामासाठी वेळच उरत नाही असे एखादा प्राध्यापक प्रामाणिकपणे म्हणाला तर, त्याच्या आड मी येणार नाही, परंतु विद्वत्ता व समाजहिततत्परता या दोन्ही दृष्टींनी अग्रेसर असणाऱ्या नावांची मी त्याला आठवण करून देईन. आइनस्टाइन, रसेल ही तर अतिशय ठळक नावे. परंतु अशी अनेक मोठमोठी नावे आहेत. जगात इतरत्र आहेत, भारतात आहेत, त्याप्रमाणे महाराष्ट्रातही आहेत.

असा सामाजिक अनुबंध असणे सर्वच प्राध्यापकांना स्वतःच्या प्रगल्भ जाणिवेच्या विकासाच्या दृष्टीने उपयोगी असते. सामाजिक शास्त्रांतील प्राध्यापकांच्या दृष्टीने तर ते त्यांच्या विषयाच्या अध्ययनाच्या दृष्टीनेही पूरक होते. अशा सहभागामुळे तत्त्व आणि व्यवहार, कायदा आणि त्याची कार्यवाही यातील अंतर लक्षात येते; प्रश्नांची प्रत्यक्ष गुंतागुंत कळते; काही वेळा काही नवे सुचतेही. खरे तर शास्त्रांच्या

प्राध्यापकांना या क्षेत्रात स्वतःच्या अभ्यासाला उपयोगी व समाजालाही हितकारक अशाही काही गोष्टी, काही अभ्यास हाती घेणे शक्य असते.

वंधुआ मजुरां (Bonded labour) च्या संदर्भातील एक प्रयत्न उदाहरण म्हणून व दिशादर्शक म्हणून उपयोगी ठरेल. सुमारे वीस वर्षांपूर्वीची ही घटना आहे. महाराष्ट्रातील वंधुआ मजुरांच्या शोषणाविषयी एका कार्यकर्त्याने सुप्रीम कोर्टाकडे 'रिट पिटिशन' दाखल केला. त्याची चौकशी करण्यासाठी सुप्रीम कोर्टाने एक प्राध्यापक व एक महिला कार्यकर्ती अशी दोघांची समिति नेमली. त्या समितीला असे आढळून आले की केंद्र सरकारने यावावत काही कायदा केला आहे व तो आपण आपल्या राज्यात लागू करण्यासाठी आपल्याला काही तरतुदी करावयाच्या आहेत हे महाराष्ट्र शासनाच्या १९७६ ते १९८४ या दीर्घ कालावधीत लक्षातही आले नव्हते. आपल्या सध्याच्या विवेचनाच्या दृष्टीने महत्त्वाची गोष्ट ही की, या गोष्टीकडे राज्यातील विद्यापीठातील राज्यशास्त्र, समाजशास्त्र, विधिशास्त्र, मानववंशशास्त्र आदी विद्याशाखेतील कोणाचे लक्ष गेले नव्हते. सर्वच विषयांकडे सर्वांना लक्ष देता येईल असे नव्हे; परंतु विषय आपापसात वाटून घेता येतील व नंतर त्यांचा पाठपुरावाही करता येईल. अगदीच आंदोलनाच्या टोकाला गेले पाहिजे असे नाही व ते शक्यही नसते. परंतु त्या मर्यादेत राहून पुष्कळ करता येण्यासारखे आहे व नंतरच्या पूरक साहाय्यासाठी संस्था उभ्या राहत आहेत.

दहा वर्षांच्याही पूर्वी सुप्रीम कोर्टाने, Public Interest Litigation चे तत्त्व मान्य केले. एखाद्या गटावर, समूहावर अन्याय होत असेल तर आता कोणालाही सर्वोच्च न्यायालयापुढे याचिका दाखल करता येते. पूर्वी अशा अन्यायाचा परिणाम ज्या व्यक्तीवर होत असेल अशा व्यक्तीलाच न्यायालयाकडे जाता येत असे.

यानंतर १९८५ मध्ये देशातील लोकांना कायदेविषयक मदत मिळावी म्हणून भारत सरकारने आखलेल्या योजनांच्या संबंधात एक 'अंमलवजावणी' समिती श्री. पी. एन्. भगवती यांच्या अध्यक्षतेखाली नेमली. त्या समितीचे कार्य कसे चालू आहे याची कल्पना नाही. परंतु दरिद्री व दलित लोकांच्या संदर्भात झालेल्या कायद्यांची नीट अंमलवजावणी होत नसेल तर तशा घटना या समितीच्या निदर्शनाला आणाव्यात; समिती प्रथम शासनाकडे दाद मागेल व त्यात यश न आल्यास न्यायलयातही जावे लागेल असे अध्यक्षांनी आपल्या जनतेसाठी काढलेल्या परिपत्रकात म्हटले होते.

हे एक योग्य दिशेचे पाऊल होते व ते कुठे अडले असल्यास त्याला पुन्हा गती दिली पाहिजे. आपल्या कक्षेत राहून या स्वरूपाचे कार्य विद्यार्थी, अध्यापक-प्राध्यापक, शिक्षणसंस्था अशा सर्वांना करता येण्यासारखे आहे. मात्र ती वृत्ती हवी आणि ही एक भारतातील आजची काळाची निकड आहे हे समजाववयास हवे.

हे करावयाचे म्हटले तर त्यात किती अडचणी येतात व किती तात्त्विक व व्यावहारिक तपशीलाचे प्रश्न निर्माण होतात याचा काही अनुभव मला आहे. परंतु आर्थिक विकासाच्या क्षेत्रात श्री. श्रीपाद दाभोलकर यांचे 'प्रयोग परिवार'चे कार्य व सामाजिक क्षेत्रात श्री. नरेंद्र दाभोलकर यांचे अंधश्रद्धा निर्मूलनाचे कार्य मी जवळून पाहत आलेलो आहे. या अशा कार्यात शिक्षणक्षेत्रातील सर्व घटकांना सहभागी होता येईल किंवा अन्य क्षेत्रांत अशीच परिवर्तनशील विधायक कार्ये आपापल्या आवडीप्रमाणे परिस्थितीप्रमाणे उभीही करता येतील. या दोहोंचा तपशील व अन्यही अशा आज चाललेल्या कामांचा तपशील ज्यांना यात रस आहे त्यांना पाठविता येईल.

### आजची काळाची निकड

'आजची काळाची निकड' असा एक निर्देश वर आला आहे. भारतात ही काळाची निकड सतत राहतच आलेली आहे. टी.व्ही.चे आज तरी थांववता न येणारे सांस्कृतिक आक्रमण, मध्यमवर्गात अधिकाधिक मान्यता पावत असलेला चंगळवाद, वाढता भ्रष्टाचार, वाढती गुंडगिरी, वाढती असुरक्षिततेची भावना या गोष्टींनी सर्वच वातावरण आज अस्थिर झालेले आहे. परंतु याखेरीजही मोठे धक्के आपण अलीकडच्या काळात अनुभवलेले आहेत. बावरी मशिदीचे विध्वंसन, उदारीकरण, जागतिकीकरण आदि ते धक्के होत. हे कसे घडले, का घडले, याचे परिणाम काय होतील यावर मोठ्या लोकसंख्येत मोठे मतभेद आहेत व ते सारे प्रश्न सर्वांच्याच आकलनाची आणि कर्तृत्वाची कसोटी पाहणारे झाले आहेत व दीर्घकाळ तसे राहणार आहेत. एक










तर हे प्रश्न आपल्या कर्तृत्वाने नीट सोडवा नाहीतर अशाच गोंधळात वाहत जाऊन नामशेष व्हा असे हे आजचे काळाचे आव्हान आहे.

अशा स्वरूपाची आव्हाने जगाच्या इतिहासात इतर अनेक राष्ट्रांनी समर्थपणे पेलली आहेत. एक कुतुहल म्हणून जगाचे डोळे भारताकडे लागलेले आहेत. एरवी भारताचे काय होते याचे सोयरसुतक जगाला नाही.

परंतु आपला हा जीवनमरणाचाच प्रश्न आहे. आवश्यक ती परिवर्तने आपण भारतात घडवू शकलो नाही तर परिस्थिती आपल्यावर मात केल्याखेरीज राहणार नाही. शिक्षणक्षेत्राची, प्राध्यापक-अध्यापकांची यात विशेष भूमिका असली पाहिजे असे मी मानतो. कारण चिंतन-आकलनाची अपेक्षा या लोकांकडून आहे व हे आकलन नवयुवकांपर्यंत पोहोचवून चंगळवादापासून त्यांना मागे फिरवणे व मंगल प्रेरणा देणे हे कार्य याच लोकांनी करावयास हवे.

**हा लेख प्रसिद्ध झाल्यावर वाचकांच्या प्रतिक्रियांचे स्वागतच आहे. परंतु एक प्रकटन याच ठिकाणी करून ठेवतो. अशा विचारमंथनात व कामाच्या उभारणीत ज्यांना रस आहे त्यांचे चर्चासत्र प्राज्ञपाठशाळा, वाई येथे वा सोयीने अन्यत्र यथावकाश होईल. ज्यांना व्यक्तिशः येणे, शक्य नसेल त्यांनी आपले विचार सविस्तर पाठवले तर तेही उपयुक्त होईल.**

♦♦♦

## मानवी ऊर्जेचा शोध

भारतातील अनेकविध समस्यांचे एकमेव उत्तर : हार न मानणारी अखंड आशावादी प्रयोगशील बांधिलकी.

भारतात दोन ऊर्जा भरपूर प्रमाणात उपलब्ध आहेत परंतु त्यांचा पुरेपूर वापर करण्याची क्षमता भारताने अजून कमावलेली नाही.

एक सूर्याची ऊर्जा व दुसरी मानवी ऊर्जा.

सूर्याच्या ऊर्जेचा पुरेपूर वापर करण्याचे प्रयोग माझा धाकटा भाऊ श्रीपाद याने आयुष्यभर केले. दुसऱ्या ऊर्जेचाही शोध त्याच्या मनात होताच. परंतु आजच्या शिक्षणव्यवस्थेतून काही घडू शकेल यावर त्याचा विश्वास नव्हता.

त्याची आशंका चुकीची होती असे मी म्हणणार नाही, परंतु मी अजून आशावादी आहे व शिक्षणव्यवस्था बदलण्याचे काम हे धावत्या आगगाडीत दुरुस्ती करण्याचा प्रयत्न करण्यासारखे आहे हे विधानही मी मानतो.

मी आशावादी आहे. 'Sardar Sarovar Debate : The debate that wasn't' या माझ्या प्रकाशनाच्या प्रस्तावनेत मी म्हटले आहे, "I am an incorrigible optimist though I know that this could be otherwise stated as, I am an utter fool' (I am quoting from memory पण आशय तोच आहे.) आज एका दशकाच्या काळानंतरही माझ्या या वृत्तीत फरक पडलेला नाही. It is a terminal illness.

शिक्षणविषयक तात्त्विक चर्चेत मी या ठिकाणी शिरत नाही. ती मी अन्यत्र केली आहे. 'Beyond Friendship' चा पाहुणा संपादक म्हणूनही एक दोन अंक संपादित केलेले आहेत. जिज्ञासूंना ते पाहता येतील व वाटल्यास त्यानंतर माझ्याशी चर्चाही करता येईल.

शिक्षणाचा प्रसार तर झालाच पाहिजे. त्याची गुणवत्ताही वाढली पाहिजे व सामाजिक न्यायही सांभाळला गेला पाहिजे. हा त्रिकोण कसा साधावयाचा? या त्रिकोणाचे वर्णन जे. पी. नाईक यांनी 'The Elusive Triangle in Indian Education - Quantity, Quality and Equality' असे केले आहे. जिज्ञासूंना ते पाहता येईल. या संदर्भातील 'Education for All' हे पुस्तकही पाहता येईल. 'भारतीय जनतेचे शिक्षण' या शीर्षकाखाली ते Indian Institute of Education, Pune-29 या संस्थेने प्रकाशितही केले आहे. आज अस्तित्वात असलेला त्रिकोण 'वर्णसत्ता, वर्गसत्ता व राज्यसत्ता' यांचा आहे. याला मी 'The Steel Triangle in Indian Education' असे म्हणतो.

पोलादी त्रिकोणाची घट्ट पकड सैल करून हातातून सतत निसटणारा Elusive Triangle कसा साधता येईल असा हा कसोटीचा प्रश्न आहे.

या क्षेत्रात तात्त्विक विचारमंथनाची आता फारशी कमतरता राहिली नाही. The task is to change it.

आजच्या परिस्थितीत केवळ प्रसाराचे काम करणाऱ्या व्यक्तींचे, गटांचे, संस्थांचे, शासनाचेही मला अगत्य वाटते. परंतु ही कोंडी फोडण्याचा प्रयोगशील प्रयत्न करणाऱ्यांविषयी मला विशेष अगत्य आहे. त्यांच्या परस्पर आदानप्रदान करणाऱ्या परिवारातूनही काही नवे सापडू शकेल. कदाचित break through ही मिळेल, ही आशा मी सोडलेली नाही.

या दृष्टीने आस्था असणाऱ्या सर्व व्यक्तींचे, गटांचे, संस्थांचे (मग त्यांच्या इतर विचारसरणी, राजकीय मतप्रणाली कोणतीही असो) कृतिविचार सत्र आयोजित करण्यात मला रस आहे.

\- देवदत्त दाभोलकर








# महाराष्ट्रातील शिक्षण व समाज परिवर्तन

देवदत्त दाभोलकर

(शिवाजी विद्यापीठ व्याख्यानमाला १९८६)

१

अध्यक्ष महाशय आणि मित्रहो,

शिवाजी विद्यापीठाने आयोजित केलेल्या या व्याख्यानमालेत ही व्याख्याने देताना मला अनेक कारणांनी आनंद होत आहे. पहिले, व्यक्तिगत परंतु महत्त्वाचे कारण असे, की कोल्हापूर हे माझे आजोळचे स्थान व त्यामुळे माझे जन्मस्थान आहे. या दृष्टीने मी जन्मजात कोल्हापूरकर आहे. दुसरे, याहून महत्त्वाचे कारण म्हणजे शिवाजी विद्यापीठाशी माझा अगदी प्रारंभीच्या काळापासून, या विद्यापीठाच्या पहिल्या दशकाच्या कालखंडात, निकटचा संबंध होता. परंतु सर्वात महत्त्वाचे कारण असे की, ज्या विषयावर मी बोलणार आहे त्या 'महाराष्ट्रातील शैक्षणिक परिवर्तन' या विषयाच्या क्षेत्रात कोल्हापूरने अत्यंत महत्त्वाची कामगिरी बजावली आहे. शिक्षण आणि समाज परिवर्तन यांचा अतूट संबंध आहे याची सुप्त वा प्रकट जाणीव महाराष्ट्रातील शैक्षणिक परिवर्तनाच्या प्रयत्नामागे होती. ही जाणीव हा महाराष्ट्रातील शैक्षणिक परिवर्तनाचा एक अनन्यसाधारण असा विशेष आहे असे मी मानतो.

यात अनन्यसाधारण असे काय आहे? जगातील शिक्षणक्षेत्रात काम करणाऱ्या विचारवंतांतही ही जाणीव गेल्या सुमारे दोन दशकांच्या काळातच निर्माण झाली हे लक्षात घेतले तर महाराष्ट्रातील या परिवर्तनाचे वैशिष्ट्य व त्या वैशिष्ट्याचे महत्त्व लक्षात येऊ शकेल. भारतात या जाणिवेचा स्पष्ट आणि प्रखर असा उद्‌गार १९७८ मध्ये प्रसिद्ध झालेल्या 'भारतीय जनतेचे शिक्षण' या निवेदनात आढळून येतो. जयप्रकाश नारायण यांनी या निवेदनाला पुरस्कार लिहिला आहे आणि भारतातील सुमारे चाळीस विचारवंतांनी या निवेदनावर अनुमतिदर्शक स्वाक्षरी केली आहे. आपण सर्व कोल्हापूरकर मंडळी यांच्या दृष्टीने विशेष अभिमानाची गोष्ट अशी, की या निवेदनाचा मसुदा प्रामुख्येकरून भारतातील सर्वश्रेष्ठ शिक्षणतज्ज्ञ जे.पी. नाईक यांनी तयार केलेला आहे. जे.पी. नाईक आणि कोल्हापूर यांच्या जिव्हाळ्याच्या व निकट संबंधाविषयी आपण एकमेकांना काही सांगावयास नको. ते आपल्यात नाहीत याचे दुःख आपणा सर्वांच्या मनात आहे.

माझ्या मनांत ते आणखीही एका कारणासाठी विशेषत्वाने आहे. 'भारतीय जनतेचे शिक्षण' (Education for our People असे त्या मूळ इंग्रजी निवेदनाचे शीर्षक आहे) या निवेदनाचे मुख्य सूत्र सांगते, की शिक्षण आणि समाजपरिवर्तन या दोन्ही क्षेत्रांतील कार्य साथ साथ व परस्परपूरक पद्धतीने चालत राहिले तरच या दोन्ही क्षेत्रांत खरे मूलभूत परिवर्तन होऊ शकेल; एरवी वरवरचे काही काम झाले तरी मूलभूत परिवर्तनाची सुतराम शक्यता नाही. ज्या आग्रहाने या भूमिकेची मांडणी या निवेदनात करण्यात आली त्या आग्रहाने या भूमिकेचा पाठपुरावा करावयास जे.पी. नाईक यांच्यानंतर कोणी पुढे आले नाही हे माझे दुःख आहे.

महाराष्ट्रातील शैक्षणिक परिवर्तनाचा, किंबहुना भारतातील शैक्षणिक परिवर्तनाचा कालखंड ब्रिटिश राजवटीपासून सुरू होतो. ब्रिटिश राजवटीच्या आधीच्या कालखंडातील वैशिष्ट्ये लक्षात घेण्यासारखी आहेत. त्या कालखंडात विद्या ही सामान्यपणे वेदविद्या म्हणून ओळखली जाई व वेदविद्येचा अधिकार हा केवळ ब्राह्मण वर्गापुरताच मर्यादित होता. या खेरीज असणाऱ्या कला आणि विद्या यांचा प्रसार पिढ्यानुपिढ्या त्या त्या कारागिरांच्या वर्गात आणि जातींत वडीलांकडून मुलाकडे या पद्धतीने होत होता. या काळातही भारताने मोठी प्रगती केली होती व ब्रिटिश येण्याच्या आधीच्या काळात अनेक भौतिक क्षेत्रांत भारत कलेच्या कारागिरीच्या दृष्टीने अग्रेसरही होता. परंतु हे सर्व जातिबद्ध होते व बदलत्या परिस्थितीत आपल्या कौशल्याला बाजारपेठेत मागणी उरली नाही तर दुसरीकडे सहजपणे वळता येईल अशी लवचिकता या व्यवस्थेत नव्हती.

या संदर्भात ब्रिटिश राजवटीने दोन मोठे धक्के दिले. इंग्लंडचे भारतावरील साम्राज्य सुस्थिर झाले त्याच कालखंडात इंग्लंडमध्ये औद्योगिक क्रांती पूर्ण होत होती. हा यांत्रिक उत्पादनातून निर्माण होणारा माल भारताच्या

अनुक्रमणिका






बाजारपेठेत येऊ लागला व भारतातील कुटिरोद्योगांना व हस्तोद्योगांना चढाओढीत त्यांच्यापुढे टिकाव धरणे अशक्य झाले. भारतातील जुने व्यवसाय त्यामुळे मोडकळीस आले व कालांतराने नष्ट झाले. या साम्राज्यशाही वर्चस्वाचा राजकीय परिणाम म्हणून भारतात नव्या उद्योगधंद्यांनी जुन्या नष्ट झालेल्या उद्योगांची जागा घ्यावी असेही घडले नाही. कारण भारतीय उद्योगधंद्यांच्या वाढीला – किंबहुना निर्मितीला – ब्रिटिश राजवटीचा साहजिकच विरोध होता. भारताच्या बाजारपेठेतून इतर राष्ट्रांना तर त्यांनी बाजूला ठेवलेच होते, परंतु भारतीयांकडूनही होणारी संभाव्य चढाओढ त्यांना नको होती. जुने मोडले, नवे वाढले नाही अशी भारताची याबाबतची परिस्थिती होती.

भारतातील परिस्थितीहून महाराष्ट्राचे अधिक असे दोन विशेष होते. मराठ्यांनी मोंगलांशी दिलेला यशस्वी सामना व मराठी राज्याचा अठराव्या शतकात झालेला विस्तार यामुळे स्वातंत्र्याच्या भावनेची व विजिगीषु वृत्तीची जोपासना महाराष्ट्रात झाली होती. दुसरी उणी बाजू अशी होती की, याच अठराव्या शतकाच्या कालखंडात प्रत्यक्ष सत्ता पेशव्यांच्या व त्यांच्यामुळे एका विशिष्ट ब्राह्मण जातीच्या हाती राहिल्यामुळे एक स्फोट होऊ पाहणारा कडवटपणा महाराष्ट्रात इतर जातींच्या अंतरंगात साचत होता. या सर्वांचे परिणाम महाराष्ट्रातील शिक्षणाच्या क्षेत्रातील प्रयत्नांवर झाले, त्याचप्रमाणे समाजपरिवर्तनाच्या प्रक्रियेवरही झाल्याखेरीज राहिले नाहीत.

शिक्षणाच्या क्षेत्रात ब्रिटिश राजवटीसमोर असणारा प्रश्न त्यांच्यासमोर असलेल्या राजकीय समस्येमुळे निर्माण झालेला प्रश्न होता. जुन्या कालखंडातील वेदाध्ययनांच्या पाठशाळा किंवा मुसलमानांचे मदरसे तसे चालू ठेवावेत व त्यांना अनुदान द्यावे, हा एक मार्ग होता. दुसरा मार्ग, पाश्चिमात्य पद्धतीचे शिक्षण देण्याची व्यवस्था करावी असा होता. राज्यकर्त्यांच्या दृष्टीने दुसऱ्या मार्गातील अनुकूल बाजू, त्या शिक्षणामुळे इंग्रजी भाषा जाणणारा कनिष्ठ स्तरावरचा नोकरवर्ग त्यामुळे उपलब्ध होईल, हा होता. वरिष्ठ स्तरावरचा प्रश्नच नव्हता, कारण त्या जगात एकोणिसाव्या शतकाच्या जवळ जवळ शेवटच्या चतुर्थ कालखंडापर्यंत भारतीयांना प्रवेशच नव्हता. परंतु कनिष्ठ स्तरावरचा इंग्रजी जाणणारा नोकरवर्ग मोठ्या संख्येने ब्रिटिश राजवटीला हवा होता. कारण त्याखेरीज भारतासारख्या खंडप्राय देशात जनतेशी संपर्क राखणे व तिच्यावर राज्य करणे अशक्य होते. इतक्या मोठ्या प्रमाणावर, खालच्या स्तरावर काम करण्यास तयार असणारे व देशी भाषा शिकणारे इंग्रज लोक आणणे हे अशक्यच होते. त्यामुळे इंग्रजी भाषा येणारा एक नोकरवर्ग तयार करणे हे ब्रिटिश राजवटीचे शिक्षण क्षेत्रातील आद्य उद्दिष्ट ठरले.

हा निर्णय घेण्यातही एक अडचण होती. (पोर्तुगीजांनी भारतावर राज्य केले असते तर पोर्तुगीज भाषा शिकवताना पोर्तुगीजांना ती अडचण वाटली नसती). या कालखंडात इंग्लंडमध्ये लोकशाही सुस्थिर झालेली होती व उदारमतवादी लोकशाही विचारसरणी इंग्लंडमध्ये मिल, स्पेन्सर आदी प्रमुख विचारवंत प्रभावीपणे मांडत होते. आधुनिक विचारांचे हे वारे भारतातील सुशिक्षित वर्गापर्यंत जाऊन पोहोचले तर आज ना उद्या हे लोक अशाच स्वतंत्र लोकशाही पद्धतीच्या स्वराज्याची मागणी करतील, हे इंग्रजांच्या लक्षात आले नव्हते असे नाही. परंतु खऱ्या उदारमतवादी वृत्तीच्या इंग्रजांनी असे घडणे इष्टच होईल असे मानले व आपला उदारमतवाद इंग्लंडच्या भूमीपुरताच सीमित ठेवणारे लोकही इंग्रजी भाषा शिकविण्याला दुसरा पर्याय नाही या निर्णयापर्यंत अगतिक होऊन पोहोचले.

या निर्णयाचा भारतातील केवळ शिक्षणव्यवस्थेवरच नव्हे तर समाजव्यवस्थेवरही परिणाम झाला. संस्कृत भाषेचा अभ्यास जो वर्ग शतकानुशतके करीत आला होता त्याला नवीन भाषा आत्मसात करणे व तिच्यात प्राविण्य संपादन करणे अवघड नव्हते. प्रश्न केवळ एका भाषेकडून दुसऱ्या भाषेकडे वळण्याचा होता. साहजिकच ब्राह्मणवर्गाच्या दृष्टीने ही सुसंधी ठरली. ब्रिटिश राजवटीत व्यक्तिगत विकासाचे इतर सर्व मार्ग बंद झाल्यानंतर सरकारी नोकरी हाच महत्त्वाचा फलदायी व प्रतिष्ठेचा मार्ग शिल्लक राहिला. जनतेवर राज्य करताना जनतेवर आधीच वर्चस्व गाजवणारा एखादा वर्ग मध्यस्थ म्हणून मिळाला तर प्रारंभीच्या काळात तरी ब्रिटिशांच्या दृष्टीने ते इष्टच होते. संस्कृतच्या अध्ययनात व इंग्रजी भाषेच्या अध्ययनात एक मात्र महत्त्वाचा फरक होता. संस्कृतच्या अध्ययनाची दारे इतर सर्वांना बंदच होती, इंग्रजीचे अध्ययन करावयास मात्र कोणताही धार्मिक, शासकीय अडसर नव्हता.

या वस्तुस्थितीचे काही परिणाम होणे अटळ होते. इंग्रजांचे राज्य आल्यामुळे पूर्वीच्या गोंधळाच्या, अराजकाच्या

परिस्थितीतून सुटका झाली व सुरक्षिततेचे सुस्थिर राज्यव्यवस्थेचे वातावरण निर्माण झाले; इंग्रजी विद्येच्या संस्कारामुळे नव्या विद्या, नवे विचार यांचे वारे वाहू लागले; विद्येच्या क्षेत्रात असणारी ब्राह्मण वर्गाची मिरासदारी संपून नवीन विद्येचा अधिकार तत्त्वतः तरी सर्व जाति-जमातींसाठी खुला झाला. यामुळे व अशा विविध कारणांमुळे इंग्रजांचे राज्य हे ईश्वराचे वरदान आहे, अशी भावना काही काही लोकांच्या व समाजघटकांच्या मनात निर्माण झाली. इंग्रजी भाषा हे 'वाघिणीचे दूध' आहे अशी तिची प्रशस्ती स्वदेश, स्वधर्म व स्वभाषा यांचे कट्टर पुरस्कर्तेही करत होते व नवविचारांची वाहक या दृष्टीने पाहिले तर त्या भाषेची त्या कालखंडातील ही प्रशस्ती अनाठायी होती असे म्हणता येणार नाही.

याच वस्तुस्थितीचे अन्य कोणते परिणाम झाले? पहिला परिणाम असा की, त्या काळात आपली परिस्थिती सुधारण्याची व्यक्तीला असलेली एकमेव संधी सरकारी नोकरी असल्यामुळे, ब्राह्मणवर्गाविषयी इतर वर्गांच्या मनात आधीच असलेली असुयेची व द्वेषाची भावना अधिकच तीव्र झाली. आपल्या पूर्वपरंपरेमुळे नवीन विद्या सहजपणे आत्मसात करणे ब्राह्मणांना शक्य झाले व ते पुढे सरकले. दुसरा परिणाम असा झाला की, या मिळालेल्या संधीचेही स्वरूप फार मर्यादित आहे व वरच्या स्तरावरच्या जागा आपल्याला कधीच उपलब्ध होण्यासारख्या नाहीत, हे जसजसे ब्राह्मणवर्गाच्याही लक्षात येऊ लागले तसतसा परकीय राज्याला त्यांचा विरोध आकार घेऊ लागला. या वर्गातीलच काही पुरोगामी लोक पाश्चिमात्य उदारमतवादी नवविचारांच्या प्रभावाखाली सामाजिक सुधारणेचे विचार मांडू लागले. या दोन गटांतील 'आधी राजकीय की, आधी सामाजिक' हा वाद यातून निर्माण झाला. 'आधी राजकीय' अशी भूमिका घेणाऱ्यांचे अग्रणी लोकमान्य टिळक होते. तर 'आधी सामाजिक' या भूमिकेचे प्रवक्ते गोपाळ गणेश आगरकर होते. 'आधी राजकीय' अशी भूमिका घेणारे लोक सामाजिक दृष्ट्या प्रतिगामी वृत्तीचेच होते, की तात्कालिक राजकीय कार्य साधण्यासाठी त्यांनी घेतलेली ती तात्पुरती भूमिका होती, या प्रश्नाची चर्चा आजवर अखंड चालत आलेली आहे व तिचा निर्णायक निवाडा कधी होऊ शकेल असे आज तरी दिसत नाही. परंतु ती भूमिका घेणाऱ्यांचे समकालीन अनुयायी प्रतिगामी वृत्तीचे होते व मागास वर्गांच्या मनांत या भूमिकेची तशीच प्रतिमा उमटलेली होती यात शंका नाही. यातून निर्माण झालेला तिसरा परिणाम असा होता की, शिक्षण क्षेत्रात आपण स्वतंत्र प्रयत्न केल्याखेरीज आपल्या प्रश्नांची तड लागणार नाही अशी भावना ब्राह्मणेतर वर्गाच्या मनात निर्माण झाली, वाढीला लागली आणि बळावली.

या सर्व पार्श्वभूमीवर डेक्कन एज्युकेशन सोसायटीचा १९२० पर्यंतचा इतिहास मोठा उद्बोधक आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकर, टिळक व आगरकर हे डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या संस्थापकांपैकी प्रमुख होत. आपले महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण करण्याच्या आधीपासूनच टिळक व आगरकर आपल्या देशाची व समाजाची उन्नती कशी होईल याचा तळमळीने विचार करीत होते व या कार्यासाठी आपले जीवन वहायचे असेही त्यांनी निश्चित केले होते. या निश्चयापासून दोघेही आमरण ढळले नाहीत. आणि पुढे त्या दोघांत तीव्र मतभेद झाले तरी, जनमानसात आजही त्या दोघांविषयीही नितांत आदराचीच भावना आहे. विष्णुशास्त्री काही अंशी सरकारी नोकरीच्या कामाला कंटाळून नवी खाजगी शिक्षणसंस्था स्थापन करण्याकडे वळले. स्वदेशाच्या उत्कर्षाविषयीच्या त्यांच्या भावनेची तीव्रता निबंधमालेत पानापानावर जाणवण्यासारखी आहे; परंतु ब्राह्मणांच्या बौद्धिक श्रेष्ठतेविषयीचा त्यांच्या जातीय अहंकाराचा दर्पही त्यांच्या सर्व लेखनाला व्यापून राहिलेला आहे. 'ज्ञानाच्या किल्ल्या आमच्यापाशी आहेत; शूद्रांना आमच्याशिवाय तरणोपाय नाही,' अशी त्यांची शूद्रांचा अवमान करणारी भाषा असे.

या त्रिमूर्तीचे शैक्षणिक कार्यासाठी एकत्र येणे या गोष्टीचेही ऐतिहासिक, सामाजिक विश्लेषण करण्यासारखे आहे. 'देशाची स्थिती सुधारली पाहिजे; देशाचा स्वाभिमान जागा केला पाहिजे; परकीयांचे वर्चस्व दूर करण्याची प्रक्रिया सुरू केली पाहिजे, व त्यासाठी शिक्षणाने नवी पिढी तयार करणे हेच प्रभावी साधन आहे' अशी त्या तिघांचीही धारणा होती. यासाठी आवश्यक त्या त्यागाची त्यांची तयारी होती व अशा समवृत्तीच्या सहकाऱ्यांच्या शोधात ते होते. अगदी एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या दोन दशकांपर्यंत पेशव्यांचे राज्य महाराष्ट्रात, निदान पुण्यात होते; ते गेले, याची खंत या प्रयत्नाच्या मागे कितीशी होती की मुळीच नव्हती? इंग्रजी विचारांच्या प्रभावामुळे निर्माण झालेली जाणीव किती उत्कट होती? सुशिक्षितांना सरकारी नोकऱ्या मिळण्याची शक्यता उत्तरोत्तर कमी होत चाललेली आहे, या जाणिवेतून निर्माण






होणारा वरिष्ठवर्गातील असंतोष राजकीय रूप धारण करीत होता, असे घडले काय, अशा अनेकविध प्रश्नांचा तपशिलात अभ्यास करावा लागेल. आपल्याला आश्चर्य वाटेल परंतु नोकरीच्या शक्यता मर्यादित झाल्याचा निर्देश विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी १८८० मध्येच पहिल्या सत्राच्या शेवटी विद्यार्थ्यांना उद्देशून केलेल्या भाषणात केला होता. 'सुट्टीत घरी जाल, तेव्हा वेळ फुकट दवडू नका, खेळा परंतु मन लावून अभ्यास करा; कारण परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रशस्तिपत्रक हातात असले की हमखास उत्तम नोकरी मिळण्याच्या सुवर्णयुगाचे दिवस आता संपले आहेत', असा उपदेश त्यांनी विद्यार्थ्यांना केला होता.

देशाच्या हितासाठी त्यागी तरुणांनी उचललेले पाऊल अशी न्यू इंग्लिश स्कूल व नंतर डेक्कन एज्युकेशन सोसायटी यांच्या प्रस्थापनेविषयी त्या काळात सर्वांची भावना होती व नंतर अनेक दशके तिच्यात भरच पडत गेली. याला शिक्षणक्षेत्रात या संस्थेच्या शाखांनी मिळविलेले दैदिप्यमान यश तर कारणीभूत होतेच, परंतु तितकेच किंवा त्याहूनही अधिक त्या संस्थेच्या आजीव सदस्यांनी राष्ट्राच्या व समाजाच्या जीवनात स्वतःची अशी जी स्वतंत्र स्थाने निर्माण केली तीही कारणीभूत होती. विष्णुशास्त्री, टिळक, आगरकर यांचा निर्देश आपण केलाच आहे. १९२० पर्यंतच पहावयाचे तरीही गोपाळ कृष्ण गोखले, महर्षी कर्वे, रँग्लर परांजपे यांच्यासारखी ठळक नावे नजरेसमोर येतात. यापैकी एखादे नावही कोणत्याही शिक्षण संस्थेला सर्वमान्यता द्यावयास पुरेसे झाले असते, इतर कितीही कार्य केले व अन्य क्षेत्रांतही नाव मिळवले तरी या सर्वांच्या मनात डेक्कन एज्युकेशन सोसायटीविषयी उत्कट जिव्हाळ्याची, आपुलकीची भावना होती. कंडवट वादानंतर दिलेल्या आपल्या राजीनामापत्रात देखील, 'आज मी माझ्या जीवनाच्या ध्येयापासून दूर जात आहे असे दुःख मला झाल्यावाचून रहात नाही' अशा आशयाचे उद्‌गार लोकमान्य टिळकांनी काढले आहेत.

डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या आजीव सदस्य रचनेचे अनुकरण पुढे अनेक शिक्षणसंस्थांनी महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेरही केले. जेझुइट मिशनरी लोकांप्रमाणे त्यागवृत्तीने काम करण्याची ही कल्पना होती. परंतु हिच्या पाठीशी कोणतीही धार्मिक भावना नव्हती. धार्मिक कर्मकांडाची किंवा प्रचाराचीही नव्हती. हा या संस्थेचा विशेष इतक्या सहजपणे अस्तित्वात राहिलेला आहे, की तो एक विशेष आहे हेही सहसा लक्षात येत नाही. या विशेषाचे श्रेय संस्थेच्या संस्थापकांना दिले पाहिजे.

ज्या परिस्थितीत संस्था निर्माण झाली त्या काळाच्या राजकीय मर्यादा स्वीकारण्यावाचून संस्थेला गत्यंतरच नव्हते. यामुळे संस्थेच्या ध्येयधोरणात 'शिक्षण सुलभ व स्वस्त करणे' एवढाच निर्देश होता. राष्ट्रीय वृत्ती जोपासण्याच्या वृत्तीचा निर्देश प्रकट धोरणात करणे शक्य नव्हते. परंतु लोकमान्य टिळकांनी डिसेंबर १९१९ मध्ये आपल्या व आगरकरांच्या तरुणपणीच्या कालखंडाविषयी म्हटले त्याप्रमाणे : 'आम्ही निकृष्ट देशस्थितीच्या विचारांनी भणाणलेल्या डोक्याची माणसे होतो; आणि पुष्कळ विचारानंतर शिक्षणातच आमच्या देशाचा उद्धार आहे असे आमचे मत बनले होते.' अशी तीव्रता असणारे तरुण ज्या शिक्षणसंस्थांतून काम करतात त्या संस्थांची लिखित ध्येय-धोरणे काय आहेत किंवा त्या नेमलेले अभ्यासक्रमच शिकवतात की नाही असे प्रश्न प्रथमदर्शनी वाटते तितक्या महत्त्वाचे राहत नाहीत. शाळा सुरू करतानाच या मंडळींनी समाजजागृतीसाठी वर्तमानपत्रेही सुरू केली होती ही गोष्ट लक्षात घेतली, की हे अधिकच स्पष्ट होते. डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या रीतसर स्थापनेसाठी २४ ऑक्टोबर १८८४ यादिवशी झालेल्या सभेत आपल्या प्रास्ताविक भाषणात वामन शिवराम आपटे म्हणाले : 'शिक्षणाच्या या क्षेत्रात उतरताना आम्ही त्याकडे एक निर्वाहाचे साधन या दृष्टीने पाहत नाही. आमचे ध्येय उच्च आहे. अधःपतित राष्ट्रांना शांततेच्या मार्गाने प्रगत राष्ट्रांच्या बरोबर आणावयाचे असेल तर त्या राष्ट्रांचे भौतिक, नैतिक आणि अध्यात्मिक पुनरुज्जीवन घडवून आणले तरच ते आणता येईल आणि शिक्षण हाच या पुनरुज्जीवनाचा सर्वांत प्रभावी मार्ग आहे असा आमचा विश्वास आहे.'

संस्थेच्या आजीव सदस्यांच्या मनातील हा प्रमुख हेतू ब्रिटिश लोकांना अज्ञात राहिला होता असे मानण्याचे कारण नाही. न्यू इंग्लिश स्कूल मधील पारितोषिक-वितरणाच्या संदर्भात *टाइम्स ऑफ इंडिया* या वृत्तपत्राने आपल्या दिनांक २० फेब्रुवारी १८८४ च्या अंकात लिहिले :

'ही शाळा म्हणजे आपल्या इंग्रजी शिक्षणाचा एक लक्षणीय आविष्कार आहे. ही शाळा पूर्णपणे भारतीय लोक चालवतात, स्वावलंबी आहे, आणि आठशे विद्यार्थ्यांना कमी खर्चात शिक्षण देते. जेझुइट लोकांप्रमाणेच या शाळेच्या संस्थापकांचा शिक्षणाच्या प्रभावावर विश्वास आहे. त्यांच्या

प्रमाणेच हे लोक ध्येयवादी वृत्तीने व अल्प वेतनावर काम करतात. सरकारी नोकरीत शिरली असती तर ही माणसे चांगल्या वेतनाच्या नोकऱ्या मिळवू शकली असती, अशा योग्यतेची ही माणसे आहेत. परंतु जे तत्त्व ते सांगतात त्याचाच ते लोक आचारही करतात. विद्यापीठातील पदवीधरांनी, त्यांना जर स्वाभिमान आणि देशाभिमान असेल तर, परकीय सरकारच्या नोकरीत शिरण्यापेक्षा शिक्षण, वाङ्मय, व्यापार, न्यायालये अशा क्षेत्रांत शिरून नाव कमावणे व आपले स्वतंत्र स्थान निर्माण करणे हे आपले ध्येय समजले पाहिजे, हे ते तत्त्व होय. 'आपल्या देशावर प्रेम करा', असे हे उत्साही तरुण आपल्या विद्यार्थ्यांना सांगणारच. परंतु भुरट्या लोकांनी देशाभिमान शिकविण्यापेक्षा सुशिक्षित लोकांनी तो शिकविला तर ते अधिक चांगले.'

आपली आजीव सदस्यत्वाच्या कालमर्यादेची प्रतिज्ञा पूर्ण करून फर्ग्युसन कॉलेजचा निरोप घेताना १९०४ मध्ये गोपाळ कृष्ण गोखले यांनी एक भावनेने ओथंबलेले अविस्मरणीय असे भाषण केले. त्यात ते म्हणाले :

'नैतिकदृष्ट्या या संस्थेचे विशेष महत्त्व आहे. कारण या संस्थेच्या स्थापनेमागे एक कल्पना आहे. आजच्या काळातील हिंदी लोक प्रतिज्ञापूर्वक एकत्र येऊ शकतात; सांसारिक स्वार्थ व आकांक्षा यांचा सर्वस्वी त्याग करून एका ऐहिक उद्दिष्टाच्या पूर्ततेसाठी उत्साहाने, कळकळीने व निष्ठेने कार्य करू शकतात; जी गोष्ट आज केवळ धार्मिक क्षेत्रात आपल्याला आढळते ती ऐहिक क्षेत्रातही कार्यान्वित होऊ शकते, या कल्पनेने या संस्थेची स्थापना केली गेली.'

या आधी एक वर्ष १९०३ मध्ये भाषण करताना गोखले म्हणाले होते.

'दरवर्षी विद्यापीठांतून शेकड्यांनी पदवीधर बाहेर पडतात. त्यांच्या पैकी, पाच टक्के, चार टक्के, तीन टक्के, दोन टक्के, मी म्हणतो एक टक्कादेखील, तरुण हीन गणल्या गेलेल्या गेलेल्या जातींचे उन्नयन करण्याच्या पवित्र कार्यासाठी जीवन अर्पण करू शकणार नाहीत. का? वृद्ध व समवयस्क मंडळींना मी आवाहन करीत नाही. त्यांची जीवने एका चाकोरीत फार रुळलेली असतात. पण आपल्या समाजातील तरुण मंडळींना मी आवाहन करतो. आपल्या सुशिक्षित तरुण मंडळींनी त्यागाची व देशकार्यास समर्पण करून घेण्याची वृत्ती प्रकट करावी, ही या क्षणाला देशाची अत्यंत निकडीची गरज आहे.'

विद्यार्थ्यांच्या मनाची घडण हे शिक्षणातून समाजपरिवर्तनाचे कळसूत्र आहे. इतर अनेक संस्थांचे राहिले त्याप्रमाणे डेक्कन एज्युकेशन सोसायटीचेही या दिशेचे प्रयत्न अधुरेच राहिले. 'राष्ट्राच्या जिवावर आपले शिक्षण पूर्ण करून नंतर राष्ट्रासाठी काहीही न करणारा प्रत्येक माणूस हा राष्ट्रद्रोही आहे, असे मी समजतो.' या स्वामी विवेकानंदांच्या जळजळीत उद्गाराचा आशय विद्यार्थ्यांच्या अंतःकरणापर्यंत पोचविण्यात आपण फारच अपुरे पडतो.

डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे काम दुसऱ्याही एका महत्त्वाच्या दिशेने अधुरेच राहिले. किंबहुना त्या दिशेचे कार्य तिने हातीच घेतले नाही ही गोष्ट, त्या संस्थेचा सर्व यथार्थ गौरव केल्यानंतरही, तिची मर्यादा म्हणूनच मान्य करावी लागेल. ग्रामीण भागात, मागास वर्गात शिक्षणप्रसाराचे कार्य या संस्थेने हाती घेतले नाही. कर्तृत्ववान, विद्वान् असे अनेक आजीव सदस्य, शैक्षणिक गुणवत्ता व कर्तबगार बुद्धिमान माजी विद्यार्थ्यांची नामावली हीच या संस्थेची यशाची गमके राहिली. ही सर्व यशेही पाहणाऱ्यांचे डोळे दिपवतील अशीच आहेत. परंतु भारताच्या शैक्षणिक समस्येच्या हिमखंडाच्या पाण्यावर डोळ्यांना दिसणाऱ्या भागापेक्षा पाण्याखाली बुडालेला भाग कितीतरी अधिक मोठा आहे व तेथेही कार्य करण्याची गरज अधिकच तीव्र होती.

जोतीबा फुले यांनी परिस्थितीचे वर्णन नेमक्या पद्धतीने केले होते :

विद्येविना मती गेली<br>
मतीविना नीती गेली<br>
नीतीविना गती गेली<br>
गतीविना वित्त गेले<br>
वित्ताविना शूद्र खचले<br>
इतके अनर्थ एका अविद्येने केले.

या अनर्थातून पार पडण्यासाठी बहुजनसमाजाला, दलिताला स्वतंत्रपणे आपापले प्रयत्न करावे लागले.

महाराष्ट्रातील शिक्षण आणि समाजपरिवर्तनाचे ते पुढचे पाऊल होते.

## २

जोतीबा फुले (१८२७-१८९०) हा दलित समाजाचा महाराष्ट्रातील पहिला आवाज होता.

अनुक्रमणिका






ब्राह्मणी वृत्तीची राजधानी असणाऱ्या पुणे शहरातच त्या वृत्तीला विरोध करणारे सुधारक ब्राह्मण निर्माण झाले होते. त्याच कालखंडात जोतीबा फुले यांचे कार्य झाले व त्यांच्या कार्याचे केंद्रस्थान प्रामुख्याने पुणे हेच राहिले. परंतु ब्राह्मण सुधारकांच्या कल्पनेपलीकडचीही कितीतरी दीर्घ उडी जोतीबांनी घेतली होती. आज अखिल महाराष्ट्र फुले यांना मानतो व प्रतिवर्षी त्यांच्या स्मृतीविषयी आदरभाव व्यक्त करतो आणि तरीही जोतीबांची वैचारिक झेप व त्यांची कृतिशील उडी व या दोन्ही गोष्टींमागील त्यांची प्रेरणा याचे आकलन आजही महाराष्ट्रातील लोकांना नीटपणे झालेले आहे असे प्रत्ययाला येत नाही. याला ब्राह्मण अपवाद नाहीत, ब्राह्मणेतर अपवाद नाहीत व सामान्यपणे दलित म्हणून ज्यांचा निर्देश केला जातो ते दलितही अपवाद नाहीत. जोतीबांच्या निधनानंतर जवळजवळ एका शतकाने देखील ही परिस्थिती राहावी यात एका दृष्टीने जोतीबांचा पराभव आहे, तरी त्याच्या उलट या महात्म्याच्या प्रतिभेचा व कर्तृत्वाचा पल्ला केवढा मोठा होता याचे दर्शनही आहे. त्यांच्या जीवनकार्याच्या पैलूंचे स्मरण आजही ठेवणे आवश्यक आहे. आजही आपल्याला सहसा न पेलणारे हे पैलू कोणते?

पहिला पैलू असा की, परंपरागत रूढ हिंदू धर्माची त्यांनी कठोर तपासणी केली व आपल्याला मानवाच्या व्यवहाराची जी तत्त्वे रुचतात त्यांवर आधारित अशा 'सार्वजनिक सत्यधर्म' या आपल्या विचारसरणीचे प्रतिपादन केले. धर्मशास्त्र हे अपौरूषेय आहे व त्यात बदल करण्याचा कोणालाही अधिकार नाही ही भूमिका त्यांनी नाकारली.

धर्मच जर ईश्वरप्रणीत नाही तर त्या धर्माचा आधार सांगणारी वर्णव्यवस्था, जातिव्यवस्था याही ईश्वरप्रणीत नाहीत हे ओघानेच आले. या दृष्टीने त्यांनी समाजव्यवस्थेची तपासणी केली. ब्राह्मणांचे भिक्षुकीशाही, सावकारशाही व नोकरशाही वर्चस्व मोडून काढण्यासाठी त्यांनी ब्राह्मणजातीवर कडक टीका केली. याच बरोबर समाजातील आर्थिक विषमता व त्यातून निर्माण होणारे प्रश्न यांचीही जोतीबांना जाणीव होती. समाजव्यवस्थेच्या सामाजिक अंगांची त्यांना सखोल जाण होती व आर्थिक शोषणामुळे गरीब शेतकऱ्यांचे जीवन कसे हीन दीन झाले आहे याचे तीव्र भान होते. जोतीबांच्या जीवनकार्याचा हा दुसरा पैलू होता.

तिसरा महत्त्वाचा पैलू असा होता की, त्यांनी या मांडणीत आपली विशिष्ट जात आणि इतर जाती असा भेद केला नाही. शोषक आणि शोषित अशी वर्गवारीच त्यांना अभिप्रेत होती. ब्राह्मणवर्गापैकी देखील पुरोगामी लोक प्रथमपासून त्यांचे सहकारी होते व त्यांच्याविषयी स्नेहाचे, आदराचे उद्‌गार जोतीबांनी काढले आहेत. जोतीबा स्वतः माळी समाजाचे होते परंतु त्यांची शिकवण व कार्य सर्व जातीजमातींच्या लोकांत बंधुभाव असावा अशी होती. दलित, शूद्र, अतिशूद्र, आदिवासी, स्त्रिया या सर्व शोषित वर्गांच्या बाजूने ते उभे राहिले व या सर्वांनी एकजुटीने कार्य केले पाहिजे असे त्यांनी प्रतिपादन केले.

या सर्व गोष्टींत जोतीबांनी आपल्या विचारांना कृतीची जोड दिली व त्यासाठी समाजाचा जो रोष सहन करावा लागला तो केला. इंग्लंडच्या राजाच्या भेटीला गांधीजी आपल्या नेहमीच्याच वेषात पंचा नेसून गेले याचे आपल्याला कौतुक व सार्थ अभिमान वाटतो. ड्यूक ऑफ कॅनॉटच्या समारंभाला जोतीबा शेतकऱ्यांच्या वेषात गेले ही तशीच – किंबहुना, त्याहूनही – अधिक रोमहर्षक अशी घटना आहे. शेतकऱ्यांच्या स्थितीविषयींचे आपले निवेदन त्यांनी याचवेळी सादर केले.

जोतीबांच्या कृतिशीलतेविषयी सांगतानाच त्यांच्या पत्नी सावित्रीबाई यांना मानाचा मुजरा करणे उचित होईल. स्त्री ही आजच्या समाजरचनेचाच एक परिणाम म्हणून पुरुषांपेक्षा अधिक परंपरा मानणारी व परंपरागत विचारसरणीची असते. पतीच्या पाऊलावर पाऊल टाकण्याची भारतीय स्त्रीपरंपरा देखील याठिकाणी दुबळी पडते. महाराष्ट्रातील सुधारकांच्या पत्नींच्या विचारसरणीची पाहणी केली तरी ही गोष्ट स्पष्ट होईल. सावित्रीबाई यांचे महाराष्ट्रातील सामाजिक क्रांतीच्या क्षेत्रातील कार्य या दृष्टीने केवळ असामान्यच नाही तर अनन्यसाधारण आहे. चूल आणि मूल हे ठराविक कार्यक्षेत्र ओलांडून सामाजिक कार्यासाठी घराबाहेर पडणारी सवित्रीबाई ही महाराष्ट्रातील पहिली स्त्री होय हे विधान सर्वमान्य आहे. महाराष्ट्रातील सामाजिक क्रांतिकारकांमध्ये ज्याप्रमाणे जोतीबांचे अग्रस्थान कोणी हिरावून घेऊ शकत नाही त्याचप्रमाणे स्त्रीकार्यकर्त्यांमध्ये सावित्रीबाईंचा अग्रपूजेचा मान निरपवाद आहे. उच्चवर्णीयांचा शारीरिक छळ देखील सहन करून दलितांच्या व स्त्रियांच्या शिक्षिकेची आपली भूमिका त्यांनी कायम ठेवली. त्याच बरोबर उच्चवर्णीयांच्या देखील ज्या विधवा वा अन्य स्त्रिया अडचणीत असतील त्यांना मदत करण्याच्या जोतीबांच्या प्रयत्नात त्या सहभागी झाल्या.

या सर्व पैलूंशी जोडलेला व आपल्या आजच्या

विवेचनाच्या दृष्टीने (आणि एरवीही) सर्वात महत्त्वाचा पैलू जोतीबांच्या शिक्षणविषयक कार्याचा होता.

इतके सारे अविद्येने केले हा त्यांच्या 'विद्येविना मती गेली' येथून प्रारंभ होणाऱ्या साखळी-विवेचनाचा अंतिम निष्कर्ष होता. ही साखळी देखील आपण थोडी निरखून पाहण्यासारखी आहे. विद्या-मती-नीती-गती-वित्त-प्रतिष्ठा अशी ही साखळी आहे. प्रतिष्ठेच्या कळसाचा विद्या हा पाया आहे व तोच खचला तर इतर सर्व मजले आपोआपच कोसळतात. शेवटचा प्रतिष्ठेचा कळस वित्तावर अवलंबून आहे हे जोतीबांनी नीट ध्यानात घेतले आहे. ज्याला आर्थिक सामर्थ्य आहे त्या वर्गाला समाज दडपून ठेवू शकत नाही. 'वित्ता विना शूद्र खचले' या विधानातील हे सार आहे. वरील विधानातील नीती या शब्दाचा अर्थ नैतिक मूल्ये असा करणे चुकीचे होईल, असे मला वाटते. रूढार्थाने विद्या ज्यांना उपलब्ध नव्हती त्या वर्गाचा नैतिक अधःपात झाला होता ही भूमिका जोतीबांना मान्य झाली नसती व वस्तुस्थितीही तशी नव्हती. यामुळे याठिकाणी नीती या शब्दाचा अर्थ आपले उचित हित सांभाळण्यासाठी नीट कसे वागावे याचे ज्ञान असा केला पाहिजे. ही नीती गेली की गती-प्रगती खुंटली हे आपोआपच आले. त्यातून वित्त दुरावले व अवनति पदरात आली असे हे विवेचन आहे.

ब्रिटिश राजवट येण्याच्या आधीच्या काळात अस्तित्वात असणाऱ्या वर्णव्यवस्थेत ब्राह्मणवर्गाने 'वर्णानां ब्राह्मणो गुरुः।' हे तत्त्व जोपासले होते व प्रयत्नपूर्वक जनमानसात रुजवले होते. अतिशूद्रांच्याकडे दिलेले व्यवसाय घृणास्पद होते व त्यातून बाहेर पडण्याची त्यांच्यातील सर्वश्रेष्ठ बुद्धिमान लोकांनाही शक्यता नव्हती. सैनिक, कारागीर, व्यापारी, शेतकरी असे इतर वर्ग आपापली कुलपरंपरा चालवत होते. ब्रिटिश राजवटीने अतिशूद्रांच्या ज्ञानार्जनास असणारा अडसर तत्त्वतः दूर केला परंतु व्यवहारात तो तसाच राहिला. 'जरी ब्राह्मण झाला भ्रष्ट। तरी तो तिन्हीं लोकी श्रेष्ठ' ही त्या वर्गाची उर्मट भावना जोपासण्याचे नवीन राजवटीला कारण नव्हते व तशी राज्यकर्त्यांची मनोभूमिकाही नव्हती; परंतु व्यवहारात मात्र नव्या नोकरशाहीच्या निर्मितीत ब्राह्मणवर्गाचेच सर्वंकष वर्चस्व राहिले. इतर वर्गांची परिस्थिती ब्रिटिश राजवटीच्या साम्राज्यशाही धोरणाच्या प्रभावाखाली घसरत गेली. त्यांचे पूर्वीचे स्थान ढळले. नव्या उदय पावलेल्या नोकरशाहीत मात्र त्यांना स्थान मिळाले नाही. कारण पढिक ज्ञानार्जनाची व भाषाकौशल्य संपादनाची त्यांची कुलपरंपरा नव्हती.

यातून बाहेर पडावयाचे तर नवीन विद्या शूद्रातिशूद्रांच्या पर्यंत पोचविण्यासाठी शिक्षणाच्या प्रसाराचे काम हाती घेतले पाहिजे हे जोतीबांनी ओळखले व महार, मांग व स्त्रिया यांच्यासाठी शाळा सुरू केल्या. जोतीबांनी हा प्रयत्न केवळ आपल्या जातीपुरता मर्यादित ठेवला नाही यात त्यांची मानवतेची भूमिका दिसून येते; व यातच त्यांची यथार्थ महात्मता आहे. आजही महाराष्ट्रातील अनेक शिक्षणसंस्था (अगदी उच्चस्तरावर कार्य करणाऱ्या शिक्षणसंस्था देखील) एखाद्या विशिष्ट धर्माच्या किंवा जातीच्या म्हणून मानल्या जातात हे पाहिले की जोतीबांची भूमिका एक शतकाहूनही अधिक कालाचा वेध घेणारी व त्या दृष्टीने पहिले पाऊल उचलणारी क्रांतदर्शी होती या विषयी संशय राहत नाही.

याच भूमिकेतून शाहूमहाराजांनी नंतर शिक्षण-क्षेत्रातील आपले कार्य केले. शिक्षण आणि समाजपरिवर्तन या प्रक्रियेत शाहूमहाराजांनी केलेले कार्य महाराष्ट्राला अभिमानास्पद आहे व कोल्हापुरात तर आपल्याला त्याचा विशेष अभिमान वाटणे स्वाभाविक आहे. फुलेंच्या कार्याची पार्श्वभूमी शाहूमहाराजांना लाभली होती व एका संस्थानाचा अधिपती या नात्याने आपल्याला योग्य वाटणाऱ्या कल्पना प्रत्यक्षात राबविण्याची संधीही त्यांना उपलब्ध होती. या दोन्ही गोष्टींचा शाहूमहाराजांनी पुरेपूर उपयोग करून घेतला आणि या क्षेत्रात आपल्या कार्याचा कायमचा प्रभावी ठसा उमटवला.

शिक्षणाच्या क्षेत्रात ज्या दिशांनी वाटचाल होणे आवश्यक होते त्या सर्व दिशांनी कार्य करावयास शाहूमहाराजांनी प्रारंभ केला. प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक व्हावे ही कोणत्याही राष्ट्राच्या शैक्षणिक कार्यक्रमाची पहिल्या क्रमांकाच्या महत्त्वाची गोष्ट असते. यासाठी ते शिक्षण सक्तीचे करावे लागते व मोफतही ठेवावे लागते. केवळ एवढे करूनही प्राथमिक शिक्षणाचा प्रसार शंभर टक्के होऊच शकतो असे नाही. भारत स्वतंत्र होऊन चार दशकांचा काळ उलटत आला; भारतात आता प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचे आहे आणि तरीही आज देखील आपल्या लोकसंख्येपैकी साठ टक्क्यांहून अधिक लोक निरक्षर आहेत यावरून ही गोष्ट स्पष्ट होईल. त्या समस्येचा विचार आपण आज या ठिकाणी करण्याचे कारण नाही. परंतु हा कार्यक्रम राबविताना प्राथमिक शिक्षण सक्तीचे आणि मोफत करणे ही पहिली अटळ पाऊले आहेत. ही पाऊले उचलावयास ज्यावेळी मुंबई इलाख्याचे सरकार

कचरत होते त्याकाळात शाहूमहाराजांनी ही पाऊले उचलली. एका जिल्ह्याहून आकाराने लहान असलेल्या करवीर राज्याने १९१७ साली एक लाख वीस हजार रुपयांची तरतूद केली तर त्याहून अवाढव्य क्षेत्राच्या मुंबई इलाख्याने या कार्यक्रमासाठी १९३० साली केलेली तरतूद केवळ एक लाख रुपयांची होती. शाहूमहाराजांनी या कल्पनेचा प्रचार करण्यासाठी सत्यशोधकी जलशांचा उपयोग केला, प्राथमिक शिक्षकांना उत्साह यावा म्हणून त्यांच्या पगारात वाढ केली व करवीर राज्याच्या नोकरीत असलेल्या पंचवीस वर्षे वयाच्या खालील सर्व नोकरांनी सक्तीच्या शाळेत शिक्षकाचे काम केले पाहिजे म्हणून आज्ञा काढली. या खेरीज त्यांनी उचललेले क्रांतिकारक पाऊल म्हणजे देवस्थानांचा पैसा या कार्यासाठी वापरावयाचा असे त्यांनी ठरविले. 'सर्व देवस्थाने व पवित्रस्थळे यांचे विश्वस्त सरकार हे आहे. देवस्थाने व तीर्थक्षेत्रे यांची व्यवस्था पाहणे व आर्थिक नियोजन करणे हा सरकारचा हक्क आहे' असा फतवा त्यांनी १९१७ मध्ये काढला. यामुळे पुजारी-बडवे इत्यादी लोकांवर नियंत्रण आले व देवस्थानासाठी योग्य तरतूद केल्यानंतरही शिल्लक रक्कम शिक्षणप्रसाराच्या कार्यासाठी मिळू लागली. शाहूमहाराजांनी हा मार्ग दाखविलेल्या घटनेनंतर आता जवळ जवळ सत्तर वर्षे उलटून गेलेली आहेत; गेली चाळीस वर्षे तर भारत स्वतंत्र आहे; परंतु भारतातील देवालये, तीर्थक्षेत्रे यांच्या संबंधात अशी सार्वत्रिक भूमिका घेण्याचे धैर्य भारत सरकारला व राज्य सरकारांना झाले नाही. ही गोष्ट शाहूमहाराजांनी उचललेले हे पाऊल किती क्रांतिकारक होते याचे स्पष्ट गमक आहे.

प्राथमिक शिक्षणाच्या प्रसाराच्या कार्यक्रमात येणारा आर्थिक चणचणीचा प्रश्न व प्राथमिक शिक्षण व उच्चशिक्षण यावर होणाऱ्या आर्थिक तरतुदींचा योग्य तोल कसा सांभाळावा याचे नेमके उत्तर अजूनही भारताला सापडलेले नाही. त्यामुळे हा एक यक्षप्रश्न म्हणून शाहूमहाराजांच्या पुढे उभा राहिला असल्यास नवल नाही. या संदर्भात १९१८ मध्ये शाहूमहाराजांनी एक जाहीरनामा काढला व प्राथमिक शिक्षणाच्या हिताच्या दृष्टीने राजाराम कॉलेज बंद करण्याचा आपला मनोदय त्यांनी व्यक्त केला. एखादे महाविद्यालय बंद करताना तेथील प्राध्यापकांच्या नोकरीचे काय होईल हा प्रश्न आजही तीव्रपणे साहजिकच उपस्थित होत असतो. 'प्राध्यापकांच्या नोकरीची सोय राजाराम हायस्कूल मध्ये करण्याचे ठरविले आहे' हा शाहूमहाराजांनी यावर तोडगा काढलेला होता.

आज महाविद्यालयीन शिक्षणाचा प्रसार खूप मोठ्या प्रमाणावर झालेला आहे. परंतु १९२० सालच्या आसपास महाविद्यालयीन शिक्षण ही वरिष्ठ वर्णाची व वरिष्ठ वर्गाची मिरासदारी होती. या वर्गाचे प्रतिनिधी शासनात होते, वर्तमानपत्री प्रचाराची साधनेही त्या वर्गाच्या हाती होती. राजाराम कॉलेज बंद करण्याच्या कल्पनेविरुद्ध त्यामुळे मोठे काहूर माजले. या संबंधातील इतिहासाचा तपशील महाराष्ट्राच्या त्या काळातील सामाजिक अंतरंगाविषयी बरेच काही सांगून जातो. राजाराम कॉलेज कोल्हापूरचे एक भूषण होते व ते बंद करण्याची शाहूमहाराजांना काही हौस नव्हती.

राजाराम कॉलेज चालू ठेवण्याच्या दृष्टीने साहजिकच शाहूमहाराजांनी विचार सुरू केला व नंतर ते वाढत्या वैभवाने चालू राहिले हे मी आपल्याला सांगण्याची आवश्यकता नाही. परंतु त्या कालखंडातील काही घटनांची नोंद घ्यावयास हवी. त्या घटनाही तत्कालीन परिस्थितीवर व शाहूमहाराजांच्या वृत्तीवर प्रकाश टाकतात. डेक्कन एज्युकेशन सोसायटी राजाराम कॉलेज चालवायला घेईल काय याविषयी शाहूमहाराजांनी विचारणा केली होती. परंतु आपले सहकारी या गोष्टीला मान्यता देत नाहीत असे रँग्लर परांजपे यांनी त्यांना कळवले. 'आपण संपूर्णतया मिशनरी पद्धतीने कॉलेज चालवू' या अटीवर अमेरिकन मिशनने कॉलेज चालविण्याची तयारी दर्शविली. परंतु शाहूमहाराजांना ही अट मुळीच मान्य नव्हती. शेवटी आर्यसमाजाकडे राजाराम कॉलेज चालवावयास देण्याचा निर्णय घेतला गेला. मागासवर्गीयांच्या शैक्षणिक व इतर विकासाविषयी आर्यसमाजाला असलेल्या विशेष आस्थेचे शाहूमहाराजांना आकर्षण वाटले.

अस्पृश्य मुलांच्या शिक्षणासाठी शाहूमहाराजांनी १९०८ मध्ये वसतिगृह काढले. अस्पृश्य मुलींनी शिकावे म्हणून त्यांच्यात प्रचार करण्यासाठी त्यांनी एक सेविका नेमली. स्त्रियांच्या शिक्षणाला चालना देण्यासाठी 'ज्यांच्यात पडदा पाळण्याची रीत नाही अशा मागास वर्गातील विद्यार्थीनींची राहण्या-जेवण्याची व शालेय फी-पुस्तकांची वगैरे सारी सोय सरकारी खर्चाने करण्यात येईल' अशी राजाज्ञा १९१९ मध्ये काढली.

१९१९ मध्ये राज्यपालांच्या भेटीच्या वेळी भरलेल्या दरबारात शाहूमहाराजांनी आपले अंतरंग प्रकट केले. ते म्हणाले : 'माझ्या प्रजेपैकी दुर्बलांची सबळापेक्षा

अधिक काळजी घेणे हे मी माझे आद्य कर्तव्य मानतो. गरीब व दुबळ्या जनतेच्या झालेल्या शोचनीय अवस्थेने माझे आतडे पिळवटून निघाले आणि पडेल ती किंमत देऊन तिची ही अवस्था बदलण्याचा निर्धार मी केला. नव्हे, माझ्या राज्यकारभाराचे ते प्रमुख सूत्र बनले. हे अवस्थांतर घडवून आणण्यासाठी गेली पंचवीस वर्षे मी जिवाचा आटापिटा करीत आहे. त्यांच्या शिक्षणासाठी मी खास सवलती दिल्या. जेव्हा मी राज्यसूत्रे धारण केली, त्यावेळी मला असे आढळून आले की या दुबळ्या जनतेला कोणी वाली नाही, कोणी पुढारी नाही. ही फार मोठी उणीव होती.'

यानंतर शाहूमहाराजांनी आपले ध्येय व वस्तुस्थिती यातील अंतराबद्दल दुःख व्यक्त करून आपल्याला सामाजिक वस्तुस्थितीशी जुळवून घेताना क्लेशकारक तडजोडी कशा कराव्या लागतात या संदर्भात सांगितले :

'प्रत्येक जात आपल्या जातीच्या लोकांच्या हिताकडे पाहते व इतर जातींच्या लोकांकडे दुर्लक्ष करते, ही भारतीय समाजरचनेची शोकांतिका आहे. समाजरचना एकदम बदलता येत नाही, म्हणून मी वस्तुस्थितीचा स्वीकार करून मराठा, लिंगायत, जैन, शिंपी, सोनार, मुसलमान व अस्पृश्य जाती यांना आपापल्या जातीची वसतिगृहे उभारण्यासाठी मी जातीने प्रोत्साहन दिले.'

समाजपरिवर्तनाच्या प्रयत्नाला कोणकोणत्या अडचणींतून मार्ग काढावा लागतो याचे काही दर्शन यातून होते. पुरोगामी परिवर्तनाची प्रक्रिया नेहमी मागच्यापेक्षा पुढे पाऊल टाकत असते. शिक्षण आणि समाजपरिवर्तन यांच्या ह्या प्रक्रियेत कर्मवीर भाऊराव पाटील यांनी यापुढचे पाऊल टाकले. एक हरिजन विद्यार्थी घेऊन त्यांनी आपल्या वसतिगृहाला सुरुवात केली व आपल्या वसतिगृहात सर्व जातींच्या व सर्व धर्मांच्या विद्यार्थ्यांना समानतेच्या भूमिकेवरून प्रवेश दिला. शाहूमहाराजांचे नाव त्यांनी आपल्या वसतिगृहाला दिले व महात्मा गांधींनी त्या वसतिगृहाला भेट दिली असताना विचारलेल्या 'शाहू महाराजांचे नाव तुम्ही या वसतिगृहाला दिले आहे; त्यांनी आपल्याला किती देणगी दिली?' या प्रश्नाला त्यांनी उत्तर दिले. 'काहीही नाही. त्यांच्या विषयीचा माझ्या मनातील आदर व्यक्त करण्याकरता त्यांचे नाव मी दिलेले आहे.' या त्यांच्या उत्तरात त्यांची शाहूमहाराजांविषयीची भावना व शाहूमहाराजांच्या कार्याशी त्यांच्या कार्याचा असलेला अनुबंध ही स्पष्टपणे दिसतात.

भाऊरावांच्या विषयी माझ्या मनात असणारा नितांत आदर मी माझ्या अनेक लेखांतून, भाषणांतून व्यक्त केलेला आहे, त्यामुळे त्याचा पुनरुच्चार मी या ठिकाणी करीत नाही. शिक्षण आणि समाजपरिवर्तन यांच्या संदर्भात त्यांच्या कार्याची काही वैशिष्ट्ये विशेष लक्षणीय आहेत. जातिधर्मातीत वसतिगृहांची स्थापना हे वैशिष्ट्य आपण पाहिलेच आहे. एवढे एकच वैशिष्ट्य त्यांची शैक्षणिक व सामाजिक क्रांतिकारकता सिद्ध करावयास पुरेसे झाले असते. परंतु त्यांच्या विचारांचा आणि कृतीचा पल्ला याहूनही कितीतरी मोठा होता.

या वसतिगृहात सर्व जातीधर्मांचे विद्यार्थी केवळ एकत्र रहात होते एवढेच नव्हे तर आळीपाळीने आपल्या हाताने एकत्र स्वयंपाक करीत होते; एकत्र जेवत होते; स्वावलंबी श्रम करून आपल्या खर्चाचा काही भाग स्वतः उभा करीत होते. हे सर्व नवीन व क्रांतिकारक प्रयोग होते व भाऊराव ते जिद्दीने यशस्वीपणे राबवीत होते. विद्यार्थ्यांनी स्वावलंबी व्हावे त्याचप्रमाणे शिक्षणसंस्थांनी देखील केवळ सरकारी अनुदानाच्या आशेवर किंवा आधारावर आपले काम चालवू नये अशी त्यांची भूमिका होती. प्रत्येक खेड्यात शाळा असली पाहिजे व प्रत्येक प्राथमिक शिक्षक प्रशिक्षित असला पाहिजे, या भूमिकेतून ज्या खेड्यांतून सरकारने शाळा काढल्या नव्हत्या अशा सातारा जिल्ह्याच्या सर्व खेड्यांतून त्यांनी शाळा काढल्या व त्या शिक्षकांच्या प्रशिक्षणाची व्यवस्था केली. दुय्यम शाळा, महाविद्यालये असा त्यांच्या कार्याचा विस्तार होत राहिला व आजही चालू आहे. वटवृक्ष हे रयत शिक्षण संस्थेचे प्रतीक तिला साजून दिसते. आजीव सदस्य रचनेची प्रेरणा ज्याप्रमाणे डेक्कन एज्युकेशन सोसायटीने अनेक संस्थांना दिली त्याप्रमाणे दूरवर दुर्गम ठिकाणी मागास भागात व मागास वर्गात कार्य करण्याची प्रेरणा महाराष्ट्रात अनेक शिक्षणसंस्थांनी रयत शिक्षण संस्थेकडून घेतली.

वसतिगृहे जातिधर्मातीत असावीत एवढेच जातिधर्मातीततेचे ध्येय भाऊरावांच्या नजरेसमोर नव्हते. भाऊराव स्वतः जैन धर्माचे होते. परंतु त्यांनी जैनधर्मीयांसाठी म्हणून आपल्या शिक्षणसंस्था काढल्या नाहीत. बॅरिस्टर पी.जी. पाटील, डॉ. दत्ताजीराव साळुंखे व मी असा तिघांचा एकत्रित सत्कार रयत शिक्षण संस्थेने, आमची कुलगुरू म्हणून नियुक्ती झाल्याबद्दल सातारा येथे आयोजित केला होता त्या वेळी माझ्या भाषणात मी म्हटले होते, 'जीवनात काही योगायोग असतात; व केवळ पाच मिनिटांचा फरक पडला असता तर डेक्कन






एज्युकेशन सोसायटीकडे वळण्याऐवजी मी रयत शिक्षण संस्थेत रुजू झालो असतो.' आजही डेक्कन एज्युकेशन सोसायटीचा मी आजीव सदस्य झालो याचा यथार्थ अभिमान मला असला तरी रयत शिक्षण संस्थेशी तसा संबंध आला नाही याचे दुःखही माझ्या मनाला आहे. भाऊराव ही भावना समजू शकत होते. या भावनेनेच त्यांनी आपल्या संस्थेसाठी माणसे गोळा करण्याचा प्रयत्न केला. आपल्या प्राध्यापक, शिक्षक व इतर सेवकवर्गात महाराष्ट्रातील जातीजमातींचे सरमिसळ प्रतिबिंब यथार्थ प्रमाणात पडलेली दुसरी एखादी महाराष्ट्रातील शिक्षणसंस्था दाखविणे कठीण होईल. या आत्मविश्वासातूनच रयत शिक्षण संस्था प्रतिवर्षी आपल्या अहवालातून आपल्या प्राध्यापक, शिक्षक व सेवक वर्गाचे जात-धर्मवार वर्गीकरण प्रकट करू शकते. महाराष्ट्रातील किती शिक्षणसंस्था असे वर्गीकरण प्रसिद्ध करण्याचे धैर्य दाखवू शकतील? त्यांनी ते तसे प्रकट केले पाहिजे असा आग्रह धरण्याचे धैर्य शासन तरी दाखवू शकेल काय?

महाराष्ट्रातील सामाजिक परिस्थितीच्या मर्यादांशी झगडत, काही वेळा त्या तोडत, तर काही वेळा त्यांच्याशी तडजोड करत शिक्षणाचा प्रवाह, उच्चवर्गीयांकडून, त्रैवर्णियांकडे व तेथून पुढे शूद्रातिशूद्रांकडे सरकत होता. हा प्रवाह आपल्यापर्यंत पोचण्यास विलंब लागत आहे असे निम्न स्तरावरील लोकांना वाटणे स्वाभाविक होते. शिक्षणासाठी दिलेल्या सर्वसाधारण सवलतींचा लाभ वरचा वर्गच अधिक उठवणार हे उघड होते. वंचित वर्गांना यामुळे विशेष राखीव सवलतींची आवश्यकता होती. या धोरणाला तात्त्विक विरोध करणाऱ्या एका सद्गृहस्थांना शाहूमहाराजांनी, चंदीकडे सशक्त व अशक्त घोडे एकाच वेळी सोडून, अशक्तांना ढकलून सशक्त घोडेच सगळी चंदी कशी खातात याचे प्रात्यक्षिकच दाखवले होते. हे प्रवाह आपल्यापर्यंत अधिक वेगाने अधिक पूर्णपणे पोचावे यासाठी निम्नस्तरावरच्या लोकांना स्वतंत्र प्रयत्नांची आवश्यकता वाटणे अटळ होते.

या मनोधारणेत दलितांच्या महाविद्यालयीन शिक्षणाच्या बाबतीत महाराष्ट्रात स्वतंत्र विशेष प्रयत्न करण्यात आले. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची प्रेरणा व कर्तृत्व या प्रयत्नांमागे उभे होते. 'पोट जाळा परंतु शिक्षण घ्या' अशी डॉ. आंबेडकरांची दलितांना आग्रही हाक होती. शिक्षणाने – मग ते कितीही उच्चस्तरावरचे घेतले असले तरीही – सामाजिक विषमतेतून निर्माण होणाऱ्या अन्यायाचा काच दूर होत नाही हे त्यांनी स्वतःच्या जीवनात अनुभवले होते. परंतु दलितांना सामाजिक न्याय मिळवावयाचा असेल तर शिक्षण घेणे हे त्या संघर्षातील एक महत्त्वाचे पाऊल आहे हे त्यांनी ओळखले होते. यासाठी प्राथमिक, दुय्यम, महाविद्यालयीन स्तरावरील शिक्षण तर आवश्यक आहेच, परंतु विद्वत्तेच्या आंतरजातीय किंबहुना आंतरराष्ट्रीय तुलनेत शोभून दिसतील अशी काही माणसे निर्माण करणेही महत्त्वाचे आहे असे त्यांचे मत होते. अशी माणसे थोडी असली तरी ती त्या सर्व समाजाला प्रतिष्ठा मिळवून देतात, समाजातील सर्व घटकांच्या मनात स्वाभिमान जागा करतात, व अस्मितेचा आत्मप्रत्यय समाजाला आणून देतात असे त्यांना वाटे. तसा त्यांच्या जीवनचरित्रातील त्यांचा अनुभवही होता. या सर्वोच्च स्तराचा पाया म्हणून दलितांमध्ये महाविद्यालयीन शिक्षणाचा प्रसार त्यांना करावयाचा होता व त्यासाठी त्यांच्या नेतृत्त्वाखाली पीपल्स एज्युकेशन सोसायटीने महाविद्यालयांची स्थापना केली. या शिक्षणाची गुणवत्ता सांभाळली जावी याची त्यांना अखंड तळमळ होती.

दलितांनी आपला उद्धार आपणच केला पाहिजे या त्यांच्या तळमळीचे दुसरे एक अंग होते. त्या अंगाचा त्यांचा आग्रह हा त्यांच्या स्वतःच्या जीवनातही प्रतीत होत होता. विद्वान महापंडित, यशस्वी वकील, कुशल संघटक, उत्तम प्रशासक, प्रभावी संसदपटू अशा अनेकविध भूमिका त्यांनी पार पाडल्या. भारतीय राज्यघटनेचे शिल्पकार होण्याचा मान त्यांना मिळाला. परंतु ते कितीही वरच्या स्थानावर गेले तरी आपल्या समाजाशी असलेला त्यांचा आंतरिक जिव्हाळ्याचा बंध कधी सैल पडला नाही. दलितांतील सुशिक्षितांनी, प्रगत लोकांनी समाजापासून अलग न पडता समाजाशी अतूट संबंध ठेवून आपल्या समाजाच्या उन्नतीसाठी झटले पाहिजे अशी त्यांची अपेक्षा होती.

वरिष्ठ वर्ग दलितांच्यासाठी काही विशेष प्रयत्न करील अशी त्यांची अपेक्षा प्रथमपासूनच नव्हती. १९२७ मध्ये मुंबई विधिमंडळातील आपल्या भाषणात शिक्षणाविषयी बोलताना ते म्हणाले :

'सामान्य माणसाला शिक्षण सुलभ होईल अशी व्यवस्था झाली पाहिजे. खालच्या वर्गांना उच्च शिक्षण ही फार खर्चाची बाब होता कामा नये. दुसरी गोष्ट अशी की, खालच्या वर्गाला वरच्या वर्गाच्या पातळीवर आणण्यासाठी त्यांना सवलती दिल्या पाहिजेत. पाच आणि दहा या संख्यांना दोहोनी गुणले तर गुणाकार दहा नि वीस येईल म्हणून पाचाला दोहोनी

गुणून दहाला एकाने गुणले पाहिजे. म्हणजे खालच्या वर्गाला भरपूर सवलती देऊन त्याला वरच्या वर्गाच्या पातळीवर आणले पाहिजे. असे करणे म्हणजेच समता.'

ते पुढे म्हणाले :

'शिक्षण ही एक पवित्र संस्था आहे. शाळेने मने सुसंस्कृत होतात. शाळा म्हणजे नागरिक तयार करण्याचे पवित्र क्षेत्र. ते एक राष्ट्रीयतेचे, मानवतेचे आणि अज्ञानतम दूर करण्याचे उदात्त कार्य आहे. शाळेत समबुद्धीचे, उदात्त, नि:पक्षपाती, थोर मनाचे शिक्षक पाहिजेत. शिक्षक वर्ग हा राष्ट्राचा सारथी आहे. कारण त्याच्या हातात शिक्षणाच्या नाड्या असतात. यास्तव शिक्षक कोण असावा यासारखा, समाज सुधारणेच्या दृष्टीने पाहता, दुसरा महत्त्वाचा प्रश्न नाही. ब्राह्मण खालच्या वर्गातील लोकांचा तिरस्कार करतात; त्यांच्या बौद्धिक उत्कर्षाविषयी बेफिकीर असतात. त्यांना जनावरापेक्षा ते कमी लेखतात. त्यांच्या कानीकपाळी सदैव ओरडतात की, शिकणे हे तुमचे काम नाही. तुमचे काम मोलमजुरी करणे. शिक्षण हे ब्राह्मणांनीच करावे. म्हणून ब्राह्मणांच्या हातात शिक्षणाची सूत्रे देऊ नयेत.'

हे उद्‌गार जळजळीत तर खरेच परंतु हे आपल्याहून कनिष्ठ व अवनत असणाऱ्या वर्गाशी आपला अनुबंध तोडणाऱ्या सर्वच वर्गांना ते लागू होते. दलितांतील त्यातल्या त्यात सुस्थिर वर्गाला ते लागू होते त्याचप्रमाणे सुशिक्षित झाल्यानंतर आपल्या समाजाकडे पाठ फिरविणाऱ्या दलित सुशिक्षितांनाही ते लागू होते.

डॉ. आंबेडकर यांची भावना अशीच होती. महाडच्या सत्याग्रहानंतर संध्याकाळी महाडच्या चांभारवाड्यात एका सभेत त्यांनी चांभारांची कानउघाडणी केली. त्या सभेत ते म्हणाले :

'सत्याग्रहींची चमू ही वीरांची चमू आहे. वीरांच्या चमूत जातीपातीला थारा नाही. तुम्हाला सुख पाहिजे की माणुसकी पाहिजे ते ठरवा. माणुसकीशिवाय तुमचे वैभव व्यर्थ आहे. तुमच्यासारख्या सुखवस्तू, स्वतंत्र व सुखी लोकांनी अस्पृश्यांना माणुसकी परत आणून देण्याच्या कामात आतुरतेने भाग घेतला पाहिजे, हे पुण्य थोडे तरी जोडा. ह्यात जर तुम्ही भाग घ्याल तर इतिहासात महारांबरोबर तुमचेही नाव अजरामर होईल. नाहीतर पुढची पिढी तुम्ही नामर्द होता, असा तुम्हाला दोष देईल.'

समाजातील खालच्यातील खालच्या स्तरावरील लोकांना न्याय मिळेपर्यंत वरच्या सर्व स्तरातील लोकांचे, व निम्नतम स्तरातीलही सुशिक्षित लोकांचे कर्तव्य काय आहे याचे स्पष्ट सूचन व या विषयीचा सुस्पष्ट इशारा डॉ. आंबेडकरांच्या या उद्‌गारांत आहे.

३

आजच्या तिसऱ्या व्याख्यानात महाराष्ट्रातील शिक्षण आणि समाजपरिवर्तन या विषयाची चर्चा मला, आजवर कोणी विशेष चर्चा न केलेल्या, एका नव्या टप्प्यावर न्यावयाची आहे. या चर्चेमागचे सूत्र तसे नवे नाही. मी माझ्या पहिल्या व्याख्यानात निर्देश केलेल्या 'भारतीय जनतेचे शिक्षण' या निवेदनात याविषयीची स्थूल तात्त्विक मांडणी करण्यात आली आहे. त्या मांडणीत तपशील भरण्याचे कार्य अद्याप व्हावयाचे आहे; आणि ते आपण सर्वांनीच करावयाचे आहे. शैक्षणिक व सामाजिक असे दोन्ही दिशांचे परिवर्तन एकसाथ चालू राहिले तरच शैक्षणिक क्रांती व सामाजिक क्रांती या दोन्ही पूर्णपणे होऊ शकतील एरवी त्या दोन्ही अपूर्णच राहतील असे त्या निवेदनाचे प्रतिपादन आहे. महाराष्ट्रात शिक्षण आणि समाजपरिवर्तन यांचा चालत आलेला परस्पर संबंध पाहिला आणि महाराष्ट्रातील अनुभवही लक्षात घेतला तर तात्त्विक मांडणीला कोणी विरोध करील असे वाटत नाही. कोणी केला तर तात्त्विक पातळीवर त्याचा प्रतिवाद करावा लागेल हे मला मान्य आहे. परंतु जगात शिक्षणशास्त्रज्ञांनी, समाजशास्त्रज्ञांनी याची पुरेशी चर्चा केलेली आहे एवढेच या ठिकाणी सांगून मी पुढील विवेचनाला प्रारंभ करतो. परंतु तसे करण्याच्याही पूर्वी 'हे कार्य आपण सर्वांनीच करावयाचे आहे' या मी केलेल्या विधानाचेही स्पष्टीकरण देणे युक्त होईल. ही द्विविध क्रांती सफल व्हावयाची असेल तर त्या प्रयत्नात समाजातील सर्व घटकांनी – शासन, प्रशासन, राजकीय पक्ष, सामाजिक कार्यकर्ते, पालक, विद्यार्थी, शिक्षक व शिक्षणसंस्था – सहभागी होणे आवश्यक आहे अशी ही भूमिका आहे.

शिक्षणव्यवस्था ही एकूण समाजव्यवस्थेचेच (यात सामाजिक, राजकीय, आर्थिक अशा सर्व व्यवस्थांचा समावेश गृहीत धरलेला आहे) एक उपांग असते. समाजव्यवस्थेत जो वर्ग अधिकारावर असतो तो या सर्व उप-व्यवस्था आपल्या हिताच्या दृष्टीने राबविण्याचा स्वाभाविकपणेच प्रयत्न करीत असतो. समाजव्यवस्थेत बदल झाला, की या उप-व्यवस्थांवर त्याचा परिणाम होणे अटळ असते व या उलट उप-व्यवस्थांत



अनुक्रमणिका

काही प्रक्रिया स्वतंत्रपणे सुरू झाल्या तर त्यांचा परिणामही समाजव्यवस्थेवर झाल्याखेरीज राहत नाही. बाह्य आघातांनी किंवा अंतर्गत घडामोडींनीही या व्यवस्थांत बदलाच्या प्रक्रिया सुरू होऊ शकतात. ब्रिटिश राजवट हा आपल्या समाजव्यवस्थेला बसलेला बाह्य प्रचंड आघात होता व त्या आघाताने घडून आलेल्या सामाजिक, राजकीय, आर्थिक अंगांच्या अंतर्गत फेरबदलांच्या प्रक्रियांचाही परिणाम आपल्या समाजव्यवस्थेला जाणवू लागले होते. शिक्षण व समाजपरिवर्तन महाराष्ट्रात याच अनुरोधाने वाटचाल करू लागले होते.

शिक्षणातून होणारे समाजपरिवर्तन हे तीन प्रकारचे व तीन स्तरांवरचे असू शकते. शिक्षणापासून वंचित ठेवून ज्या वर्गांना मागास ठेवण्यात आले होते त्यांच्यापर्यंत शिक्षणाचे प्रवाह येऊन पोहोचले, की विद्या - मती - नीती - गती या साखळीतून वित्त त्या वर्गापर्यंत येऊन पोहोचते व खचलेले मागास वर्ग वर येऊ लागतात; यथाकाल प्रतिष्ठा पावतात. शिक्षणातून निर्माण होणारी ही समाजपरिवर्तनाची पहिली प्रक्रिया आहे. ही प्रक्रिया देखील प्रथमदर्शनी वाटते तितकी साधी सरळ नसते. शिक्षणाच्या सुविधा सर्वसाधारण पद्धतीने सर्वांना उपलब्ध ठेवल्या, की त्यांचा लाभ घेण्याची क्षमता वरिष्ठ वर्गाच्याकडेच असल्यामुळे तो वर्गच त्याचा लाभ अधिक प्रमाणात घेऊ शकतो. शिक्षण मोफत (किंबहुना सक्तीचे) केले तरी ज्यांच्या मुलांना पोटापाण्यासाठी काही व्यवसाय न करून चालण्यासारखे आहे त्या कुटुंबांतील मुलांनाच त्याचा फायदा मिळणार. इतर आहेत तेथेच राहणार. शिक्षणाचा सर्वसाधारण स्तर उंचावत गेले तरी त्यातही वरिष्ठ वर्गातील मुले अधिक वरच्या स्तरावर राहणार व स्पर्धेत मिळणाऱ्या यशाचा मोठा भाग सहजपणे उचलणार. इंजिनिअरिंग, मेडिकल महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांच्या ज्या सामाजिक, आर्थिक पाहण्या केल्या आहेत त्यातून ही गोष्ट सिद्ध झालेली आहे; व त्यात अनपेक्षित असे काहीही नाही. केवळ अशा महाविद्यालयांतील प्रवेशाच्या दृष्टीनेच नव्हे तर इतर क्षेत्रांतही सामान्यपणे मागणी त्यातल्या त्यात अधिक सुशिक्षित लोकांसाठी असते व त्या मागणीला अनुसरून वरिष्ठ वर्गातील लोकांनाच अधिक वाव मिळतो. याचाच एक वेगळा प्रकार म्हणजे एखाद्या कामातील क्षमतेसाठी किंवा कौशल्यासाठी जितक्या शिक्षणाची खरी आवश्यकता आहे त्याहून अधिक शैक्षणिक पात्रतेची किमान अट घालणे हा होय. नोकरीला अर्ज करणारा किमान पदवीधर असावा असे म्हटले, की बहुसंख्य लोक आपोआपच बाजूला फेकले जातात. सध्याच्या समाजरचनेत यात सामाजिक अन्यायही होतो. संपूर्णपणे समतेवर आधारित अशा समाजरचनेत या स्वरूपाचा अन्याय होऊ शकणार नाही कारण त्या समाजात पदवीपर्यंत शिक्षण घेण्याची संधी व क्षमता सर्वच वर्गांच्या बाबतीत समानपणे प्रस्थापित झालेली असेल व त्या त्या वर्गातून पदवीधर होणाऱ्या विद्यार्थ्यांचे प्रमाण समान असेल. ज्या कामासाठी, कामाच्या स्वरूपामुळे अधिक शिक्षणाची आवश्यकता नसेल तेथे त्या अधिक शिक्षणाचा नोकरीसाठी आग्रह न धरणे हा यातून मार्ग होऊ शकतो. पदवी व नोकरी यांचा संबंध तोडण्याचा विचार यातूनच पुढे येतो.

अधिक शिक्षणाला किंवा शिक्षणात अधिक गुणवत्तेचा आग्रह धरण्याला कोणाचा विरोध नसतो हे आपण नीटपणे ओळखले पाहिजे. विरोध असतो तो, या मार्गाने पुन्हा सर्व उत्कर्षाची संधी वरिष्ठ वर्गातील लोकांनाच उपलब्ध होईल, या शंकेमुळे निर्माण झालेला असतो. ही शंका अनाठायी असते असे मानण्याचे कारण नाही व एकूण रचनेत या शंकांचे निरसन होऊ शकेल अशी व्यवस्था असली पाहिजे.

शिक्षण घेण्यासाठी सर्वांना समान संधी ही केवळ पहिली पायरी झाली. शिक्षणातून सर्वांना शेवटी उत्कर्षाची समान संधी हा खरा कळस आहे. तो कळस शेवटी चढवता आला नाही तर आधीची रचना विफल आहे. हा दृष्टिकोन हे शिक्षणातून समाजपरिवर्तनाचे महत्त्वाचे अंग आहे. यासाठी वैचारिक भूमिका नीट समजली पाहिजे, व आपल्या वर्गावर प्रतिकूल परिणाम झाला तरी खालच्या वर्गाच्या हिताच्या दृष्टीने ती स्वीकारण्याची सामाजिक न्यायाची भावना जागृत असली पाहिजे. माझ्या वर्गावर मी वरिष्ठ वर्गाकडून अन्याय होऊ देणार नाही हा स्वाभिमान आहे; माझ्या वर्गाकडून कनिष्ठ वर्गावर अन्याय होणार नाही याविषयी मी दक्ष राहीन यात क्रांतिकारकता आहे. 'मी ज्याप्रमाणे कोणाचा गुलाम होणार नाही, त्याचप्रमाणे कोणाचा मालकही होणार नाही' या लिंकनच्या उद्गाराचे हेच रहस्य आहे. फुले, शाहूमहाराज, भाऊराव, आंबेडकर यांच्या कार्यामागे ही प्रेरणा आढळून येते व त्यांच्या कार्याची विशेषता यात सामावलेली आहे. यातील शिकवण अद्यापिही महाराष्ट्राला पूर्णपणे आत्मसात झालेली आहे असा निर्वाळा देता येणार नाही.

शिक्षणातून होणाऱ्या समाजपरिवर्तनाचा दुसरा








स्तर विद्यार्थ्यांच्या मनोभूमिकेत होणाऱ्या पुरोगामी परिवर्तनाचा आहे. स्वाभिमान व क्रांतिकारकता या दोन्ही संस्कारांची बीजे त्यांच्या मनात पेरली गेली पाहिजेत. आपण ज्या वर्गातून वर आलो त्या वर्गाविषयी दुराव्याची भावना तर त्यांच्या मनात निर्माण होताच कामा नये. व्यक्तिगत स्वार्थापलीकडे जाऊन समाजासाठी, त्यातील कनिष्ठतम वर्गासाठी काही करण्याची प्रेरणा त्यांच्या मनात निर्माण झाली पाहिजे.

सुमारे पंधरा वर्षापूर्वी या विषयीचा एक सुखद अनुभव मला आला होता. मुंबईत वरळी येथे असलेल्या दलित व दलितेतरांच्या सरमिसळ वस्तीच्या चाळीत त्या दोन गटांमध्ये दंगल झाली होती. या दंगलीची चौकशी करण्यासाठी मराठा मंदिराचे श्री. बाबासाहेब गावडे यांच्या पुरस्काराने स्थापन झालेल्या एका समितीचा मी अध्यक्ष होतो. प्रा. नलिनी पंडित व प्रा. मे.पुं. रेगे हे माझे या समितीवरील सहकारी होते. समितीला दिलेल्या माहितीत अनेकांनी, 'सातारा जिल्ह्यातून आलेल्या लोकांनी यात भाग घेतला नाही कारण कर्मवीरांचे आणि त्यांच्या रयत शिक्षण संस्थेचे संस्कार त्या लोकांच्या मनावर झाले होते.' असे सांगितले, या गोष्टीचा कोणालाही आनंद होईल आणि हे श्रेयही खूप मोठे आहे.

परंतु समाजपरिवर्तनाच्या प्रक्रियेचे हे केवळ पहिले पाऊल आहे. पहिल्या दोन व्याख्यानांत ज्यांचा आपण निर्देश केला त्या सर्वांना याची तीव्र जाणीव होती. त्यांच्या वेळोवेळी काढलेल्या उद्‌गारांवरून ही गोष्ट स्पष्ट आहे. त्यांतील काही तर मी उद्धृत करून टीकाटिपणीसह आपल्याला सांगितलेही आहेत. भाऊरावांची याविषयीची तीव्रता त्यांच्या पुढील उद्‌गारात स्पष्ट झाली आहे. ते एकदा म्हणाले :

'स्वतःच्या डोळ्यादेखत अन्याय घडत असता त्याला अन्याय म्हणत नाहीत किंवा त्याचा प्रतिकार करीत नाहीत, दुष्ट म्हणत नाहीत, नाठाळाला नाठाळ म्हणत नाहीत व त्यांची दुष्कृत्ये थांबवीत नाहीत ते माझे अनुयायी किंवा विद्यार्थी म्हणून घ्यावयास पात्र नाहीत.'

समाजपरिवर्तन व शिक्षण परस्परसंबंधाविषयीचा भाऊरावांचा मूलभूत दृष्टिकोन त्यांच्या दुसऱ्याही एका उद्‌गारावरून स्पष्ट होतो. श्री. शंकरराव खरात यांनी ते उद्‌गार व त्यामागची पार्श्वभूमी आपल्या 'तराळ आणि अंतराळ' या आत्मचरित्रात सांगितली आहे. फर्ग्युसन कॉलेजच्या मागच्या बाजूला वडार वस्तीजवळ भाऊरावांचे तट्ट्यापत्र्यांचे विद्यार्थ्यांचे वसतिगृह 'युनियन बोर्डिंग' आहे. (गांधी - आंबेडकर येरवडा कराराची स्मृती म्हणून भाऊरावांनी या बोर्डिंगला 'युनियन बोर्डिंग' असे नाव दिले ही गोष्ट देखील त्यांची सामाजिक भूमिका स्पष्ट करते.) लगेच दुसऱ्या बाजूला सुखवस्तू लोकांचे बंगले व त्यांची वस्तीही आहे. भाऊराव वसतिगृहाच्या बाहेर बिसावले आहेत. आपल्या विद्यार्थ्यांना सांगत आहेत, 'धनिकांची आणि दलितांची अशा या दोन संस्कृती आहेत. या संस्कृतींमधील दुवा म्हणून तुम्हाला काम करावयाचे आहे.'

गरिबीतून, सामाजिक प्रतिकूलता सहन करून शिक्षण घेणे व समाजात यशस्वी होणे यातही कर्तृत्व आहे व संपन्नतेतून जे शिक्षण घेतात व यशस्वी होतात त्यांच्या कर्तृत्वापेक्षा ही कितीतरी मोठी कर्तबगारी आहे.परंतु हे लोक जर आपल्या मूळ बांधवांना विसरले व वरिष्ठ वर्गातच समाविष्ट होण्याचा खटाटोप करू लागले व त्यातच धन्यता मानू लागले तर वरिष्ठ वर्गात आणखी काही जणांची भर पडली एवढाच त्याचा अर्थ होईल. समाजातील वरिष्ठ, कनिष्ठ ही विभागणीच नाहीशी झाली पाहिजे या प्रक्रियेला यामुळे वेग येणार नाही. वरिष्ठ वर्गाचे जीवनही उपभोगावयाचे व कनिष्ठ वर्गासाठी असणाऱ्या सवलतींचाही लाभ घेणे चालू ठेवावयाचे असे धोरण त्यांनी ठेवले तर खऱ्या गरीब व कनिष्ठ वर्गात काचल्या गेलेल्या लोकांच्या संधी मर्यादित होतील व त्यामुळे त्यांच्या प्रगतीत इतर वरिष्ठ वर्गाप्रमाणेच यांचाही अडसर निर्माण होईल. ही भूमिका मान्य असणारे व आपल्या कुटुंबियांसाठी अशा सवलती घेण्याचे नाकारणारे लोकही मला माहीत आहेत. ही भूमिका सार्वत्रिक व्हावी यासाठी समाजमानस तयार झाले पाहिजे; करावयास हवे.

भारतात आपण मूलगामी परिवर्तनाला तयार झाल्याखेरीज भारतातील पन्नास टक्के लोकसंख्या निरक्षर राहणे व दारिद्र्य रेषेखाली राहणे अटळ आहे अशी माझी भूमिका आहे व संधी मिळेल तेथे वेळोवेळी मी ती मांडत आलेलो आहे. मी याचा निर्देश 'Fifty Percent Barrier' 'पन्नास टक्क्यांचा अडसर' असा करतो. पराकोटीचे दारिद्र्य व निरक्षरता यांचा अतूट संबंध आहे याचे विशेष विवेचन करण्याची आवश्यकता नसावी. दरिद्री वर्गातील मुलांची नावे सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाच्या योजनेखाली तुम्ही पटावर लिहिलीत तरी ती शाळेत येत नाहीत, आली तरी उत्तीर्ण होत नाहीत व एकदोन इयत्ता त्यांनी कदाचित पार केल्या तरी नंतर लवकरच शिकलेले सर्व विसरून ती निरक्षर बनतात असा

भारतासारख्या खंडप्राय देशात भौगोलिकदृष्ट्या कोणत्या प्रदेशातील लोकांना आयोडिनची कमतरता भासते आणि आपल्याला तशा मिठाची गरज का नाही हे विचार अतिशय समग्रतेनं पण सोप्या भाषेत मांडले.

४) १४ जानेवारी १९९७ रोजी इयत्ता चौथीच्या मुलांनी मुक्त सैनिक वसाहतीतील पासष्ट घरांत जाऊन शोध पाहणी केली. त्या घरांतील लोक कोणते, कोणत्या कंपनीचे मीठ वापरतात? तेच मीठ का? दूरदर्शनवरील मिठावावत जाहिराती लोकांनी पाहिल्या आहेत का? त्या पाहून त्यांना आयोडिनयुक्त मीठ घ्यायला हवं असे वाटते का? ते मीठ अधिक चांगलं असं त्यांना वाटतं का? का वाटतं? ते वापरतात त्या मिठाची प्रती किलो किंमत किती? इत्यादी माहिती गोळा केली.

५) संपादित केलेल्या माहितीची मांडणी आलेख, घोषणा, सुशोभन, लेखन इत्यादी माध्यमांचा वापर करून केली.

६) विद्यालयानं वाजारात मिळू शकणाऱ्या विनआयोडिनयुक्त साध्या मिठाचे शास्त्रीय पृथःकरण करून घेतलं. साध्या मिठातही पुरेसं आयोडिन असतं हा पृथःकरणाचा निष्कर्ष मुलं व ताई दादा यांच्यामार्फत पोचवला.

७) कोणत्याही वावीचं सत्यशोधन अनेक अंगांनी होणं जसं गरजेचं तसंच हाती आलेलं सत्य व त्याचे तपशील समाजापर्यंत पोचवणं हाही सत्यशोधाचाच भाग. त्यादृष्टीने मुलांचा आवाका व हाती असलेला वेळ लक्षात घेऊन २६ जानेवारी १९९८ च्या प्रजासत्ताक दिनाचा एक कार्यक्रम म्हणून चौथीच्या मुलांनी व त्यांच्या मार्गदर्शक ताई-दादांनी मुक्त सैनिक वसाहत ते मुख्य रहदारीचा रस्ता अशी एक प्रभातफेरी काढली. मुलांनी तयार केलेल्या घोषणा सर्वजण देत होते. वसाहतीतील व रस्त्यावरील प्रौढ 'हे काय गौडवंगाल' अशा भावनेनं थोडावेळ थांवून सारं पाहत-ऐकत होते. फेरीच्या कक्षेत जे दोन तीन चौक/कोपरे आहेत तिथं मुलांनी सभा घेऊन आपलं सत्यशोधन लोकांसमोर मांडलं.

८) ३० जानेवारी १९९८ रोजी सकाळी ९.३० ते ११.०० या वेळात शाळेतच मुलांनी एकशेचाळीस किलो साध्या मिठाची विक्री केली.

९) वार्षिक प्रश्नपत्रिकेतही हया कामाचं प्रतिविंव प्रश्नरूपात उमटलं.

चिमूटभर मीठ ते काय आणि त्यापायी मुलांचा इतका वेळ आणि ताई-दादांची इतकी उर्जा कशाला वापरायची असं कुणाला वाटेलही. पण आम्हांला 'सर्वंकप शिक्षणाचा' प्रयत्न करायचा असल्यानं हे सारे उपद्व्याप केले जातात!

५) डॉ. आंवेडकरांच्या पुतळयाला चपलांची माळ!

...११ जुलै १९९७ च्या दिवशी वर्तमानपत्रात घाटकोपर येथील रमावाई आंवेडकर नगरातील डॉ. आंवेडकरांच्या पुतळयाला चपलांची माळ घातल्यानं विद्रोहाचा डोंव उसळला ही वातमी झळकली. पुढील दोन दिवसांत वंद, मोर्चे, मारामाऱ्या, गोळीवार-अशा घटना घडल्या. स्वातंत्र्याचा सुवर्णमहोत्सव जेमतेम महिन्यावर येऊन ठेपला असता घडणाऱ्या अशा घटनांची नोंद घेऊन १७ जुलै रोजी सृजन-आनंद विद्यालयात स्वातंत्र्याच्या मशागतीचा उपक्रम फक्त तिसरी व चौथीच्या मुलांसाठी योजिला. अशा प्रकारच्या घटना का घडतात? त्यांचे काय काय परिणाम होतात? कुणाकुणाचे कशाप्रकारे नुकसान होते? नागरिक, उद्योगधंदे, शासकीय कार्यालयं, शाळा कॉलेजचे विद्यार्थी, दवाखाने, दुकानं, वाहतुक यंत्रणा- अशा साऱ्यांनाच अशा प्रकारच्या घटनांमुळे आर्थिक फटका तर वसतोच पण निर्माण होणारा तणाव नंतरही धुमसत राहतो- इत्यादींची निदान अस्पष्ट जाणीव मुलांना व्हावी; अशा प्रकारच्या घटनांमुळं केवळ घावरून जाऊन उपयोगाचं नाही तर पुढील काळात त्या घडू नयेत म्हणून साऱ्यांनीच शहाणपणानं वागायला हवं अशा विचारांची वीजं त्यांच्या मनोभूमीत पडावीत अशा इच्छेनं घड्याळी दीड तासांत ११ जुलैची घटना व नंतरच्या तीन दिवसांत घडलेल्या पुढील घटना यांचं शव्दचित्र मुलांपुढं समूर्त करावंसं वाटलं. पुढील प्रमुख मुद्यांवावत वोलणं, विचार करणं, प्रश्न विचारणं, समजून घेणं यांची मुलं व ताईदादा यांच्यात देवाण-घेवाण चालू होती.

१) फलकावर लिहिलेल्या 'स्वातंत्र्याची मशागत' ह्या शीर्षकाचा अर्थ समजूण घेणं. जमिनीची मशागत कोण करतं? ती कशाप्रकारे केली जाते? स्वातंत्र्याची मशागत म्हणजे काय? ती कोण करते? कोणी करायची? त्यासाठी काय करायचं?

२) वर्गखोलीतील एका कोपऱ्यात ताणून वांधलेल्या चादरीवर महाराष्ट्राचा आराखडा. त्यात दंगा उसळलेल्या काही शहरांची दर्शविलेली नावे. वर्तमानपत्रातील काही छायाचित्रं पाहणं व समजूण घेणं.

३) रेडिओ वार्तापत्र- शिक्षकांनी लिहिलेलं वार्तापत्र लक्षपूर्वक ऐकणं व समजून घेणं.









४) शिक्षकांचा मुलांशी संवाद व प्रश्नोत्तरं.

५) सार्वजनिक मालमत्तेचं नुकसान. एस.टी.त नोकरी करणारे उदयदादा, हॉटेलात काम करणारे अनिलदादा, हातगाडीवर माल विकणारे महंमददादा आणि एम्.एस्.ई.बी.चे अधिकारी पाटीलदादा-अशा चार निमंत्रितांनी सार्वजनिक मालमत्तेच्या नुकसानीची माहिती सांगितली. माहिती ऐकणं व समजून घेणं आणि त्यावद्दलची प्रश्नोत्तरं.

सारी चर्चा ऐकताना मुलं प्रश्न विचारत होती. उत्तरंही देत होती. काही प्रश्नोत्तरं वाचली तर मुलांच्या विचारांची दिशा वाचकांना स्पष्ट होईल.

१) हे आंवेडकर कोण? ते जिवंत आहेत? त्यांचा पुतळा का उभारला? – स्वातंत्र्य मिळवून देणारे आंवेडकर. त्यांनी देशाची घटना लिहिली. ते आता जिवंत नाहीत. त्यांची आठवण रहावी म्हणून पुतळा उभारला आहे.

२) त्यांच्या पुतळ्याला चपलांची माळ का घातली असेल? – सगळीकडं दंगल, मारामाऱ्या व्हाव्यात म्हणूनच. आंवेडकरांचा अपमान करावा म्हणून.

३) कुणी केला असेल हा अपमान?'- देश द्रोह्यांनी.

४) आपण जे वार्तापत्र ऐकलं त्यात माळ कोणी घातली यावद्दल कोणता शब्द होता? – अज्ञात.

५) कोण असेल हा अज्ञात? – इंग्रज! (कोणीही भारतीय असं करणार नाही हा चौथीतल्या मुलाचा भावडा आशावाद!)

६) दंगलीतल्या मृतांसाठी सरकारनं मदत जाहीर केली आहे. त्यावद्दल तुम्हाला काय वाटतं? – मेलेलं माणूस दोन लाख मिळाल्यानं परत थोडंच मिळणार!

७) तुम्ही अठरा वर्षांचे झाल्यावर मतदान कराल. त्यासाठी आतापासून तुम्ही काय कराल? – हल्लेखोरांशी लढण्यासाठी आतापासून तंदुरुस्त राहीन. चौरस आहार घेईन. व्यायाम करेन. आम्ही एकमेकांत भांडणार नाही. दररोज वर्तमानपत्र वाचेन. देशात काय चाललं आहे हे समजून घेणं हा एक प्रकारचा अभ्यासच ना? आइस्क्रीम, चुईंगम न खाता तव्वेत चांगली ठेवेन.

८) मतदान करताना व उमेदवार निवडताना कोणती खवरदारी घ्याल? – लाच घेऊन मतदान करणार नाही. दंगलीत मी सामील होणार नाही. सामील होणाऱ्यांना समजून सांगेल. रस्ते, वाग, शाळा, चित्रपटगृह ह्यांचं नुकसान न करणं. उमेदवार आपला नातेवाईक आहे हा विचार करून मत देणार नाही. जो उमेदवार प्रजेची काळजी घेणारा असेल त्यालाच मत देईन.

सायंकाळी सव्वापाच वाजले. विद्यालयाची वेळ संपली. रिक्षांचे हॉर्न्स वाजू लागले. मुलं दप्तर आवरू लागली तरी आपापसांत दंगलीमुळं उदयदादांच्या एस. टी. महामंडळाचं किती नुकसान झालं यासंवंधी वोलणं चालू होतं. चपलांची माळ घातल्यामुळं माणसं मेली, जाळपोळ झाली हे वाईट झालं असा सूर होता. एक आवश्यक पण आव्हानात्मक शैक्षणिक कार्यक्रम पार पाडण्याचं किंचित समाधान आम्हांला वाटत होतं.

डॉ. आंवेडकरांच्या पुतळ्याची विटंवना आणि त्यानंतरच्या दोन-तीन दिवसांत उसळलेल्या दंगली, शासनानं घेतलेला पवित्रा हे सारं वर्तमानपत्र, आकाशवाणी, दूरदर्शन इत्यादी माध्यमांतून मुलांपर्यंत पोचत असतं. प्रौढांची वोलणी कानांवर पडत असतात. मुलांच्या मनात हे सारं पाहत-ऐकत असता घालमेल होत असते व मुलं अस्वस्थ असतात. त्यांच्या ह्या अस्वस्थतेचाच नागरिकत्वाच्या शिक्षणासाठी उपयोग व्हावा अशी विद्यालयाची धारणा आणि त्यांमुळेच असे उपक्रम हाती घेतले जातात.

### ६. विद्यालयातही आंतरराष्ट्रीय जलसाक्षरता वर्ष

२००४ हे आंतरराष्ट्रीय जलसाक्षरता वर्ष म्हणून घोषित झालं आणि सृजन-आनंदनं शिकण्या-शिकवण्याच्या ह्या आणखी एका पायवाटेनं चालून बघायचं ठरवलं. जलसाक्षरता हा विषय तसा बहुआयामी. अनेक अंगांनी समजून घेण्यासारखा आणि समजावून देण्यासारखा. आपल्या परीनं तो विषय विद्यार्थी, शिक्षक, पालक आणि समाज अशा चार स्तरांवर थोडाफार अभ्यासायचा आणि समजावून द्यायचा प्रयत्न करायचा असा विचार झाला. फक्त इयत्ता तिसरी - चौथीच्याच विद्यार्थ्यांना प्रकल्पात सामावून घ्यावं असं ठरलं. पर्यावरण क्षेत्रात काम करणाऱ्या सृजन-आनंदच्या उदय काकांनी प्रकल्पक म्हणून काम करायचं ठरलं. वास्तवाच्या अभ्यासातून मुलांचं शिकणं अधिक सकस तसंच प्रभावी होतं हा आमचा अनुभव. स्वाभाविकच मुलांना कोणकोणते अध्ययन अनुभव देता-घेता येतील व त्या अनुभवांतून जाता जाता मुलं काय काय शिकतील याचा आम्ही विचार केला. विज्ञान, भाषा, भूगोल, गणित अशा अभ्यासक्रमांतील वेगवेगळ्या विषयांशी मुलांचं शिकणं कसं जोडलं जाईल याचाही धांडोळा घेतला. जुलै ते डिसेंबर अशा काळात जलसाक्षरतेचं काम जोमानं पुढं गेलं. त्याचे काही तपशील आपण पाहू.

जलसाक्षरता

भाषा

१) 'पाणी' शब्दाशी जोडल्या जाणाऱ्या म्हणी, जोडशब्द, विशेषणं, क्रियापद, वाक्यप्रचार यांचा शोध व संकलन.

२) 'पाणी' विषयाबाबतच्या कविता शिकणं.

३) पाहणी करणं व निष्कर्ष मांडणं.

१. स्वतःच्या व शेजारील घरांची (वैयक्तिक काम)

२. मुक्त सैनिक वसाहतीतील अठ्ठावीस घरांची. (चौथीच्या मुलांचे सामुदायिक काम.)

३. डॉ. सुभाष आठल्ये यांच्या घराच्या छतावरील पाणी साठवणूक व पुनर्भरण (मुलाखत व अभ्यास)

४) 'पाणी पंचायती'चा वर्गपातळीवर अनुभव.

५) नर्मदा धरणामुळे जमीन, घरं, शाळा पाण्याखाली गेलेल्या मुलांशी संवाद.

६) नर्मदेकाठच्या मुलांच्या मागण्यांना पाठिंबा देणारं पत्र मुख्यमंत्र्यांना लिहिणं व पाठवणं.

विज्ञान + गणित

१) पाणी शिळं होतं हा गैरसमज आहे.

२) पाण्याचे उपयोग व गुणधर्म समजून घेण्यासाठी पस्तीस प्रयोग मुलांनी केले व त्यांचा मथितार्थ समजून घेतला.

३) नळातून थेंब थेंब पाणी गळल्यामुळं एक लिटर पाणी वाया जायला किती वेळ लागतो याचा शोध घेणं.

४) नळ सोडून काम करण्याऐवजी तांब्या/मग वापरूनच कामं केली तर किती पाणी लागतं याचा अभ्यास करणं.

५) वाया जाणाऱ्या पाण्यासंबंधी आकडेवारी जमवून एका तासात/एका दिवसात किती पाणी वाया जातं हे शोधून देशपातळीवर असं किती पाणी वाया जात असेल याचा अंदाज घेणं.

६) पाण्याची शुद्धता तपासणी म्हणजे काय व ती कशी करतात यांचे प्रात्यक्षिक आरोग्य प्रयोगशाळा अधिकाऱ्याकडून समजून घेऊन चर्चा करणं.

७) बाटलीबंद पाण्याची शुद्धता व त्याची अवास्तव किंमत लक्षात घेणं.

इतिहास + भुगोल

१) भारतात पाण्यासाठी झालेले चवदार तळे, महात्मा फुले यांनी घरातील हौद दलितांसाठी खुला केला व एक गाव एक पाणवठा असे संघर्ष समजून घेणं.

२) विविध जलरूपं पाहणं व अभ्यासणं.

मुलांची शोधितं

१) मुक्त सैनिक वसाहतीतील २७३ पैकी ३१ घरांतील टाक्या वाहून जातात. एक मिनिट टाकी वाहिली तरी प्रतिदिवस दहा लीटर पाणी वाया जातं. दररोज कोल्हापूर शहरातील एक हजार घरांतील टाक्या वाहून जात असतील तर प्रतिदिन दहा हजार लिटर पाणी वाया जाईल.

२) १४४ घरांत आदले दिवशीचे पाणी 'शिळे' म्हणून ओतून टाकतात. २२२ घरांत देवपूजेसाठी व नैवेद्यासाठी ताजंच पाणी वापरतात.

३) पाहणी केलेल्या घरांपैकी १०८ घरांत १९१ व्यक्तींना पाण्यामुळं होणारे आजार झाले, पैकी २७ व्यक्तींना असे आजार वरचेवर झाले.

४) घराबाहेर जातात तेव्हा १९१ घरातले लोक बाटलीबंद पाणी वापरतात तर १७२ घरातील लोक प्रवासात बाटलीबंद पाणी खरेदी करतात.

बाटलीबंद पाण्याच्या शुद्धतेबद्दलची माहिती घेता ते पाणी वापरण्यापेक्षा घरात उकळून गार केलेलं पाणी आपल्याकडील बाटलीत भरून ते वापरणं योग्य ठरतं.

शिवाय बाटलीबंद पाण्याची प्रतिलिटर किंमत बारा रुपये आहे तर घरगुती उकळून बाटलीत भरलेल्या पाण्याची किंमत १००० लिटरला सात रुपये असते.

मुलांचे निष्कर्ष

१) पिण्यासाठी पाणी देशात फक्त दोन टक्के आहे.

२) म्हणूनच पाणी वाया घालवणं हा गुन्हा आहे.

३) छतावरचं पाणी साठवून पाण्याचं पुनर्भरण करायला हवं.

४) 'शिळं' म्हणून पाणी ओतून टाकता कामा नये.

५) वॉशिंग मशिनमधील पाणी, घरातील सांडपाणी, वाहन धुण्यासाठी वापरलेलं पाणी यांचा पुनर्वापर करून शुद्ध पाण्याचा अनावश्यक वापर टाळला पाहीजे.

६) बाटलीबंद पाणी वापरू नये.

७) पाणी शुद्ध करण्यासाठी ते उकळलेलं उत्तम. ॲक्वागार्डपेक्षाही उत्तम.

८) टाकी, नळ वाहून जाणं हा गुन्हा मानला








पाहिजे. त्या गुन्ह्याची दखल घेऊन त्यास योग्य शासन व्हावं.

मुलांचं शिकणं 'अर्थपूर्ण' व्हावं म्हणून सभोवतालच्या वास्तवाशी त्याचे दुवे जोडण्याचे प्रयत्न हा विद्यालयानं मानलेला स्वधर्म आहे. स्वधर्मपालन करीत असता नेहमी जाणवतं ते असं की शिकण्या-शिकवण्याच्या विशिष्ट वाटा विशिष्ट इयत्तांतच वापरल्या जाव्यात असा अलिखित संकेतच आपण घालून घेतला आहे. उदाहरणार्थ, सर्वेक्षण करणं, त्यांचे निष्कर्ष शोधणं आणि ते आलेख, लेखन, मुलाखत, संवाद इत्यादी माध्यमांतून मांडणं हे माध्यमिक, उच्च माध्यमिक व पदवीपातळीवरच असू शकतं हे गृहीतक सर्व शिक्षकांनी जणू मान्य केलं आहे. २७३ घरांच्या पाहणीच्या निष्कर्षांची मांडणी मुलांच्या मदतीनं करताना उदयकाकांनी २७ चा पाढा फलकावर लिहिला. मुलांनी भरून आणलेल्या प्रश्नावल्या प्रत्येकाला एक याप्रमाणं वाटून संबंधित प्रश्नांचे त्या घरात मिळालेले उत्तर मुलाने वाचावे आणि अशा ३५ प्रश्नावल्यांची वारंवारिता काढून त्यासंबंधात निष्कर्ष काढावा हा मार्ग अनुसरला. एकाद्या बाबीसंबंधी पंचायतीच्या माध्यमातून कसा शोध घेतला जातो याची झलक विद्यालयातील पाण्याची साठवणूक, त्याची शुद्धता राखण्याचे प्रयत्न, पाण्याचा गैरवापर असा आत्मशोध घेत मुलांनी पाहिली. याशिवाय पाणी हा विषयांश इयत्ता पहिली ते चौथी या स्तरावर कसा मांडला गेला आहे, कोणते प्रयोग अपेक्षित आहेत, कोणते प्रयोग अपेक्षित नसले तरी आवश्यक आहेत असा अभ्यास शिक्षकांकडून झाला आणि परिणामतः यावर्षी तिसरी-चौथीच्या विद्यार्थ्यांना पाण्याचे उपयोग व गुणधर्म स्पष्ट करणारे पस्तीस प्रयोग करून पाहता आले किंवा केलेले पहायला मिळाले. पाण्याचं दुर्भिक्ष्य, पाण्याचं प्रदूषण हे प्रश्न घराघरांत चर्चिले जात असले तरी अभ्यासक्रमात त्यांचा शिरकाव होईपर्यंत ते वेशीबाहेर राहतात. Catch them young या वाक्यप्रचाराचा catch हा शब्द थोडी धरपकड केल्यासारखा वाटतो म्हणून आवडत नसला तरी त्यातील गर्भितार्थ मुलांचे लहान वय, त्यांचा शिकण्याचा आशय आणि त्या आशयाची व्याप्ती व खोली यांच्याआड येऊ नये हाच असल्यानं तो वाक्यप्रचार लक्षात घेउन प्राथमिक शिक्षण एकमार्गी, एकसुरी व परीक्षेपुरतं असू नये असा प्रयत्न करूया.

७. जागर बालकहक्काचा

२००१ पासून आजवर सृजन-आनंद-शिक्षण केंद्र व मनोरमा विश्वस्त कुंज ह्या संस्थांमार्फत महाराष्ट्र व महाराष्ट्राबाहेरील सव्वीस माध्यमिक शाळांत इयत्ता आठवी, नववी व दहावीत शिकणाऱ्या बाराशे छपन्न विद्यार्थ्यांच्यापर्यंत बालक हक्कांबाबत पोचण्याचं अवघड काम विद्यार्थ्यांच्या विचारशक्तीबाबतच्या अपार श्रद्धेमुळंच आमच्या हातून पार पडू शकलं. बालकहक्क सनदेतील १) विद्यार्थ्यांना विचार करता येतो. २) त्यांना मतं असतात. ३) शिस्त राबवताना विद्यार्थ्यांच्या आत्मसन्मानाला धक्का लागता कामा नये. ४) मनोरंजनाचा त्यांना हक्क आहे – अशा चार कलमांबाबत प्रत्येक शाळेत वरील तीन इयत्तांचे एकूण एकशे पन्नास विद्यार्थी व त्यांचे एकशे पन्नास पालक-शिक्षक यांच्याशी संवाद साधत त्यांचे लिखित विचार/मतेही संग्रहित केली आहेत. कामाची व्याप्ती व आमची ताकद यांचं व्यस्त प्रमाण ओळखूनही केवळ शिक्षणातील व्यवस्थापरिवर्तनाच्यादृष्टीनं कामाचं असलेलं महत्त्व लक्षात घेउन बालकहक्क जागृतीचं हे काम पार पाडण्याचा प्रयत्न केला आहे व करीत आहोत.

बालकहक्काबाबतची चर्चासत्रं घेताना जाणवलं की अभ्यासक्रम, क्रमिकपुस्तकं, स्वतंत्र विचाराच्या अभिव्यक्तीला वाव न देण्याऱ्या परीक्षा व जास्तीत जास्त मार्क मिळविण्यासाठी असणारा दबाव हे सारं असूनही कुतुहल-पूर्तीच्या जबरदस्त नैसर्गिक प्रेरणेमुळं मुलं कुठून ना कुठून सामाजिक वास्तव समजून घेतात. आपाततः पडलेलं बी जसं रुजतं, अंकुरतं, वाढतं त्याप्रमाणं मुलांच्या मनात विचारबीजं अंकुरतात, वाढतात आणि संधी मिळताच मुले आपले विचार, मतं व्यक्त करण्यास उत्सुक असतात. मुलांची लिखितं तुम्ही वाचलीत तर शाळा, घर आणि समाज अशा तीन स्तरांवर त्यांना जे परिवर्तन हवं आहे त्यांचं सुस्पष्ट चित्र आपल्या डोळ्यांसमोर उभं राहतं. केवळ नमुना म्हणून त्यांच्या लेखनातील काही वाक्यं वाचू या.

शाळेबाबत :

१) शिक्षक सांगतील तेच व तसंच करावं लागतं.

२) मुलांची चूक नसताना शिक्षा करू नये.

३) विद्यार्थ्यांना मारणं, शिक्षा करणं व त्यांचा अपमान करणं हा शिक्षकांनी स्वतःचा हक्कच असं समजू नये.

४) सर्व विद्यार्थ्यांना समान हक्क असावेत. भेदाभेद नकोत.

५) विद्यार्थ्यांची मतं लक्षात घेऊन निर्णय करावेत.

६) शिक्षकांना जाब विचारण्याचा हक्क असावा.

७) शिक्षकांची चूक सांगण्याचा हक्क असावा.
८) आम्हांला पशूसारखं वागवू नये.

कुटुंबासंबंधी

१) कुटुंबाचा घटक म्हणून मुलांना हक्क द्यावेत. त्यांनाही आपलं मत मांडण्याचा हक्क हवा.

२) पालकांनी आपल्या इच्छा मुलांवर लादू नयेत.

३) मुलांना मारणं हा आपला हक्कच असं पालकांनी समजू नये.

४) स्वतःच्या अंधश्रद्धा आमच्यावर लादू नयेत.

५) स्वतंत्रपणे विचार करणे हा आमचा हक्क आहे हे पालकांना समजायला हवं.

६) परीक्षेत जास्त गुण मिळवण्यासाठी सतत दबाव नसावा.

समाजासंदर्भात

१) नेत्यांनी बोलणं कमी व कामकाज जास्त करावं.

२) पैसा देशाच्या कारणी वापरावा. अनेक सरकारी योजना पुढारी मंडळी आम जनतेपर्यंत पोचू देत नाहीत.

३) मंत्र्यांना फक्त पगार द्यावेत. इतर खर्च देऊ नयेत, सरकारमार्फत पुरवली जाणारी वाहनं काढून घ्यावी.

४) परदेशी दौरे व पाहुणे यांच्यावरील खर्चात कपात करावी.

५) सार्वजनिक सचोटी पाळली गेली पाहिजे.

८. प्रकल्प : अध्ययनाची एक मनोहर वाट

अभ्यासक्रम व क्रमिकपुस्तकं यांच्या भिंती ओलांडून आणि तरीही त्यांतील अनेक आशयांना उपयुक्त ठरणाऱ्या विद्यार्जनाच्या आणखी एका पायवाटेवर विद्यालयाची वाटचाल अखंडित चालू आहे. प्रकल्प हे त्या पायवाटेचं नाव. अध्यापनाची एक पद्धत म्हणून प्रकल्पपद्धत अनेकांना परिचित असेल. विविध विषयांतर्गत परस्परांना पोषक ठरणारे दुवे शोधणं आणि त्यांची सांधेजोड करणं हे विद्यालयात नित्याचं असलं तरी प्रकल्पपद्धतीनं एखाद्या विषयाचं वर्षभर अध्यापन करणं शक्य झालेलं नाही. मात्र दैनंदिन जीवनाशी निगडीत असणारा छोटासा विषय निवडून सामान्यपणे जुलै ते डिसेंबर ह्या कालावधीत आठवड्याला दोन तासिका याप्रमाणं त्या विषयाची उकल विविध अंगानं मुलांसमवेत केली जाते. ह्या प्रयत्नाला आम्ही प्रकल्प म्हणतो. प्रकल्पक म्हणून जी व्यक्ती काम करणार असते तिला प्रकल्पविषय आणि इयत्तानिवडीचं जसं स्वातंत्र्य असतं तसंच स्वतःच्या आणि मुलांच्या क्षमताविकासाचं क्षितिज विस्तारण्यासाठी ह्या विषयांतर्गत कुठवर, कसं, कोणाकोणाच्या सहाय्यानं पोचायचं याचं संपूर्ण स्वातंत्र्य असतं. बहुतेक प्रकल्प एका शैक्षणिक वर्षापुरतेच असले तरी 'पक्षी व अन्न प्रकल्प' पहिली ते चौथी अशी चार वर्षे त्याच मुलांसमवेत चालू होता. एखाद्या विषयाचा अभ्यास सलग चार वर्षे करायला मिळाल्याने मुलांची समज वाढते त्याप्रमाणं प्रकल्प अधिक सखोल व बहुआयामी होऊ शकतो हा विश्वास त्या प्रकल्पांनी विद्यालयाला मिळाला. कीटक शोधयात्रा, वस्तू आणि जीवन, सजवू या, पोस्टऑफीस, घड्याळ - अशा वेगवेगळ्या विषयांवर प्रकल्प झाले आहेत. इंग्रजीसाठी पाच तासिका द्यायच्या असं शासनानं जाहीर केल्यानंतर त्या तासिका देण्यासाठी कुठल्या तरी विषयाला/उपक्रमाला दिलेल्या तासिका कमी करणं अगर तो उपक्रम गाळणं असा पेच संचालकांसमोर होता. त्यावर्षी आम्ही प्रकल्प करणं मुलांना, पालकांना कितपत आवडतं, आवश्यक वाटतं यासंबंधी एक अनौपचारिक मतचाचणी घेतली होती. झाडून साऱ्या मुलांनी आम्हांला 'प्रकल्प हवाच' असा कौल दिला होता.

९. स्वातंत्र्यदिन वर्तमानपत्र

एका स्वातंत्र्यदिनाचा विशेष उपक्रम म्हणून 'स्वातंत्र्य' या विषयावर वर्तमानपत्र तयार करायचं योजिलं होतं. पालक, शिक्षक, आजी व माजी विद्यार्थी अशा चार गटांनी आपापलं वार्तापत्र तयार करावं असं ठरलं. झेंडावंदनानंतर सभागृहात गटवार बसून घड्याळी दोन तासांत काम पूर्ण करावं अशी अपेक्षा होती. मजकूर आधी लिहून आणून चालणार नाही अशी सूचना होती. इयत्ता पहिलीतील सहा-सात वर्षांच्या मुलांपासून थेट सत्तरीपर्यंतची माणंस एकाच सभागृहात एकाच प्रकारच्या कामात मग्न असल्याचं ते दृश्य खूप आगळंवेगळं व स्फूर्तीदायक होत.

१०. सापपंचमी

लोकसंस्कृतीचा एक पदर म्हणून एका वर्षी नागपंचमीला विद्यालयात 'सापपंचमी' साजरी झाली. अजगर, गवत्या, धामण अशी कितीतरी सापमंडळी विद्यालयात पाहुणे म्हणून आली होती. साप डूख धरतो, त्याला कान असतात, तो









दूध पितो, तो मारायलाचा हवा कारण प्रत्येक साप विषारी असतो अशा कितीतरी समजुतींना त्या दिवशी अनुभवसिद्ध छेद गेला. साप शेतकऱ्यांचा मित्र असं का म्हटलं जातं हे समजलं. निसर्गमित्रचे कार्यकर्ते एखादा सुंदर गळपट्टा घालावा तसं साप गळ्यात घालून फिरताना बघून बिनविषारी साप हातात धरून बघायचं धारिष्टही अनेक मुलांनी केलं.

११. म्हणे गणपती दूध पितो!

काही उपक्रम अकस्मात करावेच लागतात. 'गणपती दूध पितो' ही बातमी वर्तमानपत्रात आल्यावर उदयदादांनी उत्साहानं मुलांना त्याबाबतचं प्रात्यक्षिकच दाखवलं! गणपती दूध पितो असा समज कसा पसरवला गेला हे जसं मुलांना समजलं तसा गणपती दूध पिणं शक्यच नाही हेही मुलांना उमगलं.

आतापर्यंत आपल्यासमोर जे उपक्रम मांडले त्यांचं आणि त्यासारख्या अनेक उपक्रमांचं नियोजन व कार्यवाही करण्यामागं प्रमुख हेतू होता विमुक्त करणारी विद्या अनुभवण्याचा. कशाकशापासून मुक्तता? शिक्षणाची सारी सूत्रं स्वतःकडे ठेवू पाहणारं शासन, क्रमिकपुस्तकांची कुंपणं, चाकोरीबद्ध अध्यापनपद्धती, वाडगा पुढं करून त्यात पडेल ते स्वीकारणारे पालक, संस्थाचालकांची एकाधिकारशाही, विद्यार्थ्यांची फक्त श्रवणाची भूमिका आणि पराधीनतेनं झाकोळलेलं एकूण शिक्षणक्षेत्र – अशा विविध बंधनांतून आपल्याला विमुक्त व्हायचं आहे. विचार करायला, मत मांडायला, अंधश्रद्धेचा त्याग करायला, नवे विचार/श्रद्धा ठामपणानं मांडायला आजवर आपण शिकलोच नाही. देश स्वतंत्र झाल्याला छपन्न वर्षं होऊनही आपण वैचारिक गुलामगिरी तोडली नाही. म्हणूनच असं वाटतं की राजरस्ते सोडून शिक्षणाच्या पायवाटा धुंडाळणारी आमच्यासारखी जी विद्यालयं आहेत त्यांचा प्रमुख स्रोत स्वातंत्र्याची ओळख करून देणं, त्याचा सराव करणं आणि त्याच्या रक्षणार्थ जरूर तर संघर्षालाही सिद्ध राहणं हाच आहे. भारत एकवेळ महासत्ता नाही झाला तरी चालेल पण तो सर्वार्थानं स्वायत्त मात्र झाला पाहिजे आणि तसं होण्यासाठी शिक्षण स्वायत्त होणं फार आवश्यक आहे.

**शैक्षणिक स्वातंत्र्याच्या रक्षणार्थ**

१. चौथीची दर्जा परीक्षा

स्वातंत्र्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे असा विचार मांडणाऱ्या महाराष्ट्रात स्वातंत्र्यावर घाला होऊ लागला की स्वस्थ राहणे हीदेखील एकप्रकारे पारतंत्र्याची पाठराखणच! अशी पाठराखण सृजन-आनंदनं नाकारली आहे. दोन वर्षांपूर्वी शैक्षणिक दर्जा सुधारण्यासाठी शिक्षणमंत्र्यांनी पूर्वमाध्यमिक स्पर्धा परीक्षा सक्तीची असेल असं जाहीर केलं. स्पर्धा ही सक्तीची असूच शकत नाही. सक्ती करायचीच असेल तर सहभागी होणाऱ्या सर्वांना समान दर्जाचं शिक्षण, समान दर्जाचा सराव यांची संधी असायलाच हवी. प्राथमिक शाळांतील अध्यापनाच्या दर्जात असणारी असमानता, साधनसुविधांतील कमी-अधिकपणा लक्षात घेता पूर्वमाध्यमिक परीक्षा सक्तीची करण्यानं दर्जा सुधारण्याऐवजी शेकडो मुलांच्या संभाव्य नापासीमुळं त्यांच्यात न्यूनगंड निर्माण होऊन त्यांचं मानसिक खच्चीकरण होण्याचीच शक्यता अधिक संभाव्य होती. त्या परीक्षेसाठी सुचविलेलं शुल्क, धोरण जाहीर झाल्यानंतर परीक्षेसाठी असणारा अपुरा वेळ – अशा अनेक बाबी लक्षात घेता 'दुखण्यापेक्षा इलाज भयंकर' असं वाटून लीलाताईंनी *पुणे सकाळ, साप्ताहिक सकाळ* मध्ये दर्जा परीक्षा सक्तीची असता कामा नये अशी ठोस भूमिका तर मांडलीच पण पुणे सकाळमध्ये त्याबाबत शिक्षणमंत्र्यांना एक अनावृत पत्रही लिहिलं. शिक्षणक्षेत्रात काम करणारी काही इतर मंडळी व संस्था यांनीही त्या धोरणास कडाडून विरोध केला. परिणामतः स्पर्धेत उतरायचं की नाही हे ठरवण्याच्या शैक्षणिक स्वातंत्र्याचं रक्षण होऊ शकलं.

२. पहिलीपासून इंग्रजी विषय सक्तीचा

स्पर्धा परीक्षांना अतिरिक्त महत्त्व लहान मुलांच्या सर्वांगीण विकासाला मारक ठरतं हा विचार अनेक विचारवंत, बालमानसोपचारतज्ज्ञ जसा मांडतात तसंच प्राथमिक शिक्षणाच्या स्तरावर खूप विषय अभ्यासक्रमात घुसडवणंही अपकारक आहे असा विचार वारंवार व्यक्त केला जातो. जगातील अनेक प्रगत देशांतही प्राथमिक स्तरावर इंग्रजी विषय सक्तीचा नाही आणि तसं करणं मातृभाषेच्या विकासाला मारकही ठरतं असा बुलंद सूर असूनही शिक्षणमंत्र्यांनी इयत्ता पहिलीपासून इंग्रजी हा सक्तीचा विषय म्हणून रेटला. इंग्रजी भाषा म्हणजे जणू प्रगतीची गुरुकिल्लीच असते, ह्या मानसिक गुलामगिरीमुळं महाराष्ट्राचं धोरण म्हणून त्याला मान्यताही मिळाली! याही बाबतीत सृजन-आनंद व कोल्हापुरातील इतर काही शैक्षणिक संस्था यांच्यामार्फत शिक्षणमंत्र्यांना एक पत्र लिहिण्यात आलं होतं. त्या पत्राला साधं उत्तर पाठविण्याचं








सौजन्यही आमच्या वाट्याला आलं नाही! तज्ज्ञांना विद्यालयात निमंत्रित करून पालकांसमोर पहिलीपासून इंग्रजी सक्तीचं असण्यावावतचे साधक-वाधक विचार मांडून त्यांची सजगता वाढविण्याचे प्रयत्न आम्ही केले. मात्र विद्यालय फक्त इयत्ता चौथीपर्यंतचं असल्यानं पहिलीपासून इंग्रजी न शिकवण्याचं धोरण कदाचित विद्यालयानं आखलं तर पाचवीत प्रवेश मिळवताना त्या धोरणाखातर कदाचित मुलांचा वळी घेतला जाईल म्हणून इंग्रजीतील अपेक्षित क्षमताप्राप्तीसाठी प्रत्येक इयत्तेत इंग्रजीसाठी दोन तासिका असं धोरण आखून इयत्ता पहिलीपासून इंग्रजीचं अध्यापन असावं असं पालकांच्या सहमतीनं ठरवलं.

३. पाऊस हवाय? प्रार्थना करा!

राज्यपालांच्या संदर्भात विरोध व्यक्त करण्याचा असाच एक प्रसंग वरील दोन प्रसंगांच्या साखळीत गुंफण्यासारखा आहे. सृजन-आनंदच्या स्थापनेला सहावं वर्ष चालू असताना सन १९९२ मध्ये पावसानं फारच ओढ दिली. जिकडं तिकडं हाहाःकार उडाला. त्यावेळी राज्यपालांनी पावसासाठी सर्वांनी १७-७-१९९२ रोजी प्रार्थना करावी असा आदेश जारी केला. लीलाताईंनी त्यांना अनावृत पत्र लिहिलं. 'परिवर्तनशील शिक्षण' ह्या त्यांच्या पुस्तकात पृष्ठ १८२ - १८६ वर ते पत्र समाविष्ट केलेलं आहे. इच्छुकांनी ते जरूर वाचावं. शिक्षण हे समाजपरिवर्तनाचं एक साधन मानलं जातं. शिक्षणक्षेत्राच्या व्यवस्थेत आवश्यक ते परिवर्तन होणं हाही समाजपरिवर्तनाच्याच चाकाचा एक आरा आहे ह्या विचारानं प्रेरित होऊन नवं राष्ट्रीय शैक्षणिक धोरण, प्राथमिक व माध्यमिक स्तरांवरील पुनर्रचित अभ्यासक्रम आणि पाणी प्रश्नावरील श्री. वापू उपाध्ये यांचा लेख असे संदर्भ देऊन राज्यपालांच्या आदेशानं एक शिक्षक म्हणून आपण का व्यथित झालो हे त्या पत्रात थोडक्यात स्पष्टपणं मांडलं. त्यांच्या पत्रातील काही मजकूर वाचू या. "औपचारिक शिक्षणाच्या कक्षेत येणाऱ्यांना पाण्याच्या संदर्भात दूरगामी तसंच तातडीच्या कोणत्या उपाययोजना कराव्यात यावावत विचारशील व कृतिशील करण्याऐवजी आपण त्यांना देवाला साकडं घालायला सांगून वैज्ञानिकतेपासून दूर लोटलं असं म्हणता येईल का? शिवाय जे लाखो लोक शिक्षणाच्या कक्षेवाहेर आहेत त्यांचा आकाशाच्या वापावरचा विश्वास वाढविण्यासच आपला आदेश सहाय्यभूत झाला असेल का? ... भगीरथाचे पुत्र ज्या देशात निर्माण झाले त्याच देशातल्या एका राज्यपालांनी पावसासाठी सार्वजनिक प्रार्थना करण्याचा उपाय सन १९९२ मध्येही का वरं सुचवला असेल? ... आदेशाच्या दुसऱ्या दिवशी विद्यापीठापासून पूर्वप्राथमिक शाळांपर्यंत आणि साऱ्याच शासकीय व निमशासकीय संस्थांत जे दृश्य दिसलं त्यामुळं निदान मी तरी विज्ञानाधिष्ठित समाजरचनेच्या संदर्भात सचिंत झाले." असं अनावृत पत्र लिहिण्याचे परिणाम काहीही होण्याची शक्यता गृहित धरूनही विचारस्वातंत्र्याचा मानवी अधिकार लीलाताईंनी वजावला आणि स्वातंत्र्यरक्षणार्थ (वैचारिकही स्वातंत्र्य) जरूर तर शासनाविरुद्धही आवाज उठवला पाहिजे असं आवाहनही केलं.

शालेय संचालन आणि लोकशाही

१. अधिकारशाहीची उतरंड नाही

विद्यालयानं पहिला श्वास घेतला तेव्हापासून आजवर विविध मार्गांनी लोकशाही विचाराची रुजवण व जोपासना करण्याचा प्रयत्न आहे. विद्यालयात इयत्तांच्या पाट्या नाहीत. घंटा नसूनही वेळेवर कामकाज सुरू होतं. छोटी सुटी, मोठी सुटी होते. शिक्षक आपापल्या तासिकांना त्या त्या इयत्तांत शिकवत असतात. अधिकारशाहीची उतरंड नसल्यानं कार्यालय, मुख्याध्यापक अशाही पाट्या नाहीत. पूर्णवेळ काम करणारे चार वर्गप्रमुख, दोन सेविका व सहाय्यक ताई - दादा अशी एकूण वीस-वावीस मंडळींची सृजनची 'टीम' आहे. मुलं त्याना ताई-दादा म्हणतात. पट्टीचा वापर रेषा आखण्यासाठी असतो. मारण्यासाठी तिचा वापर होत नाही. अन्यायाचं निवारण समजावणी, रुजवात, न्यायसभा, निषेध अशा मार्गांनी होत असते. परीक्षांतील गुणांना असणारं महत्त्व जसं वाखाणलं जातं तसंच इतरांना मदत करणं, खरं वोलणं, फरशी स्वच्छ झाडणं, छान वागणं, पाढे पाठ असणं अशा साऱ्यांचीच 'छान छान' मध्ये नोंद घेतली जाते. शरीरश्रमाचा आस्वाद घ्यावा म्हणून मुलं, ताई-दादा व सेविका अशी सारीजणच वर्गखोल्या, व्हरांडे , वस्तू यांची साफसफाई करतात. हा रिवाज रुळणं पहिली एक-दोन वर्ष अवघड गेलं. पण एकादशव्रताचा एक भाग म्हणून आता तो अंगवळणी पडला आहे. ताईंनी तयार केलेली चांदणी मिळणं, वर्गखोलीतील फलकावर आठवडाभर आपलं नामांकन असणं, सृजन-आनंद टाळी लाभणं, प्रार्थनेच्यावेळी सर्वांसमोर शावासकी मिळणं, इयत्तेमधील विद्यार्थ्यांत आवडता म्हणून उल्लेख होणं अशा 'श्रीमंती'च्या नव्या वाटा, नव्या भाषा दर्शविण्याचा आमचा प्रयत्न असतो. जात-पात, गरिवी-श्रीमंती हा भेदाभेद मुलांच्या



अनुक्रमणिका

खिजगणतीत नसतो, तसाच मुख्याध्यापक, शिक्षक, सेवक हा उच्चनीच भावही त्यांना विद्यालयात तरी जाणवत नाही. तो जाणवू नये असे प्रयत्नही असतात. विद्यालयाच्या पहिल्या दिवसापासून आजवर आमच्यावरोवर असणाऱ्या विजया कांवळे ताई-दादांच्याप्रमाणे व्हरांड्यातल्या खुर्चीवर वसतात. एकदा तर २६ जानेवारीच्या ध्वजवंदनासाठी प्रमुख पाहुण्या म्हणून त्या निमंत्रित होत्या व साऱ्यांनी त्यांना मानवंदना दिली होती! शाळेत होणाऱ्या उपक्रमावद्दल अनेकदा त्यांनी ताई-दादांप्रमाणे अहवालही लिहिले आहेत. एकाच मस्टरमध्ये मुख्याध्यापक, वर्गप्रमुख, सहाय्यक शिक्षक आणि विजयाताई यांच्या सह्या असतात. स्वातंत्र्याच्या संकल्पनेत समाविष्ट असणारी समता, बंधुता व सामाजिक न्याय यांचे असे सहज आविष्कार वेगवेगळ्या रूपांत मुलं, पालक यांना सुपरिचित होतात.

२. पालकांची 'ॲक्टिव्ह पार्टनरशिप'

'लोकसहभाग' हे विद्यालयाचं एक वैशिष्ट्य आहे. काहींचा संपूर्ण मानद सहभागही असतो. वर्गप्रमुख म्हणून काम करणाऱ्या विमलताई, अरुणाताई, गायत्रीताई यांची मुलं याच विद्यालयात शिकली. आज वालशिक्षणात नाव कमावलेल्या सुचिताताईंचं विद्यालयातलं पहिलं पाऊल पालक म्हणूनच पडलं. गेली पंधरा वर्षे त्या शिक्षक म्हणून योगदान करीत आहेत. कविता, गाणी रचणाऱ्या, म्हणणाऱ्या निमाताईंची भैरवी इथूनच चौथी उत्तीर्ण झाली. विद्यालयाला एक वेगळी 'श्रीमंती' त्यांच्यामुळे लाभली आहे. वेगवेगळे मॉडेल्स करणारे, साप, ससा, घुवड मुलांना दाखवायला आणणारे उदयकाका मुलांचे आवडते आहेत. ही माणसं जशी विद्यालयातील 'ॲक्टिव्ह पार्टनर' आहेत त्याप्रमाणं वेगवेगळ्या संदर्भात पालकांचाही अध्यापनातही सहभाग असतो. शिक्षकदिन हा तर केवळ पालक-अध्यापनाचाच भाग असतो.

३. शिक्षक दिन

प्रत्येक वर्षी ५ सप्टेंवरला अर्धा दिवस चारही इयत्तांत पालकच शिकवतात. इयत्तेतील मुलांची आकलन-क्षमता लक्षात घेऊन पस्तीस ते चाळीस मिनिटांच्या अध्यापनाचं नियोजन करावं अशी अपेक्षा असते. विषयाची निवड, मांडणी, आवश्यक साहित्यांची / साधनांची जमवाजमव अशी पालकांची जय्यत तयारी सात-आठ दिवस चालू असते. शिक्षकदिन संपल्यावर प्रत्येक पालक स्वतःच्या वर्गअध्यापनावावत लेखी अहवाल देतात. ५ सप्टेंवर २००३ रोजी झालेल्या शिक्षकदिनासाठी पावसाची गाणी, रिक्षावाल्या मामांची मुलाखत, कागद, हस्तकला, पाण्याचं विल इत्यादी विषय पालकांनी निवडले होते. अहवालात पालकांनी स्वतःचंच मूल्यमापन केलं आहे. पालकांच्या काही नोंदी वाचू या.

१) खूप दिवसांपासूनची इच्छा पूर्ण झाली. तीस मुलांना चाळीस मिनिटं शिकविण्याचं टेन्शन आलं होतं.

२) मुलाखत घेताना रिक्षावाल्यातील माणूस शोधण्यासाठी प्रश्न विचारण्याचा मुलांचा प्रयत्न चांगला होता.

३) मुलांना शिकवण्याच्या निमित्तानं पाण्याचं विल मी ही प्रथमच पाहिलं. गेली सात- आठ वर्षे शिक्षक दिनानिमित्त पालकांनी अध्यापनात सहभागी होणं अनेक प्रकारे उपयोगी ठरत आहे. शिकवण्यासाठी वरीच तयारी करावी लागते हे पालकांच्या लक्षात येतं. इतक्या लहान वयाच्या मुलांचं लक्ष वेधून घेणं व त्यांना विषयाकडं वळवणं सोपं नसतं हे उमजतं.

४) लहान असूनही मुलांचे प्रश्न खूप मार्मिक असतात हा अनुभव मिळतो.

५) पाण्याच्या विलासारखी सामान्य वाटणारी वावही शिकवायची म्हटलं की आपल्यालाही खरंच नवीन काही शिकावं लागतं हे उमजतं.

६) वालकाला केंद्रस्थानी मानून सृजनशील आनंददायी पद्धतीनं शिकवण्यासाठी स्वतःत खूपच कौशल्यं असावी लागतात हे पटतं.

७) शिकवण्याच्या अनुभवामुळं विद्यालय चालवणं किती कष्टदायक असेल ते लक्षात येते. थोडक्यात सांगायचं झालं तर पालक-शिक्षकांना एकमेकांना समजून घेणं शक्य होतं.

४. अध्यापन नोंदवह्या

विद्यालयातील चारही इयत्तांत दैनंदिन होणारं काम इयत्तावार वह्यांत नोंदलं जातं. दर शुक्रवारी दुपारी चार ते सायंकाळी सहा या वेळेत पालकांना वह्या वाचनासाठी उपलब्ध असतात. 'मुख्याध्यापकांच्या परवानगीशिवाय कोणी पालकांनी वर्गात जाऊ नये' अशा पाट्या अनेक शाळांत असतात. सृजन-आनंदमध्ये वर्गप्रमुखांची अथवा संबंधित विषय शिक्षकाची पूर्वपरवानगी घेऊन कुणीही पालक वर्गातील तासिकांचं निरीक्षण करतात. नोंदवहीत लिहिलेल्या काही भागावद्दल शंका असल्या तरी चर्चा होतात. दर महिन्याच्या शेवटच्या शुक्रवारी सायंकाळी चार ते पाच ह्या वेळात पालकांना कोणत्याही शिक्षकाला भेटण्याची संधी असते. पाल्यांला शाळेत

दाखल केल्यानंतर दाखला न्यायलाच पालकांनी शाळेत यावं असं न मानता पालक हाही शिक्षकांप्रमाणंच विद्यालयातला 'ॲक्टिव्ह पार्टनर' असू शकतो असा सृजन-आनंद विद्यालयातला विचार असल्यानं कोणत्याही दिवशी विद्यालयातील वर्गावर्गात काय घडलं याची नोंद पालकांना उपलब्ध करणारं कदाचित हेच एकमेव विद्यालय असेल!

५. दैनंदिन अध्यापन आणि पालक

एकादी संकल्पना स्पष्ट करण्यासाठी योग्य त्या पालकांचा क्रियात्मक सहभाग अध्यापनातही उपयुक्त ठरतो. एकदा मराठीच्या पुस्तकात 'नाव कमावणे' असा शब्दप्रयोग होता. 'कमावणे ही एक प्रकिया आहे. ती एक साधना आहे. त्या प्रक्रियेतील साधनेचा भाग वेगळ्या संदर्भात विद्यार्थ्यांपुढं उलगडला गेला तर 'नाव कमावणं' ह्या शब्दप्रयोगात गर्भित असलेली साधना मुलांपर्यंत सहज मांडता येईल असं वाटून पादत्राणांचा व्यवसाय करणाऱ्या सोनूच्या आईला शाळेत बोलावलं होतं. "मला बोलता येणार नाही" असं वाटणाऱ्या सोनूच्या आईनं परिश्रमपूर्वक तयारी करून कमावलेल्या व विनकमावलेल्या कातड्याच्या सर्व अवस्था मुलांना समजाव्यात यासाठी कातड्यांचे आवश्यक सर्व नमुने मुलांना दाखवले. कातडं कमावण्यासाठी कोणती रसायनं वापरली जातात ते सांगून प्रत्येकाचे नमुने त्यांना पहायला/हुंगायला दिले. कमावलेलं कातड तयार व्हायला किती वेळ लागतो हे सांगितलं. प्रशिक्षित नसलेल्या सोनूच्या आईनं 'कातडं कमावणं' ह्या विषयावर छान पाठ घेतला. त्या पाठाच्या पार्श्वभूमीवर चांगला विद्यार्थी म्हणून 'नाव कमावण्या'साठी हस्ताक्षर, लेखन, वाचन, बोलणं इत्यादी अभ्यासविषयक बाबींसंदर्भात आणि वागणुकीविषयी आपण काय काय करायला हवं हे प्रश्नोत्तरांतून मुलांपर्यंत सहज पोचलं.

श्री. नरेंद्र राजाज्ञा राजपत्रित वनअधिकारी आहेत. त्यांचा मुलगा नीरज सृजन-आनंदमध्ये होता. त्यांनी इयत्ता तिसरीसाठी दर बुधवारी वीस मिनिटं निसर्गात किती विविध प्रकारची झाडं, पानं, फुलं आहेत हे प्रत्येकाचे नमुने दाखवून स्पष्ट केलं. किंवहुना निसर्गातील विविधता, चमत्कार, गंमती सांगत, दाखवत नरेंद्रनी मुलांत निसर्गविषयक औत्सुक्य, प्रेम निर्माण करण्याचं परिसर अभ्यासाचं महत्वाचं उद्दिष्ट स्पर्शित केलं.

६. शिक्षकांच्या साप्ताहिक सभा

विद्यालय सुरू होतानाच दर आठवड्याला विद्यालयात शिकवणाऱ्या सर्वांची सहविचार सभा असायला हवी असं ठरवलं. त्याचं एक कारण असं की चार वर्गप्रमुख व दोन सेविकाच दररोज पूर्णवेळ विद्यालयात असतात. सुनिश्चित केलेल्या दिवशी व वेळी साहाय्यक ताई-दादांपैकी कोणी ना कोणी असतातच. वर्गप्रमुख व साहाय्यक ताई-दादा मिळून विषय अध्यापन, गृहपाठ, परीक्षा तसेच उपक्रमांचं नियोजन व कार्यवाही पार पाडतात. अशा प्रकारच्या शालेय संचालनामुळं प्रत्येक इयत्तेत वेगवेगळे शालेय विषय कशा रीतीनं शिकवले जात आहेत, अध्यापनाच्या काही वेगवेगळया वाटा अनुसरल्या जात आहेत का; कोणते उपक्रम साकारत आहेत, कोणते सराव पाठ दिले, कोणत्या प्रश्नमालिका तयार केल्या, क्रमिकपुस्तकाला पूरक अशा वेगळ्या वाटा कोणत्या शोधाव्या इत्यादींची एकत्रित चर्चा होऊन दैनंदिन अध्यापनाचं समीक्षण होणं आवश्यक ठरतं. काही मुलांबावत विशेष लक्ष घालायला हवं असलं तरी आठवडी सभेत ते समजतं व त्याची वेळीच दखल घेता येते. उपक्रमांची आखणीही अशा सभांतच होते.

साप्ताहिक सभेसाठी दीड ते दोन घड्याळी तास लागतात. त्यामुळं सभेच्या दिवशी शाळा पाच वाजून दहा मिनिटांऐवजी ऐवजी साडेचारलाच सुटते. विद्यालयाच्या शैक्षणिक गुणवत्तेच्या दृष्टीनं हा वेळ आम्हांला आवश्यकच वाटल्यानं आम्ही तो वेळ ह्या कारणासाठी वापरणं उचित मानलं. शासनाची त्यावद्दल अनुमती गृहित धरली. सामूहिक जवावदारीचा पायंडा स्वीकृत केलेल्या विद्यालयात सामूहिक विचारविनिमय, सामूहिक नियोजन आणि सामूहिक मूल्यमापन हे सामूहिक विचारशक्तीला वल देणारे टप्पे महत्त्वाचे वाटणं स्वाभाविकच मानावं लागेल. विद्यालय समजून घेण्यासाठी येणारी पाहुणेमंडळी आठवडी सभांचं लोकशाहीप्रधान प्रशासनात असलेलं महत्त्व मान्य करतात.

७. प्राथमिक शिक्षणाच्या प्रवाहासाठी योगदान

भारतात सर्वदूर त्रिपुरारी पौर्णिमेच्या रात्री अनेक मंडळी आपापल्या पणत्या तेलवात् घालून प्रज्वलित करून हलकेच नदीच्या पात्रात त्या प्रवाहित करतात. हे दृश्य मला नेहमीच प्रेरक वाटतं. आपली ज्योत किती वेळ तेवेल, कुठवर जाईल असा कशाचाच विचार न करता प्रवाहाला प्रकाश मनोभावानं निरपेक्षरित्या अर्पण करायचा. आम्हीही आमच्या










परीनं प्राथमिक शिक्षणाच्या प्रवाहाला आमचं योगदान मनोभावे करण्याच्या प्रयत्नांत असतो. सृजन-आनंद विद्यालय उभं करणं व ते विचारपूर्वक चालवणं, चालत ठेवणं हे योगदान फार फार तर एकशेचाळीस मुलं आणि पालकांपुरतं. आपापल्या पावला-पुरता प्रकाश असावा ही इच्छा जशी बाळगायला हवी तशी सर्वांच्या पावलांनाही प्रकाशाची सोबत हवी हा विचार ठेवायला प्राथमिक शिक्षणाच्या प्रवाहासाठी आम्ही आमच्या परीनं काही प्रयत्न केले आहेत.

१. पुस्तकं व लेखन - बालककेंद्रित आनंददायी शिक्षणाचा स्वीकार १९९२ मध्ये महाराष्ट्र शासनानं केल्यानंतर बालककेंद्रितता, आनंदमयता याबद्दलच आम्हाला उमजलेलं विवेचन अनेक लेखांत लीलाताईंनी मांडलं. बालभारतीच्या पुस्तकांतील अनेक बेच्यांवर परखड टीका केली; एवढचं नव्हे तर, 'क्षमताविकासाची आनंददायी अध्यापनयात्रा' हे पुस्तक, मराठीचं नवीन क्रमिक पुस्तक प्रकाशित होताच, लिहून सर्वसामान्य प्राथमिक शिक्षणाच्या प्रवाहासाठी आपलं योगदान दिलं. प्राथमिक शिक्षकांच्या प्रशिक्षणाचा झोत शासनानं 'आम्ही सांगतो ते, तसंच व तेवढंच करा' असा न ठेवता शिक्षणव्यवस्थेतील परिवर्तनासाठी आवश्यक असणारं विचारस्वातंत्र्य, विचारप्रवर्तन, कौशल्य-विकास, सृजनशीलता यावर तो असावा असं पुनःपुन्हा सुचविलं. पण आता इतर अनेक स्वयंसेवी सामाजिक/शैक्षणिक संस्थांप्रमाणंच आम्हालाही वाटू लागलं आहे की प्रशिक्षणाचा असा झोत असणंच शासनाला अभिप्रेत तरी नाही किंवा मान्य तरी नाही. प्रयोगशीलतेला वाव देण्याकडं शासनाचा कल नाही. प्रयोग करायचेच असतील तर ते फक्त शासनानं करावेत असा सूर दिसतो.

२. सृजनवर्ग, प्रशिक्षण सत्र व ध्वनिपट्टिका

सृजन-आनंद शिक्षण केंद्रामार्फत आजवर अनेक ठिकाणी शिक्षक प्रशिक्षण सत्रं झाली. सृजनशील, आनंददायी आणि सामाजिकदृष्ट्या अर्थपूर्ण ठरणाऱ्या प्राथमिक शिक्षणाची प्रात्यक्षिकं ठरतील असे सृजन-आनंद शिक्षण वर्ग झाले. शालेय शिक्षणाला पूरक पर्याय ठरू शकणाऱ्या शिक्षणजत्रा झाल्या. वृत्तीविकासाला पोषक ठरू शकेल अशी 'सृजन-आनंद गाणी' ही ध्वनिपट्टिका म्हणजेही प्राथमिक शिक्षणाच्या प्रवाहात आम्ही सोडलेली एक इवलीशी प्रज्वलित पणती! लीलाताईंनी मुक्त शिक्षण/सृजनशील आनंददायी बालककेंद्रित शिक्षण यांची सोदाहरण चर्चा करण्यासाठी सृजन-आनंदच्या पहिल्या वर्षापासून आतापर्यंत जे सहेतुक अध्यापन झालं त्याचा आलेख आठ पुस्तकांत मांडला आहे. शासनानं त्यांची फारशी दखल घेतली नसली तरी पुस्तकांच्या तीन-तीन आवृत्या झाल्या आहेत!

३. प्रकाशने

'प्रजासत्ताकाची मशागत' हे पुस्तक सृजन-आनंद विद्यालय व सृजन-आनंद शिक्षण केंद्रामार्फत दिनांक २६ जानेवारी २००१ रोजी प्रसिद्ध झालं. पुस्तकात एकूण एकेचाळीस लेख आहेत. डॉ. सत्यरंजन साठे, ॲड. डॉ. संतोष शहा, डॉ. सुनीलकुमार लवटे यांच्यासारख्या विचारवंतां-प्रमाणंच श्री. प्रकाश बुरटे, निलेश निमकर व सृजन-आनंद विद्यालयातील शिक्षक यांनी प्रजासत्ताकातील शिक्षणाच्या संदर्भात आपले विचार मांडले आहेत. विशेष म्हणजे ह्या साऱ्या प्रौढांच्या हाताला हात लावीत सृजनच्या आजी माजी विद्यार्थ्यांनीही प्रजासत्ताक, स्वातंत्र्य, निवडणूक लढवणं, लोकशाही इत्यादी विषयांसंबंधात स्वतःचे अनुभव दिलखुलासपणे व्यक्त केले आहेत. खरं तर अशा अफलातून पुस्तकाच्या निर्मितीपासून त्याच्या प्रकाशनापर्यंतचा प्रवास खडतर ठरणार हे माहीत असूनही आम्ही हा प्रकल्प तडीला नेला. एकाद्या अवघड समजल्या जाणाऱ्या विषयाबद्दल थोरांबरोबर पोरांनी व्यक्त केलेली मतं सामावणारं एकादं पुस्तक एका छोट्या प्राथमिक शाळेनं प्रकाशित करण्याचं धैर्य दाखवलं आहे याची दखलही शासन दरबारी नसेल! पण आपल्याला खुणावणाऱ्या कामाला आपण 'ओ' म्हणायचं आणि ते काम आपल्या परीनं पुरं करायचं हाच आमच्यासारख्या प्रयोगशील मंडळींचा स्वधर्म असतो.

४. राज्य पातळीवरील चर्चासत्र

१९९७ साली सृजन-आनंद शिक्षण केंद्राने युनिसेफ व शिवाजी विद्यापीठ यांच्याशी पत्रव्यवहार करून 'प्राथमिक शिक्षणातील प्रायोगिकता व गुणवत्ताविकास' ह्या विषयावर राज्य पातळीवरील एक चर्चासत्र दिनांक २३ व २४ ऑगस्ट १९९७ रोजी आयोजित करावं असा विचार मांडला. दोन्ही संस्थांच्या सहकार्यानं तो विचार कार्यवाहीत आला. नामवंत विचारवंत श्री. दत्ता सावळे, श्री. वसंत पळशीकर, माजी शिक्षणमंत्री श्री. सदानंद वर्दे व माजी शिक्षण संचालक श्री. चिपळूणकर यांच्याप्रमाणेच बालशिक्षणात प्रयोगशील कामं करणाऱ्या विविध संस्थांचे पदाधिकारी चर्चासत्रात सहभागी होते. 'प्राथमिक शिक्षणातील प्रायोगिकता व गुणवत्ताविकास :

पर्यायीनीती' ह्या पुस्तिकेत चर्चासत्रात सहभागी होणाऱ्यांचे विचार संकलित करून ती प्रसिद्धही करण्यात आली.

५. भारतीय घटनेतील मूल्यं हाच आमचा अभ्यासक्रम

स्वातंत्र्याच्या वाटेवरील आमच्या ह्या अठरा वर्षांच्या प्रवासात आम्हांला उमजलं आहे की स्वातंत्र्य, समता, बंधुता आणि सामाजिक न्याय ही मूल्यं म्हणजे केवळ शाब्दिक देवाणघेवाणीची व कागदी परीक्षांतून तपासण्याची वाव नाही. आपल्या एकूण जगण्याचा ताणावाणा मूल्यांनी गुंफला जातो. आपण ती प्राणपणानं सांभाळतो. आग्रहपूर्वक ती मूल्यं म्हणजेच आपलं 'असणं' असतं. म्हणूनच मूल्यशिक्षणाचा प्रयत्न करणाऱ्या प्रत्येक संस्थेत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना मानवी अस्तित्वातील सौंदर्य आणि विरूपता, आनंद आणि दुःख, शांतता आणि आक्रोश यांची ओळख व्हायला हवी. केवळ विविध विषयांच्या माहितीचे भारे मुलांच्या डोक्यांवर रचून जीवनाला मंगलता देणाऱ्या मूल्यांची ओळख होत नाही आणि त्या मंगलतेची ओढ लागून विद्यार्थी आपल्या जीवनप्रवासाची दिशा निवडतही नाहीत. 'झट मंगनी, पट व्याह' असं अनुभवाधारित मूल्यशिक्षण असूच शकत नाही. The formation of experience requires emotional time, which is a slow process odd with fast and instant culture - हे वाक्य या संदर्भात लक्षात घेण्यासारखं आहे. आजचं आपलं सर्वसाधारण औपचारिक शिक्षण लोकशाहीची मुळं मजबुत करण्यास मदतकारक ठरलेलं नाही. आपला परिसर, पर्यावरण, सामाजिक हित, वास्तव जीवन आणि सत्य याच्यापासून आजचं शिक्षण दूर रहायला शिकवितं. आपली भूमी, हवा, पाणी, सामाजिक विषमता यांच्यावद्दलची एक-प्रकारची वेफिकिरी आजच्या शिक्षणामुळं निर्माण होते. जोपर्यंत आपण असं मानणार नाही की भारतीय घटनेत अंतर्गत असणारी मूल्यं हाच आमचा अभ्यासक्रम, त्याला सुसंगत असं जे जे तीच आमची क्रमिक पुस्तकं. अभ्यासक्रमावर नोकरशाहीचा अंकुश असणं ही वसाहतवादी प्रथा आहे. स्वतंत्र भारतातील शिक्षणानं विचारपूर्वक वसाहतवादी रिवाज, प्रथा, परंपरा मोडून काढल्या पाहिजेत. कशाला 'हो' म्हणायचं, कशाला 'नाही' म्हणायचं हे शिक्षणातून विद्यार्थ्यांपर्यंत पोचलं पाहिजे. आज शिक्षणाचं हे कार्य जणू विस्मृतीत गाडलं गेलं आहे. शिक्षणात अंगभूत असलेल्या ह्या ताकदीचा पुनःप्रत्यय येण्यासाठी सृजनशील, आनंददायी व अर्थपूर्ण शिक्षणाचे नानाविध प्रयत्न समाजात वहरावेत असे प्रयत्न आपण सर्वांनी करायला हवेत. तसं झाल्यास -

There are those who have eyes
But refuse to see
Their inhumanity to man.
There are those who have ears
But refuse to hear the cries
of man in agony.
There are those who have mouths
But refuse to speak
Against injustice done to man.
And there are those who have hands
But refuse to reach them out
in love and brotherhood -

अशी स्थिती असणार नाही. अशा शिक्षणाच्या वाटेनं आपण सारेजण चालू या.

♦♦♦

## वरील ओळींचा मुक्त भावानुवाद

अनेकाना डोळे असतात
परंतु
'नरेचि केला किती हीन नर'
हे पाहावयाचेच ते नाकारतात.
अनेकाना कान असतात
परंतु
मनुजमात्राच्या वेदनेच्या किंकाळ्या
ऐकावयाचेच ते नाकारतात.
अनेकाना जिव्हाही असतात
परंतु
मानवावर झालेल्या अन्यायाच्या विरुद्ध
ब्र असा उद्‌गारही काढावयास त्या कचरतात.
आणि
अनेकाना हातही असतात
परंतु
दुरवस्थेत असलेल्यासाठी
आपल्या प्रेमाचा, वंधुभावनेचा आधार देण्यासाठी
ते पुढे येत नाहीत.

- देवदत्त दाभोलकर

# तळ्यात नव्हे मळ्यात

रमेश पानसे

माणसाचा माणसाशी असलेला व्यवहार नीतीपूर्ण असावा, असे एक समाजधारणेचे तत्त्व मानता येईल. किंबहुना, आजपर्यंतचा नीतीविचार याच अपेक्षेवर बेतला आहे, असे दिसून येईल. त्यामुळे नीतीविचाराला जर हे व्यावहारिक अंग नसेल तर नीतीविचारच फोल ठरतो. त्यामुळेच असे म्हणता येईल की नीतीविचार आणि नीतीव्यवहार हे परस्परांसाठीच जन्माला आले आहेत. व्यवहारामागे विचार नसेल तर व्यवहार नैतिक कसा होणार? तसेच विचार व्यवहारात उतरत नसेल तर तो नैतिक असून काय उपयोग? नैतिक विचार आणि नैतिक व्यवहार हे केवळ परस्परांसाठी नाहीत तर परस्परावलंबीही आहेत. नीतीचा विचार हा समाजधारणेसाठी उपयुक्त असेल तर तो समाजव्यवहाराच्या सातत्याने होणाऱ्या परिशीलनातून यावा लागतो; समाजाच्या बदलत्या गरजांचे भान ठेवून त्यांच्या संदर्भात नीतीव्यवहार कसा असावा, हे ठरवावे लागते. उदाहरणार्थ, अठराव्या शतकाच्या मध्यापासून इंग्लंडमध्ये औद्योगिक क्रांतीची धामधूम सुरू झाली, तेव्हा खूपच मोठे आर्थिक आणि सामाजिक अभिसरण झाले. या बदलत्या परिस्थितीत माणसा-माणसांचे परस्परांशी असलेले आर्थिक क्षेत्रातील संबंध बदलत गेले. आधीच्या सरंजाम-शाहीतील 'सरंजामदार–गुलाम' हे संबंध आता उगवत्या भांडवलशाहीत 'मालक-मजूर' असे झाले. अशावेळी या नव्या संबंधाच्या बाबतीत नैतिक व्यवहार निश्चित करण्याची गरज निर्माण झाली; आणि मग नवीन कायदेकानूंच्या आधारे त्यांची व्यवस्था करण्यात आली. नीतीविषयक सारा विचार हा, माणसांची माणसांशी असावी अशी आदर्श वागणूक कोणती, या प्रश्नाशी जोडलेला आहे. अशा वागणुकीचा जेव्हा विचार केला जातो तेव्हा तो भावीकालाच्या संदर्भातला विचार असतो; आणि म्हणून तो अमूर्त पातळीवरचा विचार असतो. विचारवंतांच्या याविषयीच्या विचारांमध्ये मतभिन्नता असू शकते; परंतु तरीही तो व्यवहारात उतरवण्याच्या हेतूनेच केलेला असतो हे ध्यानात घ्यायला हवे. त्यामुळे समाजधारणेसाठी विचारातून नैतिक व्यवहाराकडे आणि व्यवहारातून नैतिक विचाराकडे, अशा दोन्ही दिशांनी हा प्रवास अखंड चालू असतो. आजपर्यंतच्या नैतिक विचारांचे प्रामुख्याने दोन स्रोत आढळून येतात. एक, विविध धर्मांमधील नैतिकतेचा मूलभूत विचार (धार्मिक नीतिशास्त्र) आणि दोन, पाश्चात्य देशांमध्ये सॉक्रेटिस-प्लेटो-ॲरिस्टॉटल यांच्यापासून ते अलीकडच्या अठराव्या एकोणिसाव्या शतकातील विचार-वंतांनी प्रसृत केलेला विचार (ऐहिक नीतिशास्त्र). या दोन्ही दिशांनी विकसित झालेल्या नैतिक विचारांचा हेतू मात्र व्यावहारिकच होता. म्हणजे असे की, नीतीसंकल्पना मांडणे, त्यांचे धार्मिक अंगाने किंवा सारासार विचाराने समर्थन करणे की जेणेकरून समाजाला ते स्वीकारणीय वाटेल; आणि जर तात्त्विकदृष्ट्या स्वीकारली गेली तर; ती नीतीतत्त्वे समाज आपल्या व्यवहारात उतरवील; निदान तशी शक्यता तरी निर्माण होईल.

एक, समर्थनीय अशा नीती संकल्पना मांडणे; दोन, व्यक्ती-व्यक्तींनी आणि समाजाने त्यांचा मानसिक पातळीवर स्वीकार करणे; आणि, तीन, आपल्या वैयक्तिक नि सामाजिक वागणुकीत तो उतरवणे, अशा उपयोजित नीतीच्या तीन पायऱ्या कल्पिता येतील.

**समर्थनीय अशा नीतीसंकल्पनांची मांडणी**

जेव्हा व्यवहाराच्या अंगाने नैतिक संकल्पनांची मांडणी केली जाते तेव्हा आपण नीतीला धरून वागण्याची काही तत्त्वेच मांडत असतो. या तत्त्वांना आपण मूल्ये म्हणून संबोधतो. मूल्य म्हणजे, समाजधारणेसाठी व्यक्तीवागणुकीचे, कालानुरूप आणि समाज–गरजांनुरूप असे ठरविलेले संकेत असतात. आणि अशा संकेतांना अनुसरून वागणे हे समाजहिताचे असते, असे गृहित त्यामागे असते. किंबहुना या गृहिताच्या आशयानेच त्या मूल्यांचे समर्थन होत असते. हा

अनुक्रमणिका

आशय, समाजधारणेसाठी उपयुक्त आहे असे सिद्ध होत असेल तरच, अर्थात, तो समर्थनीय ठरतो. ही सिद्धता बऱ्याचदा समाजाच्या दीर्घकालीन अनुभवावरून ठरत असते; किंवा त्याविषयी मान्यवर तज्ज्ञांनी मांडलेल्या मतांवरून निश्चित होत असते.

### मूल्यांचा मानसिक पातळीवर स्वीकार

व्यक्तीने मानसिक पातळीवर स्वीकार केला असेल तर ती मूल्ये तिच्या वागणुकीत उतरणे शक्य असते नि सोपेही असते. संपूर्ण समाजाने आणि त्यातील प्रत्येक घटकाने, अशा तऱ्हेने, नीतीने वागण्याकडे वळावे यासाठी, जगातील विविध धर्मांनी नि त्यांच्या वेळोवेळीच्या पुढाऱ्यांनी, नीतीविचारांची सांगड धर्मविचारांशी घातली, आणि त्याचा अवलंब लोकांनी करावा यासाठी अनेक 'संस्था' निर्माण केल्या. देवळे, चर्चेस, बौद्धमठ, मशिदी, यांसारखी स्थाने आणि (आपल्याकडे) कीर्तने, प्रवचने, प्रार्थना अशांसारख्या पद्धती अस्तित्वात आणल्या. धर्माच्या केंद्रस्थानी असलेल्या 'देवा'च्या संकल्पनेचा वापर लोकांनी नीतीसंकल्पना मानसिक पातळीवर स्वीकाराव्यात यासाठी केला. चांगले वागले तर देव चांगले फल देतो, आणि वाईट वागले तर देव शिक्षा करतो, अशा कल्पनांचा पगडा लोकांच्या मनावर बसवण्याचा प्रयत्न हा त्याचाच एक भाग. काही कर्मकांडे करून देवाला आपल्या बाबतीत प्रसन्न ठेवायचा प्रयत्न करायला लावणे ही अशीच व्यूहरचना. लोकांच्यात आधी परमेश्वराबद्दल श्रद्धा निर्माण करायची आणि मग देवाच्या भीतीने माणसाला नैतिकतेने वागण्याची संथा द्यायची, या पद्धतीने धर्मांनी माणसांच्या मनात मूल्ये रुजविण्याचे कार्य केले; आजही करीत आहेत. मिशनरी शाळा, मदरसे नि हिंदुसंस्कार केंद्रे अशा प्रकारची धर्माधिष्ठित सांस्कृतिक-शैक्षणिक केंद्रे, बहुधा – नैतिकतेचे संस्कार करू पाहतात. प्रश्न असे उपस्थित करावेसे वाटतात की, अशी धर्मांच्या अंगाने नैतिक विचारांची अंघोळ घालून सर्वसामान्य समाजाने कितपत नैतिकता स्वीकारली? लोकांच्या प्रत्यक्ष वागणुकीत स्वच्छ नैतिकता या मार्गाने येते का? परमेश्वराच्या व धर्मांच्या भीतीने समाजमानसात नैतिकता उतरवण्याचा प्रयत्न यशस्वी होतो का?

मानवाच्या गेल्या निदान हजार वर्षांच्या इतिहासाचा दाखला तरी या प्रश्नांचे उत्तर होकारार्थी देत नाही. अलीकडे तर एक उलटीच प्रक्रिया या संदर्भात दिसून येते. कित्येक लोक धर्मांच्या नावानेच (धर्मविरोधी) अनैतिक वर्तन करताना आढळताहेत. मग ती समाजातील एका वर्गाने दुसऱ्या वर्गाची केलेली आर्थिक वा मानसिक पिळवणूक असो किंवा धर्मांच्या नावाने उभारलेली हत्याकांडे असोत. तसेच, अनेकदा, अनैतिक व्यवहारांत गुंतलेली माणसेच अधिक प्रमाणात धार्मिक कर्मकांडे करू लागली आहेत. कदाचित पापक्षालनार्थ त्यांना परमेश्वर प्रार्थनेची अधिक गरज वाटत असावी. अशा प्रकारच्या व्यवहारांवरून तरी देव-धर्म-धार्मिक संस्कार-धार्मिक शिक्षण यांच्या नावाने जो काही विचार नि व्यवहार समाजात प्रसृत होत आहे, त्यातून नीतीमान माणसे तयार होत आहेत किंवा माणसांची नीतिमत्ता वाढत आहे, असा निष्कर्ष काढणे कठीण आहे.

मग असे म्हणायचे का, की नैतिकता निर्मितीची क्षमताच मुळी धर्मव्यवहारांमध्ये नसावी; किंवा. पूर्वी कधी असलीच तर, ती आता मात्र क्षीण झाली आहे. मला वाटते, आपला विवेक जागृत ठेवून या दिशेने निदान तपासणी तरी हाती घेतली पाहिजे. या तपासणीचे निष्कर्ष समाज धारणेच्याविषयी नवविचाराला आपल्याला उद्युक्त करतील, उपयोगी ठरतील असे वाटते.

माझे वैयक्तिक मत मात्र असे आहे की, धार्मिक संस्कार, धार्मिक शिक्षण आणि धार्मिक कर्मकांडे माणसाला नैतिक विचारांची नि नैतिक वर्तनाची शिदोरी देत नाहीत. तरीही हे मान्य केले पाहिजे की, समाजधारणेसाठी मानवी व्यवहारांना नैतिकतेचा पाया आवश्यक आहे. परंतु ज्यातून नैतिक वर्तनाची निश्चितता होण्याच्या दिशेने प्रवास करता येईल अशी, पण धार्मिक शिक्षणाला पर्याय पुरवणारी, गोष्ट आपणास अजून पुरेशी आत्मसात करता येत नाही; अशा एक संभ्रमावस्थेच्या संधिकालातून आपण आज जात आहोत.

या संधिकालातून बाहेर पडण्याचा मार्ग मात्र दृष्टिपथात येत आहे असे वाटते.

आपण ऐहिक नीतिशास्त्राच्या मार्गानेच आणखी थोडी पुढची वाटचाल करावी. मनुष्य वैयक्तिक नि सामाजिक कल्याणासाठी बुद्धिनिष्ठतेने विचार करू शकतो. (बुद्धिनिष्ठता हे मानवाचे एक व्यवच्छेदक लक्षण आहे.)

हे एक, आणि निसर्गतःच, जन्मापासून माणसामध्ये स्वार्थाबरोबरच सामाजिकताही वास करून

अनुक्रमणिका






असते, हे दुसरे अशी ही दोन गृहिते आपलीशी करावीत. तसेच शिक्षण व शिक्षणाकरवी होऊ शकणारे संस्कार यांच्यावर भिस्त ठेवावी. एकदा हे करायचे ठरविले की तात्त्विक स्तरावर आपल्याला दोन प्रश्नांची छाननी करावी लागेल. एक, शिक्षणातून नैतिक विचार देता येतो का? आणि दोन, अशाप्रकारे (शिक्षणातून) दिलेल्या नैतिक विचारांतून नैतिक व्यवहार निर्माण होतो का? या दोन्ही प्रश्नांची उत्तरे शोधण्यासाठी आपल्याला मूलभूत आणि मानसपातळीवर होणाऱ्या शिक्षणप्रक्रियेकडे वळायला हवे. एवढेच नव्हे तर, ज्याला आपण आज स्थूलमानाने 'शिक्षण' असे म्हणत आहोत त्याच्याकडून, कशाला नेमके 'शिक्षण' म्हणायचे, या दिशेने पुढे सरकावे लागेल.

'शिक्षण' म्हणताना, आजचे शालेय शिक्षण आपण डोळ्यांपुढे आणू. आजचे म्हणजे गेले शतकभर एका विशिष्ट पद्धतीने चाललेले शिक्षण. या 'विशिष्ट पद्धती' मागे मानसशास्त्र आहे. हे शिक्षणविषयक मानसशास्त्र प्रामुख्याने शतकभरापूर्वी प्राण्यांवर केलेल्या प्रयोगांवर अवलंबून आहे. पावलोव, थॉर्नडाईक, कोहेल, स्किनर वगैरे मानसशास्त्रज्ञांनी केलेल्या प्रयोगांच्या एकत्रित निष्कर्षांतून शिक्षणासाठी लागणारी तात्त्विक मांडणी करून दिली आहे; एवढेच नव्हे तर, 'शिक्षणा' ची व्याख्याही ठरवून दिली आहे. या आणि यांच्या पठडीतील मानसशास्त्रज्ञांनी शास्त्रीय शिक्षणाची जी मांडणी केली त्या मांडणीमागच्या दृष्टिकोनास 'वर्तनवादी दृष्टिकोन' असे म्हटले जाते. हा दृष्टिकोन व्यवहारात आणला गेला त्यावेळी माणसाच्या मनःप्रवृत्तींचा अंदाज घेण्यासाठी माणसाच्या मनांत उतरणे शक्य नव्हते; किंवा माणसाच्या मेंदूत कोणत्या रासायनिक नि जैविक क्रिया घडतात त्याही समजणे शक्य नव्हते. साहजिकच, माणसाचे मन समजावून घेण्याचा ठळकपणे एकच मार्ग उपलब्ध होता; आणि तो म्हणजे माणसाचे दृश्य असे बाह्य वर्तन आधाराला घेणे आणि त्यांकरवी माणसाच्या मनातील व्यापारांचा अंदाज घेणे. अर्थातच, माणसाच्या वर्तनाच्या अवलोकनाला अनिवार्य महत्त्व आले. त्याच काळात, शास्त्रीय बालशिक्षणाची मांडणी करताना, मादाम मॉंटेसोरींनी बालकाच्या मनोव्यापारांपर्यंत पोचण्याचा खात्रीचा मार्ग म्हणून, बालकाच्या नैसर्गिक वर्तनाचे बारकाईने अवलोकन करण्याचाच मार्ग सांगितलेला आहे.

एकदा अशा तार्किकतेने वर्तनवादी दृष्टिकोन स्वीकारला की मग शिक्षणाकडे पाहण्याची एक शास्त्रीय दृष्टी निर्माण होते. उदाहरणार्थ, उपर्युक्त प्राण्यांवरच्या संशोधनांतून निघालेले निष्कर्ष असे होत : एक, एखाद्या बाह्य चेतकाने वर्तनात बदल घडवून आणता येतो. दोन, पुन्हा पुन्हा तेच तेच करायला लावल्याने, बदल घडवून आणलेल्या वर्तनाचे दृढीकरण करता येते; ते वर्तन कायमस्वरूपी राहण्याची तजवीज करता येते. तीन, काहीतरी प्रलोभन दाखवून (बक्षीसे देऊन) बदल स्वीकारण्याची मानसिकता निर्माण करता येते; आणि, चार, अन्यथा शिक्षेची भीती घालून (शिक्षा करून) सक्तीने बदल स्वीकारायला लावण्याची शक्यता अस्तित्वात असते. या सर्व निष्कर्षांच्या आधारे शिक्षणपद्धती ठरवत असताना, 'शिक्षणा'ची व्याख्याही वर्तनवादी दृष्टिकोनाने दिली आहे. 'वर्तनात अपेक्षित बदल घडवून आणणे' अशी ही शिक्षणाची व्याख्या आहे. प्रचलित शिक्षण हे या व्याख्येवर, व्याख्येमागच्या, संशोधनांतून निघालेल्या निष्कर्षांच्या गृहितांवर आणि त्यांवर आधारित अशा अभ्यासक्रमांवर (शाळांतील शिकविण्यासाठीचे अभ्यासक्रम, शाळांतून शिकविणाऱ्या शिक्षकांना द्यावयाच्या प्रशिक्षणाचे अभ्यासक्रम इ.) बेतलेले आहे. परिणामतः, शिक्षणात, शिक्षकाला मध्यवर्ती स्थान प्राप्त झाले; त्याला अपेक्षित (अभ्यासक्रमांनी दिग्दर्शित) असा विद्यार्थ्यांच्या वर्तनात बदल घडवून आणायचा आहे, नि याची जबाबदारी सर्वस्वी त्याची म्हणजे शिक्षकाची आहे. मुलांनी अभ्यास करावा म्हणून प्रोत्साहनांची म्हणजे बक्षिसांची तजवीज करायची आहे नि न ऐकणाऱ्या विद्यार्थ्यांना शिक्षा करून ताळ्यावर आणायचे आहे. तसेच, मुलांना घोकंपट्टी करायला लावून आणि गृहपाठ अधिकाधिक करायला लावून विद्यार्थी जे शिकताहेत त्याचे दृढीकरण करावे, अशी भूमिका घेऊन, प्रचलित पठडीबद्ध शिक्षणपद्धती आज उभी आहे.

प्रचलित शिक्षणपद्धतीच्या काही मर्यादा लक्षात घ्यायला हव्यात.

१. या शिक्षणपद्धतीला आधारभूत असलेले मानसशास्त्र हे सर्वसामान्य असे शिक्षणविषयक मानसशास्त्र आहे. बालकांचे मानसशास्त्र हे काही वेगळे असू शकते, अशी भूमिका येथे नाही.

२. या शिक्षणपद्धतीला आधारभूत असलेला जो वर्तनवादी दृष्टिकोन आहे तो, प्राण्यांवरील संशोधनांतून

निर्माण झालेल्या निष्कर्षांवर आधारलेला आहे; माणसांवर अशा प्रकारे संशोधन करून निष्कर्ष काढण्याचा काळ अजून दूर होता.

३. या शिक्षणपद्धतीला आधारभूत असलेले शिक्षणशास्त्र (नि त्यामागील मानसशास्त्र) हे विद्यार्थ्यांच्या बाह्य वर्तनाशी संबंधित आहे. या वर्तनाशी संबंधित अशा, विद्यार्थ्यांच्या मेंदूमध्ये घडणाऱ्या (जैविक नि रासायनिक) बौद्धिक प्रक्रियांशी ते जोडलेले नाही; तशी शक्यता त्या काळात नव्हती.

या तीनही मर्यादा पार करून शिक्षणशास्त्राची नव्यांने मांडणी करण्याची शक्यता आता निर्माण झाली आहे. अलीकडे, बालमानसशास्त्र अशी बालकांचा स्वतंत्रपणे अभ्यास करणारी (नि त्याआधारे शिक्षणासाठी काही दिशा सांगणारी) अशी मानसशास्त्राची उपशाखा निर्माण झाली आहे. दुसरे असे की, आता प्रत्यक्षपणे माणसाच्या मेंदूविषयीचे अभ्यास मज्जाशास्त्रामध्ये होत आहेत. तिसरी गोष्ट अशी की, अलीकडे झालेल्या तंत्रज्ञानामधील प्रगतीमुळे, माणसाच्या मेंदूमधील प्रत्यक्षपणे घडत असलेल्या प्रक्रियांचे फोटो काढण्याचे तंत्र (फोटो इमेजिंगचे तंत्र) विकसित झाले आहे. त्यामुळे बालकांच्या मेंदूविषयीची आणि निसर्गतः मूल कसकसे शिकत जाते याविषयीची खूपच शास्त्रशुद्ध माहिती उपलब्ध झाली आहे. एवढेच नव्हे तर अशा माहितीचा वापर करून, शिक्षणाच्या क्षेत्रात संशोधने नि प्रयोग केले जात आहेत. जगभरच आता, प्रचलित शिक्षणपद्धतीचे दोष जसे ठळकपणे प्रत्ययाला येत आहेत, तद्वतच, नवी पर्यायी शिक्षणपद्धती कशी असावी याची मांडणीही केली जात आहे.

लक्षात आले आहे ते असे की, मूल जन्मल्या-पासूनच आपले आपणच आपल्या शिक्षणाची बांधणी करीत असते; ही बांधणी ते आपल्या अनुभवांकरवी करीत असते. अशाप्रकारे स्वंयशिक्षणाच्या उदंड क्षमता बालकामध्ये असतात, आणि वयाच्या आठ-दहा वर्षापर्यंत मुले अतिशय वेगाने शिकत असतात. त्यामुळे या कालातील शिक्षणाचे स्वरूप बालकाला 'शिकविण्या'चे नसते, तर त्याला 'शिकण्या'साठी सहाय्य करण्याचे असते. शिक्षकाने सर्वांना सार्वजनिकरित्या शिकवायचे नसते तर प्रत्येक विद्यार्थ्याला, म्हणजे त्याच्या ज्ञानरचनेच्या प्रक्रियेला, व्यक्तिगत पातळीवर सहाय्यभूत व्हायचे असते. शिक्षणविषयक अलीकडे विकसित होत गेलेल्या नि जगभर सार्वत्रिकरित्या स्वीकारल्या जात असलेल्या या शिक्षणविषयक दृष्टिकोनाला 'रचनावादी दृष्टिकोन' असे म्हटले जाते. आणि शिक्षणातील परिवर्तनाचा प्रवास आता, अशाप्रकारे, वर्तनवादाकडून रचनावादाकडे असा होत आहे. आपण जेव्हा समाजाने ठरविलेल्या नीती-संकल्पनांना व्यवहारात उतरवण्याची भाषा करतो तेव्हा, तत्त्व आणि व्यवहार यांमध्ये एक पायरी घेतो. ही नीतीमूल्यांचा व्यक्तीव्यक्तींनी मानसिक पातळीवर स्वीकार करण्याची पायरी आहे. या पायरीचा शिक्षणाशी घनिष्ट संबंध आहे.

आताच्या विवेचनावरून हे लक्षात येईल की, आपण जेव्हा शालेय शिक्षणात (अथवा एकूण शिक्षणात) नैतिकतेने वागण्याची काही मूल्ये विद्यार्थ्यांमध्ये रुजवण्याचा विचार मांडतो, तेव्हा तो प्रचलित शिक्षणाच्या धाटणीमध्ये बसविण्याचा प्रयत्न फोल ठरतो. हा आपला अनुभव तर आहेच पण आता कारणही कळते आहे. अपेक्षित मूल्यसंवर्धन ही शाळांतून बक्षिसांच्या प्रलोभनाने अथवा शिक्षांच्या भीतीने घडवून आणण्याची गोष्ट नाही. मूल्ये ही घोकून पाठ करण्याची बाब नाही किंवा गृहपाठांनी मूल्यांचे दृढीकरणही करता येणार नाही. थोडक्यात असे की, प्रचलित शिक्षणपद्धतीत नीटपणे होणारी किंवा होऊ शकणारी ती गोष्ट नाही.

शिक्षणक्षेत्रात व्यावहारिक नीतीचा विचार करायचा असेल तर तो शिक्षणपद्धतीत परिवर्तनाशी जोडला पाहिजे. वर्तनवादी शिक्षणपद्धतीच्या जागी रचनावादी शिक्षणपद्धतीची प्रतिष्ठापना करूनच पुढे या दिशेने जाता येईल का, हे पाहिले पाहिजे. असे शिक्षणाच्या पद्धतींमध्ये आणि त्यामागील दृष्टिकोनामध्ये परिवर्तन घडणे म्हणजे शिक्षणात परिवर्तन करणे होय.

नीतीमूल्ये मानसिक पातळीवर स्वीकारली जावीत असे वाटत असेल तर, एक, कोणती मूल्ये द्यावीत, दोन, ती केव्हा द्यावीत आणि, तीन, ती कशी द्यावीत यांचा विचार प्रस्तुत ठरतो. मूल्यशिक्षणाचा अवलंब केव्हा करावा आणि कसा करावा याविषयी थोडेसे विवेचन करून मग ती मूल्ये आजच्या वास्तव परिस्थितीच्या नि उद्याच्या समाजगरजांच्या संदर्भात कोणती असावीत याचा विचार करता येईल.

नीतीमूल्ये माणसाच्या मानसात उतरवण्यासाठी केव्हा आणि कसे प्रयत्न करावेत यांची दिशा मिळण्यासाठी

आपण, पुन्हा एकदा, मज्जामानसशास्त्रातील संशोधनाच्या निष्कर्षांकडे वळले पाहिजे. आपल्याला पडणाऱ्या या आणि एकूणच शिक्षणविषयक प्रश्नांची वरीचशी उत्तरे, शिक्षण-शास्त्राला आधारभूत असलेल्या या शास्त्रामध्ये दडलेली आहेत. या शास्त्रातील अलीकडच्या संशोधनांचे, आपल्या विषयाच्या संदर्भातील काही तुकडे पाहू.

१. माणसाच्या सर्व क्रियांचे नियंत्रण करणाऱ्या मेंदूचे कार्य त्यामधील कोट्यावधी पेशींच्या परस्पर वांधणीमुळे होत असते. आणि ही पेशींची जुळवाजुळव वालकाच्या जन्मापूर्वी पूर्ण होत नाही, तर ती अगदी वयाच्या आठव्या वर्षापर्यंत चालू असते. या पेशीवांधणीच्या नाजूक वयात वालक विविधांगांनी आजूवाजूच्या परिसरातील ज्ञान आत्मसात करीत असते. ही ज्ञानप्राप्तीची प्रक्रिया आणि मेंदूतील पेशीवांधणीचे कार्य यांचा अन्योन्य संबंध असतो. म्हणजे असे की, या पेशींच्या वांधणीचे कार्य जितके पक्के होईल तितके ज्ञानग्रहणाचे कार्य सुकर आणि प्रभावी होईल; तसेच पेशीच्या वांधणीचे कार्य भक्कम होण्यासाठी, वालकाचा वाह्य जगाशी अधिकाधिक संपर्क येणे, अनुभवांनी संपन्न होत जाणे आणि ज्ञानग्रहणाच्या वाढत्या संधी मिळणे, या गोष्टी आवश्यक असतात.

२. मज्जाशास्त्रीय व मानसशास्त्रीय संशोधनांतून आता असे लक्षात आले आहे की, आजवरची आपली जी समजूत होती तशी वुद्धिमत्ता ही एक, आनुवंशिक, अपरिवर्तनीय अशी गोष्ट नाही. तर, वुद्धिमत्ता अनेक असतात, आणि प्रत्येक मनुष्याला उपजतच या वुद्धिमत्तांचा पट प्राप्त झालेला असतो. प्रत्येकाचा पट वेगळा असतो. याचा अर्थ असा की कुणाला गणिती तार्किक वुद्धिमत्ता तीव्रतेने प्राप्त झालेली असेल तर कुणाला सांगीतिक. कुणाला भाषिक तर कुणाला शरीर-स्नायूविषयक, कुणाला व्यक्तीअंतर्गत तर कुणाला आंतरव्यक्ती, कुणाला निसर्गविषयक तर कुणाला अवकाशविषयक. अशा विविध वुद्धिमत्ता, कमी-अधिक तीव्रतेने, प्रत्येकाला प्राप्त होतात. त्यामुळे, जेवढ्या प्रकारच्या वुद्धिमत्ता आहेत तेवढे जग आकलून घेण्याचे दृष्टिकोन आहेत. त्यामुळे शालेय वर्गात कुणीच 'ढ' नसतो; प्रत्येकाला साजेसे शिक्षणाचे विविध मार्ग असू शकतात, आणि तसे मिळाले तर, प्रत्येक जणच वुद्धिमान आहे, हुशार आहे.

३. वालकाच्या ज्ञानग्रहणाच्या प्रक्रियेच्या संदर्भात असे काही कालावधी प्रत्ययाला येतात की त्या विशिष्ट कालावधीत, विशिष्ट वावींच्या ज्ञानाची रचना वेगाने नि प्रभावीपणे होते. साहजिकच हे विशिष्ट कालावधी (त्यांना तांत्रिक भाषेत 'संधीची गवाक्षे' असे म्हणतात) हेरून त्यानुसार त्या विशिष्ट क्षमता विकसित करण्याचे प्रत्ययकारी अनुभव वालकाला मिळू द्यायचे असतात; आणि त्यासाठी आवश्यक अशा संधी पुरवायच्या असतात. वालकांच्या मनात नीतीमूल्ये केव्हा नि कशी रुजवता येतील याचे काही आडाखे या तीन संशोधन तुकड्यांच्या आधारे सुद्धा वांधता येतील. (अर्थात, केवळ एवढेच संशोधनसार आपल्या उपयोगी आहे असा गैरसमज आपण होऊ देता कामा नये. उलट, जे कोणी तात्त्विक शिक्षण, मूल्यशिक्षण या दिशेने प्रत्यक्षात काही कार्य करू इच्छितात त्यांनी, 'मूल कसे असते', 'मूल कसे शिकते?' आणि 'मूल केव्हा नि कुठे, का अडते' या विषयीच्या मज्जामानसशास्त्रीय अभ्यासात शिरून यांविषयीचे पक्के आकलन करून घ्यावे लागेल. तसेच या क्षेत्रांतील संशोधन सातत्याने नि वेगाने होत असल्यामुळे त्यांच्यातून येणाऱ्या ज्ञानप्रवाहाशी जुळवून घेत घेत पुढे सरकत जायला हवे!)

थोडक्यात असे की, वयाच्या आठव्या वर्षापर्यंत प्रामुख्याने नि पुढेही वारा-चौदा वयापर्यंत मुलाच्या नैसर्गिक ज्ञानग्रहणप्रक्रियेशी जोडून मुलाला, मुलीला नीतीमूल्यांना अभिमुख करता येईल. मात्र आजच्या प्रमाणे शालेय पातळीवरील मूल्यशिक्षणाचे तास ठेवून आणि त्यासाठी शिक्षकांनी इथूनतिथून श्लोक वगैरे गोळा करून मूल्यशिक्षण होणार नाही. तर मुलांच्या ज्ञानग्रहणप्रक्रियेशी, त्यासंदर्भातील संधीच्या गवाक्षांनी, संलग्न करून व प्रत्येक वालकाच्या विशिष्ट वुद्धिमत्तांचा वापर करून, त्यांच्या सहज स्वशिक्षण प्रक्रियेला साजेशा पद्धतींनी नीतीचे नि नागरिकत्वाचे शिक्षण त्यांच्याप्रत पोचवावे लागेल. मूल ज्या पद्धतीने नि ज्या सहजतेने भाषा शिकते त्या पद्धतीने नि त्या सहजतेने त्याला नीतीमूल्ये आत्मसात करता आली पाहिजेत. ती त्यांच्या श्वासोच्छ्वासाच्या सहजतेने त्यांच्याकडून स्वीकारली गेली पाहिजेत.

मुले जेव्हा अनुभवांतून शिकतात, कृतिशील अनुभवांद्वारे शिकतात तेव्हा ते शिकणे हे सहज शिकणे असते. त्यामुळे, साहजिकच, मुलांना नीतीमूल्यांचे शिक्षण द्यायचेच असेल तर ते अशा उपक्रमांत रूपांतरित करायला








हवे, की जे उपक्रम मुलांना पायरी पायरीने अनुभवांद्वारे मूल्यग्रहण करायला उद्युक्त करतील. आणि नेमके हेच काम मोठ्या तज्ज्ञतेचे नि कौशल्याचे काम आहे. ज्यांनी मूल समजावून घेतले आहे ते अशाप्रकारच्या कामाची तज्ज्ञता नि कौशल्ये प्राप्त करून घेऊ शकतात.

एखाद्या समाजात, तात्त्विक पातळीवरून मूल्यांची निश्चिती करणे वेगळे, आणि योग्य वयात योग्य तऱ्हेने, म्हणजे सहजतेने, ती मूल्ये आत्मसात केली जातील अशी परिस्थिती निर्माण करणे वेगळे. मुले भाषा जशी वातावरणातून आत्मसात करतात तशीच नीतीमूल्ये देखील वातावरणातूनच आत्मसात केली जातात. भाषा जशी वापर करूनच शिकली जाते तद्वतच मूल्येदेखील, मुले, त्यांच्या दैनंदिन वापरातील सरावानेच शिकतात. आणि भाषा यावी म्हणून मुलांना भाषा शिकवावी लागत नाही, त्याचप्रमाणे नीतीमूल्ये सुद्धा शिकवावी लागत नाहीत. ती शिकली जातात, आणि शिकता शिकता मेंदूपटलावर कायमची कोरली जातात. भाषा ही गोष्ट जेवढी सामाजिक आहे तेवढीच नीतीमूल्येही सामाजिक आहेत, आणि म्हणूनच समाजव्यवहारात उतरूनच भाषा नि मूल्ये दोन्हीही आत्मसात केली जातात. आणखी एक असे की, भाषा जेवढी जीवनव्यवहारासाठी आवश्यक आहे तेवढीच नीतीमूल्येही जीवनव्यवहारासाठी नि समाजधारणेसाठी आवश्यक आहेत. भाषेप्रमाणेच तीही व्यक्तिगत पातळीवरील पण पूर्णतः समाजसंपर्कातूनच निर्माण होणारी गोष्ट आहे. मूल ज्याप्रमाणे ज्या भाषेच्या (किंवा भाषांच्या) नैसर्गिक वातावरणात असते, ती (किंवा त्या) भाषा ते आत्मसात करते, त्याचप्रमाणे ज्या सांस्कृतिक वातावरणात बालपण व्यतीत होते त्या संस्कृतीतील मूल्ये सहजपणे आत्मसात होतात. त्यामुळे बालकाच्या अवतीभोवती – म्हणजे घरात, घरावाहेरील छोट्याशा परिसरात आणि शाळेत – ज्या तऱ्हेचे सांस्कृतिक वातावरण असेल त्यावर नीतीमूल्ये संपादनाची प्रक्रिया अवलंवून असते. त्यामुळे त्या विशिष्ट सांस्कृतिक वातावरणाला साजेसे असेच उपक्रम योजणे हे मूल्यग्रहणाच्या सहजप्रक्रियेसाठी आवश्यक असते.

**एकविसाव्या शतकासाठी लागणारी मूल्ये**

धर्मांच्या तळ्यात वुडी मारून मूल्यसंवर्धन होत नाही; तर विचाराच्या मळ्यात विवेकाची वाग फुलवूनच ते होते; ही भूमिका निश्चित केली की मग, मूल्यांचा विषय विचारांच्या स्तरावर आणता येतो. विचारांतून वेळोवेळी मूल्यनिश्चिती होत गेली की त्यांना, समाजाच्या मानस-पातळीवर आणि मग पुढे व्यवहारात आणण्याचा मार्ग ठरवता येतो.

नीतिमूल्यांविषयीची काहीशी स्पष्ट संकल्पना आपण आता मांडू शकतो. नीतीचा विचार हा, एकाच वेळी, व्यक्तिगत आणि सार्वजनिकही आहे. नीतीचे वागणे ही सामाजिक स्वास्थासाठी आवश्यक अशी गोष्ट आहे. पण मूल्ये म्हणून ती आत्मसात करायची असतात ती मात्र व्यक्तीने. त्यामुळेच असे पुनश्च म्हणता येईल की, समाजधारणेसाठी आवश्यक असणारी अशी ती वैयक्तिक गोष्ट आहे. दुसरे असे की, लहान वयात मूल्ये रुजवण्याचा आपण विचार मांडतो तेव्हा त्यांचा संवंध भावीकालाशी वांधला जातो. आज आपल्यासमोर जी पाच-सात किंवा दहा-वारा वर्षांची मुले असतात, त्यांच्या साऱ्या जीवनाचा, म्हणजे पुढील पन्नास-पाऊणशे-शंभर वर्षांचा, कालावधी आपल्या डोळ्यासमोर आणावा लागतो. म्हणजेच नीतीमूल्ये ही भावीकालाभिमुख अशी गोष्ट ठरते. तिसरे असे की, आजच्या म्हणजे वर्तमानपरिस्थितीच्या आधारावर भावीकाळाविषयीचे आडाखे वांधून, आपल्याला कोणत्या मूल्यांची गरज समाजाला असेल हे ठरवावे लागते. व्यवहारामागचा हा सारा तात्त्विक विचार बुद्धिनिष्ठेतेने केल्याशिवाय आपण नीतीची भाषा करूच शकत नाही.

◆◆◆

आपल्या मुलांना आपले प्रेम द्या; परंतु आपले विचार देऊ नका.

– खलील जिब्रान






# धर्म आणि शिक्षण : काही समस्या

देवदत्त दाभोलकर

इतर कोणत्याही प्राण्याच्या ठिकाणी असते त्याहून कितीतरी अधिक प्रमाणात मानवात कुतूहल, चौकस वृत्ती, जिज्ञासा जागृत असते. तसेच, इतर कोणत्याही प्राण्याला लाभली नाही इतकी हे कुतूहल शमविण्यासाठी आवश्यक असलेली तीव्र बुद्धीही निसर्गाने मानवाला प्रदान केलेली आहे. या बुद्धीला कर्मेंद्रियांच्या, ज्ञानेंद्रियांच्या, मनाच्या कुवतीच्या मर्यादा आहेत ही गोष्टही खरी आहे. व्यक्तीव्यक्तीत तर या मर्यादा कमी अधिक प्रमाणात असतातच, परंतु एकंदर मानव प्राण्याच्या बाबतीतही या संदर्भात जवळजवळ अलंघ्य अशी मर्यादा आहे. इतर जीवसृष्टीतील काही प्राण्यांच्या काही बाबतीतील या क्षमता मानवापेक्षाही अधिक प्रमाणात आहेत हेही निसर्गानेच निर्माण केलेले एक आश्चर्य आहे. परंतु या सर्व मर्यादांचा विचार केल्यानंतरही मानवाच्या बुद्धीची क्षमता इतर प्राणिमात्रांच्या तुलनेत अतिप्रचंड आहे यात शंका नाही. या बुद्धीचा उपयोग आपल्यासमोर वेळोवेळी आलेले भौतिक प्रश्न सोडविण्यासाठी मानवाने केला तर कित्येकदा केवळ कुतूहल म्हणूनही त्याने अनेक प्रश्नांची उत्तरे शोधून काढण्याचा प्रयत्न केला. असा, व्यावहारिक दृष्ट्या नजीकच्या भविष्यकाळात निरुपयोगी असा वाटणारा शोधही कालांतराने फार महत्त्वाचा आणि व्यावहारिक उपयोगाचा ठरू शकतो हेही आता त्याच्या पक्के अनुभवास आले आहे.

सूर्य उगवत होता, मावळत होता; चंद्र लहान मोठा होत होता, मधेच एक दिवस नाहीसा होत होता, मधूनच सूर्य दिवसा काळोखत होता, कधी कधी चंद्र अचानक काळवंडत होता, तारे स्थिरपणे पूर्वेकडे उगवत होते, पश्चिमेकडे मावळत होते. ग्रहमान आपल्या काही गतीने फिरत होते. त्यातील काही अचानक वक्र उलट्या गतीने जात होते. साधा सूर्य देखील दरदिवशी त्याच एका क्षितिजावरील बिंदूपासून उगवत होता असे नाही. कधी तो उत्तरेकडे सरके तर नंतर दक्षिणेकडे. दिशांची नावे देखील अजून निर्माण व्हावयाची होती. उगवती आणि मावळती हीच कदाचित् दिशांची पहिली नावे असावीत.

रात्रीच्या अंधारात आकाश निरखण्याखेरीज अन्य व्यवधान नव्हते. अनेकांनी रात्रीचे हे रत्नखचित भांडार आनंदाने पाहिले असेल. परंतु त्यापैकी तीव्र बुद्धीच्या काही लोकांनी या प्रश्नांचा शोध स्वाभाविक जिज्ञासेने घेण्याचा प्रयत्न केलाच असणार. मानवाच्या इतिहासात तीव्र बुद्धीचे लोक सर्व शतकात सारख्याच प्रमाणात निर्माण झालेले असले पाहिजेत. आइन्स्टाइन आपल्या आत्मचरित्रात न्यूटनला उद्देशून लिहितो, 'न्यूटन, तू मला क्षमा कर, तुझ्या बुद्धीचा आवाका प्रचंड होता. परंतु ज्या कालखंडात तू जन्माला आलास त्यावेळेचा ज्ञानाचा पूर्वसंचय अपुरा होता.' ॲरिस्टॉटल व इतर द्रष्टे संशोधक ऋषी यांनीही त्यापूर्वीच्या कालखंडातील नामशेषही न राहिलेल्या आपल्या समकुवतीच्या पूर्वसूरींना उद्देशून नम्रपणे असेच उद्‌गार काढले असते.

आज या ठिकाणी हे सर्व सुचावयाचे कारण असे की, या सर्व विश्वाच्या मागे कोणती रचना आहे, ती कोणी तयार केलेली आहे, की केवळ अपघाताने आपोआप घडून आली आहे; कोणी ईश्वराने ती निर्माण केली असेल तर त्याला निर्माण करणारा परमेश्वर कोण; आणि हा प्रश्न परत परत कितीही विचारत गेलो व उत्तरांच्या कितीही शिड्या चढल्या तरी पुन्हा त्या पायरीवर देखील तो प्रश्न राहतोच. मानवाचे न शमलेले कुतूहल तळमळत राहते.

आजही विज्ञान या प्रश्नाशी झगडत आहेच. Astrophysics (अंतरिक्ष पदार्थशास्त्र) अब्जावधीचे अब्जावधी रुपये खर्च करून आणि जगातील तीव्रतम बुद्धीच्या शास्त्रज्ञांचा उपयोग करून अशा प्रश्नांची उत्तरे शोधण्याचा प्रयत्न करीत आहे. अंतरिक्षाच्या अंताशी काय आहे व परमाणूच्या आत काय आहे या दोन्ही टोकांच्या प्रश्नांची उत्तरे शोधण्याचा विज्ञानाचा आजचा आटापिटा जितका रोमहर्षक तितकाच मनोवेधकही आहे. ही दोन्ही कोडी तुला पूर्णपणे कधी उलगडणार नाहीत अशाच पद्धतीने घडविलेली (किंवा घडलेली) आहेत असेच निसर्ग जणू उपहासाने मानवाला सांगत आहे. आज अस्तित्वात असणारे विश्व सुमारे दोन हजार कोटी वर्षापूर्वी अस्तित्वात आले आहे असे विज्ञान मानते. आजच्या विविध प्रकारच्या दुर्बिणीतून १५०० कोटी प्रकाशवर्षे दूर असलेल्या ताऱ्यांचा मागोवा आपण घेऊ

अनुक्रमणिका

शकतो. आणखी काही काळाने कदाचित् विश्वनिर्मितीचा पहिला स्फोटही (Big Bang) आपण पाहू. त्याआधी काय होते? काहीही नव्हते. कालही नव्हता, स्थलही नव्हते? अचानक एकच स्फोट झाला, त्या स्फोटाच्या पहिल्या परार्धांशात आजच्या विश्वात असलेली सर्व ऊर्जा निर्माण झाली. हे तर चक्रावून टाकणारे आहेच; परंतु कदाचित् याचेही आकलन झाले तरी या विश्वाच्याही आधी अशी किती अनंत विश्वे निर्माण झाली असतील व लयाला गेली असतील, हे कोण कसे सांगणार?

सूक्ष्म विश्व तर याहूनही चक्रावून टाकणारे आहे. अणू हा जडद्रव्याचा शेवटचा अविभाज्य घटक आहे असे आपण दीर्घकाळ मानत आलो. नंतर प्रोटॉन, न्यूट्रॉन, न्यूक्लिअस या भानगडी आल्या. अणूच्या अंतरंगात यांच्या प्रकाशाच्या वेगाने फेऱ्या सुरू झाल्या. हे एकेक सूर्यमालेसारखे विश्वच. परंतु एवढ्यावरच थांबले नाही. उप-उप परमाणूंचे अस्तित्व लक्षात आले, त्यांची तर अजून पूर्ण गणतीच व्हावयाची आहे. त्यापैकी काही अस्तित्वात आहेत हे तात्विक दृष्ट्या सिद्ध झाले आहे. परंतु आज उपलब्ध असणाऱ्या उपकरणांनी ते अजून तसे सापडावयाचे आहेत. बरे, त्यानंतर काय? विश्वात जे जे जडद्रव्य आहे ते ते ऊर्जेचाच आविष्कार आहे. आज जमिनीखाली पंचवीस तीस मैल लांबीची यंत्रे उभारून उप-उप परमाणूंचे संशोधन चालू आहे. परंतु त्यांचा खरा पूर्ण अभ्यास करावयाचा असेल तर एकूण विश्वाच्याच आकाराचे यंत्र लागेल अशी शास्त्रज्ञांची तत्त्वसिद्धांतातून आलेली अपेक्षा आहे. अर्थात् तंत्रज्ञानाचा विकास होईल तसा आपण यातून काही वेगळा मार्गही काढू शकू अशीही शास्त्रज्ञ आशा बाळगून आहेत.

नील्स बोहर (Niels Bohr) या अग्रेसर शास्त्रज्ञाला त्याचा एक विद्यार्थी म्हणाला, 'सर, हे सारे डोक्याला चक्कर आणते, मी हा विषयच सोडून देणार.' बोहर म्हणाला, 'अरे , हे ऐकून ज्याला चक्कर येणार नाही, त्याला या विषयातले काहीच समजले नाही असे समजावयास हरकत नाही.'

विश्वाविषयीचे हे कुतूहल आणि त्याच्या विलक्षण रचनेविषयीचा हा आदरभाव (ईश्वराला मधे न आणताही) आपण विद्यार्थ्यांमध्ये संक्रमित केलाच पाहिजे.

He stood up in his shoes and he wondered
He wondered
He stood up in his shoes and he wondered

ही स्तिमित भावना हा देखील व्यक्तिमत्वाचा एक महत्त्वाचा विकासच आहे.

**मानवाचे भावविश्व**

विश्वाची अंतिम कोडी मानवी बुद्धीच्या शक्तीच्या व तंत्रज्ञानविकासाविषयीच्या मानवाच्या कल्पकतेच्या व कर्तृत्वाच्या पलीकडची आहेत असे कदाचित् अखेरीस मान्य करावे लागले, तरीही त्यामुळे ईश्वराविषयीची बहुसंख्य मानवांची जी संकल्पना आहे त्या पद्धतीच्या ईश्वराचे अस्तित्व सिद्ध होते असे मात्र नाही. अनेकदा ही गोष्ट या वादात अध्यात्मवादी स्वीकारत नाहीत. विज्ञान तेथपर्यंत जाऊन पोहोचूच शकत नाही असे जर आहे तर अपौरुषेय ग्रंथांनी, साक्षात्कारी प्रेषितांनी, साधुसंतांनी जे सांगितले त्यांचा पुरावा 'आप्तवाक्य' म्हणून तुम्ही का मान्य करीत नाही, असा त्यांचा प्रश्न असतो. अशा वेळी निर्गुण, निराकार, निर्विकार, अनादि, अनंत अशा ब्रह्माचेच अस्तित्व केवळ त्यांच्या मनात नसते. त्यांच्या मनात आपल्या जीवनात आपल्या साहाय्याला धावून येणाऱ्या कृपाळू कनवाळू क्षमाशील अशी परमेश्वराची प्रेमळ संकल्पना असते. परमेश्वर न्यायी असे सर्वजणच मानतात, परंतु परमेश्वराच्या न्यायापेक्षाही त्याची क्षमाशील वृत्ती व करुणा या अधिक प्रभावी आहेत अशी त्यांची श्रद्धा असते. "परमेश्वर न्यायी आहे हे जेव्हा जेव्हा माझ्या लक्षात येते त्या त्या वेळी भीतीने माझा थरकाप उडतो" असे त्यांचे सहसा होत नाही. "कायेन वाचा" इत्यादींनी आपण जी जी पातके केली ती आपण अगतिकपणे केली, "केनापि देवेन हृदि स्थितेन यथा प्रयुक्तोऽमि तथा करोमि" असे म्हणून देवाच्याच दाराशी हा पापभार ठेवण्याची त्यांची मनःप्रवृत्ती असते.

मानसशास्त्र याचे काही योग्य विश्लेषण करूही शकेल. मानववंशशास्त्र आदिमानवाच्या शारीरिक, भौतिक, मानसिक असहाय्यतेतून या वृत्तीचा उगमही शोधून दाखवू शकेल. जीवनात काल्पनिक का होईना परंतु काही आधार, सुरक्षितता शोधण्याच्या प्रयत्नात मानव पारलौकिकाच्या, देवदेवतांच्या संकल्पनाकडे वळला असला पाहिजे यात संशय नाही. परंतु बालपणाचे मुरलेले संस्कार ज्याप्रमाणे नंतरच्या प्रयत्नांतून दूर करणे अशक्यप्राय असते त्याप्रमाणे "आदिमानव" अवस्थेच्या काळात आत खोल जाऊन मुरलेले संस्कार माणूस नंतर कितीही प्रगत झाला तरी समूळ नाहीसे होत नाहीत असाच आजवरचा मानवजातीचा इतिहास आहे. नास्तिक दर्शने व त्यांचे अनुयायी याला अपवाद आहेत. परंतु

अनुक्रमणिका

एकूण मानवाजातीच्या संदर्भात व समस्यांच्या मूलभूत निराकरणाच्या बाबतीत त्यांचे यश अपवादाने नियमच सिद्ध व्हावा इतक्याच अल्प प्रमाणात आहे. देवाच्या, धर्माच्या रूढ संकल्पना मुळीच न मानणारी आणि तरीही आदर्श ऐहिक जीवन जगणारी माणसं मानवाच्या इतिहासात किती झाली याची साक्षेपी मोजदादच करावयाची ठरवले तर काही दशकांच्या पलीकडे अंकज्ञानाची आवश्यकता राहणार नाही.

साम्यवाद जगातील एकूण लोकसंख्येच्या एक-तृतीयांश भागावर या शतकात दीर्घकाळ आपली अप्रतिहत सत्ता चालवत आला असताना असे विधान करणे कोणाला अतिधाष्ट्यांचे किंवा अज्ञानाचे वाटणे काही वर्षांपूर्वीपर्यंत शक्य होते. आज साम्यवादी राष्ट्रांबाबतही हा विश्वास कोणाला उरलेला नाही.

सुमारे पंचवीस वर्षांपूर्वीच माझ्या अल्पकालीन रशिया भेटीत मी ईश्वर आणि स्टॅलिन यांचा शोध घेण्याचा प्रयत्न केला होता. दोघेही पाठ्यपुस्तकांतून हद्दपार होते. पाठ्यपुस्तकांत विचार होते ते त्यांच्या विरोधातील प्रचाराचेच होते. स्टॅलिन तर मला कुठेच पुतळ्याच्या स्मारकाच्या रूपात शोधूनही सापडला नव्हता. माझी एक दुभापी अत्यंत धार्मिक वृत्तीची होती. तिच्याबरोबर दोन तीनदा मी चर्चमधील प्रार्थनेलाही उपस्थित राहिलो. "अहो, हे लोक god या शब्दातील 'g' देखील कॅपिटल 'G' असा काढत नाहीत" अशी तिची संतप्त प्रतिक्रिया होती. मी तिला एकदा म्हटले, "आपल्या कारच्या ड्रायव्हरला मी 'तुझा देवावर विश्वास आहे का?' असे विचारू का?"

ती शांतपणे म्हणाली, "असा प्रश्न रशियात सहसा कोणी कोणाला विचारीत नाही".

आज रशियात, इतर साम्यवादी राष्ट्रांत काय स्थिती आहे?

या सर्वांचा शैक्षणिक प्रयत्नांच्या रचनेत कसा आणि कोणता संदर्भ असू शकतो?

## "धर्मनाम् अनेकता" की एकात्मता

आदिमानवाच्या मनात असणारी भीती, असुरक्षिततेची भावना, आपल्यावर कृपा-अवकृपा करू शकेल अशा शक्तीच्या अस्तित्वाविषयी वाटणारी भावनात्मक गरज यातून प्राथमिक धर्मकल्पनेचा उदय झाला. दगड, धोंडे, पर्वत, नद्या, सूर्य आदि देवदेवतांच्या पूजा, नवससायासांना प्रारंभ झाला. निसर्गाचा जवळजवळ प्रत्येक आविष्कार अशा पूजांचे श्रद्धास्थान बनला. जगात असा एकही आदिम समाज अस्तित्वात नाही (व पुरातत्त्वशास्त्राप्रमाणे कधीही अस्तित्वात नव्हता) की ज्यामध्ये या प्रकारच्या काही कल्पना अस्तित्वात नव्हत्या. संकल्पना मुख्यत्वेकरून सुरक्षितता लाभावी या भावनेतून निर्माण झालेली असल्यामुळे व्यक्तिगत वा समूहाच्या-टोळीच्या जीवनात काही हितकारक घडून आले तरी ती त्या देवतेची कृपा व काही प्रतिकूल घडले तरी त्याहून अधिक प्रतिकूल घडले नाही म्हणूनही ती त्या देवतेची कृपा. यात मानव सुरक्षित नव्हता, परंतु त्या देवतेचे स्थान मात्र पक्के सुरक्षित होते. मानवाच्या दृष्टीने आपण आपल्याला न पेलणारा भार एका समर्थ दैवताच्या कृपेवर सोडून दिल्याचे मानसिक समाधान त्याला आश्वासक होते. या आश्वासनाची भावनात्मक आवश्यकता हा देव-दैवतांचा, धर्माचा एक महत्त्वाचा आधार आजतागायत राहिलेला आहे. माणसाने कितीही प्रगती केली व निसर्गावर कितीही विजय मिळविले तरी या भावनात्मक गरजेतून त्याचे मन मुक्त होणार नाही हे अटळ आहे. 'A Free Man's Worship' या आपल्या निबंधात बर्ट्रांड रसेल लिहितो : 'Yet by death, by illness, by the voice of duty we must learn, each one of us, that the world was not made for us and that however beautiful might be the things we crave, Fate may nevertheless forbid them.' (हे विश्व कोणी आपल्यासाठी घडवलेले नाही याची जाणीव आपल्यापैकी प्रत्येकाला जीवनात केव्हाना केव्हातरी होणे अटळ आहे. मृत्यू, आजार, कठोर कर्तव्याची हाक आपल्याला प्रिय वाटणाऱ्या आकांक्षापासून दैवयोगाने आपल्याला दूर खेचून नेल्याखेरीज राहणार नाही.) खरा धीर पुरुष अशावेळी आपल्या पाठीशी कोणीही देव वगैरे नाही असे ठामपणे माहीत असताना देखील या आपत्तींना वीरवृत्तीने सामोरा जाईल असे रसेलने म्हटले आहे. या वृत्तीचे स्वतः घडवलेले संरक्षक कवच कितीजण धारण करू शकणार? आणि कवच कितीही अभेद्य मानले तरी त्याचाही भेद करू शकतील असे तीव्र आघात कधी होणारच नाहीत असे तरी यथार्थ निश्चितपणे कोण सांगू शकेल? अन्य संदर्भात रसेलनेच आपल्या "सुखाची साधना" (The Conquest of Happiness) या ग्रंथात म्हटले आहे : 'ज्याच्यावर एखादा तीव्र आघात झालेला आहे – जर एखाद्याची सर्व मुले अपघातात गेली असतील – त्याला या सांगण्याचा काही उपयोग नाही हे मला माहीत आहे." याहूनही तीव्र आघात असू शकतात. ते व्यक्तिशः आपल्यावर येण्याची संभाव्यता कमी हे संख्या-शास्त्रीय तत्त्वाप्रमाणे माहीत

असतानासुद्धा त्याची अत्यंत अल्पांश अशी शक्यताही माणसाच्या मनाचा थरकाप उडवावयास पुरी असते. (सत्याग्रहाच्या इर्ष्येने आलेला प्रचंड जनसमुदाय गोळीबाराच्या दहा वीस फैरींतच रानोमाळ पांगतो हे याच भावनेचे प्रत्यंतर आहे.)

यामुळे मानवी मन सुरक्षिततेच्या भावनेचा हा काल्पनिक आधार सोडावयास तयार होत नाही यात नवल नाही. या आधाराचा दोर बुद्धीच्या शस्त्राने तोडणे तसे कठीण नाही; सुदैवाने कठोर कसोटीचा प्रसंग आलाच नाही तर ही भूमिका अंतकाळापर्यंतही टिकवणे कठीण जाऊ नये. परंतु निदान हा काल्पनिक आधार असता तरी बरे झाले असते असे कसोटीचे प्रसंग आपल्यावर आले नाहीत यासाठी आपण देवाचे किंवा दैवाचे आभार मानले नाहीत तरी योगायोगाचे आश्चर्य मानावयासच हवे. 'Oh God, My God, why hast Thou so forsaken me' असे येशूलाही शेवटी क्रूसावर म्हणावे लागले. त्याचा मानसिक आधार उपकारक, अनुपकारक का अर्थशून्य?

या पायरीवर चढण्याची व तेथे स्थिर राहण्याची ज्यांची कुवत असेल ते धन्य होत. त्यांच्याविषयी माझ्या मनात असीम आदरच आहे. परंतु जनसामान्यांना हा आदर्श पेलणे शक्य आहे असे समजून शैक्षणिक प्रयत्नांची आखणी करण्यात केवळ शक्तीचा अपव्यय होईल व हाती काहीच लागणार नाही अशी भीती मला वाटते.

मग शिक्षणाच्या क्षेत्रात या बाबत काहीच करता येणार नाही काय?

तसे नाही. खूपच करता येण्यासारखे आहे असे मला वाटते. परंतु त्यासाठी काय करणे अवघड व अनावश्यकही आहे याच्या मर्यादाही आपण समजून घेतल्या पाहिजेत.

त्या तशा घेतल्या व त्या जाणीवेतून आपली मांडणी आपण केली तर आपण केवळ बुद्धिप्रामाण्यवादाच्या अहंकारातून इतरांच्या श्रद्धास्थानावर हल्ला करीत आहोत या भावनेतून जी विरोधी तीव्र प्रतिक्रिया येते तिची धार कमी होईल आणि अधिक समजूतदारपणे या प्रश्नाचा विचार करावयास लोक तयार होतील.

**धर्म आणि समाजरचना**

धर्म आणि समाजरचना यांचा परस्परसंबंध सुस्पष्ट आहे. 'धारणात् धर्म इत्याहुः धर्मो धारयते प्रजाः।' हे महाभारतातील वचन याच संबंधाचे प्रकटीकरण आहे. धर्माचा नंतरचा पगडा कितीही तीव्र व समाजविरोधी होवो, परंतु धर्माने प्रथमतः समाजमानसात मूळ धरण्यासाठी सुरवातीला तरी समाजाची धर्मविषयक भावनात्मक भूक भागवण्या-बरोबरच समाजाचे तत्कालीन काही व्यावहारिक प्रश्न सोडविण्याची क्षमता त्यामध्ये असावयासच हवी. त्याखेरीज त्या समाजमानसाच्या भूमीत तो रुजूच शकणार नाही. धर्माचा असा स्वीकार एखाद्या गटाने केला व नंतर तलवारीच्या धारेने अन्य समाजात त्याचा प्रसार करावयाचे ठरवले तर तसा तो होऊ शकतो व त्या अन्य समाजांतील व्यवस्था तादृश कारण नसतानाही बदलली जाऊ शकते. अन्य धर्मीयांचे धर्मांतर करणे हे या धर्मांचे आपल्या अनुयायांची संख्या वाढविण्याचे एक हत्यारच बनते. इस्लाम व ख्रिश्चन धर्मांनी आपापल्या धर्माच्या प्रसारासाठी जगाच्या इतिहासात ते तसे वापरले आहे. या प्रकारच्या प्रसाराला दोन प्रकारच्या मर्यादा राहतात. पहिली मर्यादा आक्रमकांच्या सामर्थ्याची व दुसरी मर्यादा अन्य धर्मीयांच्या सुसंघटित प्रतिकार शक्तीची. परतु जिंकल्या गेलेल्या समाजातील पहिली धर्मांतरित पिढी सोडली तर नंतरच्या पिढ्या या धर्मांतराची खंत करताना आढळत नाहीत. कदाचित् त्या अधिकच कडवेपणाने नवधर्माचा प्रसार व प्रचार करू लागतात. पारलौकिकतेची भावनात्मक गरज पूर्वीच्या धर्माप्रमाणे हा धर्मही भागवत असतो; व नव्या समाजरचनेत आत्मसात् झाल्याने जुन्या समाजव्यवस्थेशीही त्याचा संबंध आणि संदर्भ तुटलेला असतो. धर्माच्या आधारावर समाजसंघटना राष्ट्रसंकल्पनेच्या आधी कितीतरी शतकांपासून होत होती. यूरोपमध्ये अन्य कारणांनी राष्ट्रसंकल्पनेचा उदय होऊन तिचा प्रभाव वाढल्यानंतर धर्मसंकल्पनेचे संघटनात्मक सामर्थ्य कमी झाले. इस्लामी देशांत हे घडून आले नाही. भारतातही घडून आले नाही. म्हणून भारतात आपल्याला धर्मातीत राष्ट्रीय एकात्मतेचा आग्रही व कृत्रिम प्रचार करावा लागतो. धर्मातीत राष्ट्रीय एकात्मतेकडे आपल्याला जावयाचे असेल तर आजच्या परिस्थितीतील भारतातील धर्मांची बलस्थाने व मर्मस्थाने व त्याचप्रमाणे आजच्या भारतीय राष्ट्रवादाची बलस्थाने व मर्मस्थाने यांचा आपल्या विचारवंतांना प्रथम साक्षेपी निर्भय विचार करावा लागेल व भारतीय संस्कृतीची मांडणी आपल्या शिक्षणक्रमात करताना त्या अभ्यासक्रमाची तदनुरूप फेररचना करावी लागेल. हे करणे केवळ दुर्घटच आहे असे नव्हे तर अशक्यप्राय आहे असे वाटावे अशीच आजची परिस्थिती आहे, परंतु मार्ग जर हाच









असेल तर केव्हातरी निर्धाराने पाऊल उचललेच पाहिजे.

आजचा काळ विशेषच प्रतिकूल आहे ही गोष्ट तर खरीच. रामजन्मभूमी-बाबरी मशीद हा वाद आजच्या परिस्थितीचे कारण असण्यापेक्षा आजवर जी परिस्थिती चालत आली तिचा तो परिणाम आहे. मूलतत्त्ववादाने या काही वर्षांत सर्वत्रच उचल घेतली आहे. भारतातही याचे परिणाम आढळून येतात. भारताची धर्मातीत राज्यरचनेची राज्यघटनेतील घोषणा मूलतत्त्ववादाचे निराकरण करण्याचे तर सोडाच परंतु त्याला निर्बल करण्यातही अयशस्वी ठरली याचाच हा पुरावा आहे.

यातून बाहेर पडण्याचा काहीच मार्ग नाही का? सर्वधर्मसमभाव भारतात प्रत्येकाच्या अंतःकरणात रुजवणे हा तो मार्ग आहे असे मला वाटते. मी अनेक ठिकाणी एक विधान केले आहे व त्यासाठी अनेकांचा तीव्र रागही ओढवून घेतला आहे. ते विधान असे आहे : "मी हिंदू आहे याचा मला अभिमान आहे, परंतु मी मुसलमान नाही याचे मला दुःख आहे; मी ख्रिश्चन नाही, यहुदी नाही, पारसी नाही, बौद्ध, जैन आदि नाही याचे मला दुःख आहे. त्याचबरोबर मी हिंदू आहे याचा मला अभिमान असला तरी हिंदू धर्मात अशा गोष्टी आहेत की त्याच्यासाठी माझी मान शरमेने खाली आहे." लोक मला विचारतात की इतर धर्मांत अशा गोष्टी नाहीत काय? त्याला माझे उत्तर एवढेच की त्या दाखवून देण्याचे काम त्या त्या धर्माविषयी प्रेम व आस्था असणाऱ्यांचे आहे. अशा प्रागतिकांच्या मी बाजूचाच आहे. मुस्लिम सत्यशोधक समाजातील वीरवृत्तीच्या तरुण कार्यकर्त्यांविषयी मला नितांत आदर आहे.

सर्व धर्मांविषयी आस्था व आदर असा दाखविला गेला की लोक चिडतात असा माझा अनुभव आहे. परंतु जाणकारांना हे माहीत असावयास हवे की महात्मा गांधींची हीच भूमिका होती, विनोबाजींचीही होती; किंबहुना, हिंदूधर्माच्या आग्रही अभिमान्यांनाही ज्यांच्या विषयी आदर आहे (आणि माझ्या मनातही ज्यांच्या विषयी आदर आहे) त्या रामकृष्ण परमहंसांची व स्वामी विवेकानंदांची भूमिकाही अशीच होती. मी केवळ एक त्यांचा अत्यंत नम्र मतानुयायी आहे.

या महामानवांची ही भूमिका शिक्षणक्षेत्रातून प्रभावीपणे प्रसृत करता येईल काय?

**मूलतत्त्ववादाचा (Fundamentalism) धोका**

आज जगात सर्वत्र मूलतत्त्ववादाचा धोका वाढत आहे असे म्हटले जाते. इस्लामी राष्ट्रांत तो विशेष प्रखरपणे आहे. खोमेनीच्या इराणमध्ये त्याची सर्वात तीव्र प्रतिक्रिया आली. दुसऱ्या राष्ट्राचा नागरीक असणाऱ्या सल्मान रश्दीला खोमेनीने मृत्युदंडाची शिक्षा करावी, कोणत्याही मुसलमानाने कोठेही ही शिक्षा कार्यवाहीत आणावी, त्या मुसलमानाचा इस्लाम गौरवच करील असेही त्याने सांगावे, व इंग्लड-सारख्या प्रागतिक राष्ट्रात रश्दीला अनेक वर्षे अमाप खर्च करून इंग्लडमधील शासनव्यवस्थेला भूमिगत अवस्थेत त्याच्या संरक्षणाची व्यवस्था करावी लागावी, हे सर्व कशाचे निदर्शक आहे?

भारतही आज मूलतत्त्ववादाच्या पकडीखाली येत आहे असा स्पष्ट धोका दिसतो. शहाबानो प्रकरणातील भारतीय मुसलमानांची प्रतिक्रिया हे याचे एक गमक आहे. खरा खोटा इतिहास उकरून निघणारी रामजन्मभूमी मुक्तीची रथयात्रा हे त्याचे दुसरे गमक आहे. महात्मा गांधींच्या काळापासून याबाबतची आपली भूमिका मुसलमानांना चुचकारण्याची राहिली ही आपली महत्त्वाची चूक झाली. तत्कालीन परिस्थितीच्या संदर्भात याचे काही समर्थन कदाचित करता येण्यासारखे असले तरी ते अपुरेच मानावे लागेल. स्वातंत्र्यसंपादनानंतर Vote Bank च्या मागे लागून भारतातील राज्यकर्त्यांनी व विरोधी पक्षांनीही असेच गुळमुळीत धोरण आखले हा अधिक मोठा प्रमाद आहे. हिंदूंचा स्वाभिमान मूलतत्त्ववादाच्या आहारी न जाता जागृत करणाऱ्या स्वामी विवेकानंदांची शिकवण त्यांना मानणारे हिंदूही विसरले असा याचा अर्थ आहे. "तुमच्या प्राचीन वारशातील काही भाग निकृष्ट व त्याज्य आहे. परंतु त्यातील अन्य भाग गौरवशाली व अभिमानास्पद आहे. तो स्वीकारा आणि पुढे चला, सामर्थ्यशाली बना, कोणाच्याही द्वेषावर आपली संघटना उभी करण्याचे तुम्हाला कारण नाही. शूर परंतु सत्प्रवृत्त रहा" अशी त्यांची शिकवण होती. ती आपण सोयीस्करपणे विसरले आहोत का? मूलतत्त्ववाद केव्हा जोर करतो? या वादाच्या आधारावर आपण आक्रमक व जयिष्णु राहतो अशा विश्वासावर व काही काळ येणाऱ्या अनुभवावर. याउलट पराभवाच्या व अवनतीच्या काळात या वादाच्या आधारावरच आपण सुसंघटित राहू शकतो या कल्पनेच्या व अनुभवाच्या पोटीही मूलतत्त्ववाद उचल घेऊ शकतो. तुझा धर्मच उत्कृष्ट आहे, त्याचा कसाही प्रसार करण्यात तू धर्मांतरितांचेही कल्याणच करीत आहेस, या प्रयत्नात तू जगतोस की मरतोस याचे महत्त्व नाही. विजयी झालास तर राज्य तुझेच आहे, रणांगणात कामी आलास तर स्वर्गाची दारे

तुझ्यासाठी खुलीच राहतील असे धर्माचे आश्वासन असते.

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्।

असेच आश्वासन श्रीकृष्णाने अर्जुनाला दिले होते. देवाधर्मावर विश्वास न ठेवणारा साम्यवादही अखेरचा विजय साम्य-वादाचाच होणार; ही इतिहासक्रमाची अंतिम परिणती अटळ आहे, तू शहाणा क्रांतिकारक असशील तर या क्रांतिचक्राची गती आपल्या कुवतीप्रमाणे वाढविण्याचा प्रयत्न करशील; मूर्ख अजाण प्रतिगामी असशील तर या क्रांतिचक्राची गती रोखण्याचा प्रयत्न करशील. परंतु तू काहीही केलेस तरी क्रांतिचक्र आपले संपूर्ण परिवर्तन पुरे केल्याखेरीज राहणार नाही असा दुर्दम्य विश्वास कडवा साम्यवाद आपल्या अनुयायांना देत असतो. या मनोभूमिकेचे धर्मांच्या मनो-भूमिकेशी मूलभूत साम्य आहे म्हणून विविध धर्मांचा विचार करताना अनेकदा साम्यवादाचाही लोक विचार करतात. सुमारे पाउणशे वर्षापूर्वीच मॅक्स ईस्टमनने 'साम्यवाद - एक नवा धर्म' (Communism : A New Religion) हे पुस्तक लिहिले होते. नंतर दोन दशकांनी साम्यवादाविषयी निराश झालेल्या लोकांनी 'The God That Failed' हे पुस्तक लिहिले. त्या पुस्तकाचे शीर्षकही (या देवाने आम्हाला दगा दिला) हेच मनोगत सुचवत नाही काय ?

मूलतत्त्ववादाशी मुकाबला करणे यामुळेच अवघड आहे, परंतु त्यामुळेच ते तितकेच निकडीचेही आहे. कोणत्याही समाजाचा मूलतत्त्ववाद इतरांना तर धोकादायक असतोच, परंतु तो त्या समाजालाही आत्मघातकी व हानिकारक असतो. यातून बाहेर कसे पडावयाचे?

या दृष्टीने शिक्षणक्षेत्राला काही करता येण्यासारखे आहे काय?

अगदी वेडगळ मूलतत्त्ववादाचा प्रतिकार करणेही तसे सोपे नाही परंतु तरीही ते तितकेसे दुष्कर नाही. शिक्षणक्षेत्रातील मूलतत्त्ववादाचा प्रतिकार अमेरिकेतील प्रागतिकांना या शतकात करावा लागला.

या मूलतत्त्ववाद्यांचा, बायबलमधील कोणत्याही विधानावर आक्षेप घेऊ शकतील असे शास्त्रीय सिद्धांत शाळांतून शिकवावयास विरोध होता. माकडापासून उत्क्रांत होत मानव प्राणी निर्माण झाला या डार्विनच्या सिद्धांताला तर त्यांचा प्रखर विरोध होताच. इसवी सनापूर्वी ४००४ साली विश्वाची निर्मिती झाली असा त्यांचा दृढविश्वास होता. त्यांनी संघटना उभी केली. त्यांना काही प्रभावी प्रचारकही मिळाले. अमेरिकेतील काही राज्यांतून त्यांनी कायदेमंडळात आपला लढा नेला. डार्विनचे सिद्धांत शिकविणाऱ्या शिक्षकाला दंडाची शिक्षा करावी इथपर्यंतचा कायदाही एक दोन राज्यांत त्यांनी पास करून घेतला. प्रागतिकांनी त्या कायद्याविरूद्ध एक टेस्ट केस उभी केली. त्या शिक्षकाला खालच्या कोर्टाने दंड केला तर नंतर अपिलात वरच्या कोर्टाने तांत्रिक त्रुटी दाखवून तो दंड रद्द केला. मूलतत्त्ववाद्यांचा प्रभावी नेता (हा एकदा डेमोक्रटिक पक्षाचा अध्यक्षीय निवडणुकीसाठी उमेदवारही होता) कोर्टातल्या उलटतपासणीत लटपटला. त्याचे व त्या आंदोलनाचे हसे झाले.

परंतु असे असले तरीही हे सर्व रामायण अमेरिकेसारख्या राष्ट्रात केवळ पाउणशे वर्षांपूर्वी घडले हे लक्षात घेतले तर प्रश्नाच्या मुलभूत विकटतेची कल्पना येऊ शकेल.

### धर्म आणि सामाजिक न्याय

'धर्म ही अफूची गोळी आहे' असे मार्क्स म्हणाला होता. ( साम्यवाद हा देखील एक धर्मच आहे आणि तीही एक अफूची गोळीच आहे हे त्याच्या लक्षात आले नाही. जग पाऊणशे वर्षांच्या दारुण अनुभवानंतर ही गोष्ट शिकले.) मादक पदार्थ कठोर वास्तव विसरावयास लावणारी गुंगी आणू शकतात. दोन्हीही गोष्टी व्यक्तीच्या व समाजाच्याही दृष्टीने हानिकारकच.

परंतु, याउलट, करुणा, न्यायवृत्ती, बंधुता या गोष्टीही धर्मांनी आग्रहाने सांगितल्या आहेत. यावरील आग्रहाबाबत धर्माधर्मांत तरतमभाव आहे. अनेकदा या भावना स्वधर्मीयांपुरत्याच मर्यादित ठेवलेल्या आढळतात. परंतु मंगल भावनांचे मुळीच अस्तित्व नसणारा एकही धर्म जगात नाही. तसे नसते तर प्रत्येक धर्मात जे साधुसंत, जी उत्तुंग व्यक्तिमत्त्वाची माणसे निर्माण झालेली आहेत तशी ती झालीच नसती, व त्यांना आपापल्या धर्माबद्दल आंतरिक उमाळ्याचा जिव्हाळाही वाटला नसता. परंतु हे जसे खरे त्याचप्रमाणे, सर्व धर्मांत आर्थिक विषमता प्रचंड प्रमाणात आढळते व सामाजिक विषमता विविध धर्मात कमी अधिक प्रमाणात असली तरी सामाजिक विषमता संपूर्णतः स्वधर्मीयात नष्ट केली आहे असाही एकही धर्म नाही. वैवाहिक संबंध सहजपणे सर्व स्तरात होते की नाही हे याचे सोपे परंतु स्पष्ट गमक असू शकते.

याविरुद्ध जवळजवळ सर्व धर्मांतील पुरोगामी लोकांनी आता आघाड्या उघडल्या आहेत. अस्पृश्यतेला

अनुक्रमणिका








सार्वत्रिक अमान्यता, सतीप्रथेला विरोध, स्त्रीमुक्तीविषयींच्या भूमिका ही यांची हिंदुधर्मीयांतील उदाहरणे आहेत. सत्यशोधक मुस्लिम समाजाचे आंदोलन, खोजा मुसलमानांतील प्रागतिकांचा संघर्ष यासारखी मुसलमान समाजातीलही उदाहरणे आहेत. ख्रिश्चन लोकांतही आक्रमक पुरोगामी पुढे येत आहेत. "आमची येशूवर श्रद्धा आहे पण येशूने ज्या पददलितांसाठी आत्मबलिदान केले त्यांच्यासाठी आपण आणि आपले चर्च काय करीत आहे? असा त्यांचा कडवा प्रश्न आहे. या सर्व आंदोलनांची तीव्रता आणि शक्ती कमीअधिक आहे. या गतीने हे कार्य पूर्ण व्हावयास किती काळ लागेल?

हे सांगणे कठीण आहे. परंतु कधीही हालवली जाऊ शकणार नाहीत अशी सत्तास्थाने गेल्या वर्षभराच्या काळातच धडाधड कोसळलेली आपण पाहिली आहेत. आंदोलने, पुरोगामी वा प्रतिगामी, कशी वेगाने जवळजवळ शून्यातून उभी राहू शकतात हेही जगात व भारतातही आपण अनुभवले आहे. यात धोक्याचे इशारे आहेत त्याप्रमाणे आशेलाही जागा आहे. हे सर्व लक्षात घेऊन आशेने शिक्षकांना व शिक्षणक्षेत्राला कार्य करता येईल.

### शिक्षण क्षेत्राच्या मर्यादा

असा आशावाद बाळगला तरीही या संदर्भात शिक्षणक्षत्राच्याही स्वतःच्या काही मर्यादा आहेत याची जाणीव ठेवूनच आपण आपले कार्यक्रम हाती घेतले पाहिजेत. सर्वच राष्ट्रांत अशा मर्यादा आहेत परंतु भारतासारख्या राष्ट्रात तर त्या विशेषच आहेत. ज्या राष्ट्रात साठ टक्के जनता निरक्षर आहे त्या राष्ट्रात शिक्षणक्षेत्र त्या बहुसंख्य जनतेसाठी काय करू शकणार? प्राथमिक शाळेतील गळतीचे प्रमाण पाहिले तर ही टक्केवारी आणखीनच वर जाते. शिवाय शिक्षणक्षेत्र म्हणजे तरी काय? शासन, शिक्षक, विद्यार्थी, पालक आणि समाज हेच त्याचे घटक ना? यापैकी शासन (व विरोधी पक्षही) गट्ठा मतदानाकडे लक्ष देऊन आपली धोरणे आखणार, शिक्षक येथीलच समाजमानसाच्या वातावरणात वाढलेले – घडलेले. या शिक्षकांतही स्त्रिया बहुसंख्येने असणार. प्रगत राष्ट्रांत तर प्राथमिक स्तरावर जवळजवळ सर्वच शिक्षक महिला असतात. (पुरुष शिक्षकांची संख्या हे अन्य आकर्षक रोजगारक्षेत्राच्या अभावाचे गमक मानावयास हरकत नाही) या ठिकाणी याचे महत्त्व इतकेच, जुन्या रूढीपरंपरा यांचा पगडा (जगात सर्वत्रच) महिलांवर अधिकच असतो. परंतु तरीही या प्रश्नाच्या संदर्भात सुयोग्य जाणीव असलेले शिक्षक – शिक्षिका या क्षेत्रात लक्षणीय प्रमाणात आहेत असा माझा विश्वास आहे. शिक्षक, समाज काय, किंवा पालक काय, (त्या दोघांना वेगवेगळे काढावयाचेही खरे तर कारण नाही) हे ज्याला आपण समाजमानस म्हणतो त्याचेच प्रतिनिधी.

आणि ज्या विद्यार्थ्यांवर आपण सुसंस्कार करण्याचा प्रयत्न करणार ते विद्यार्थी! त्यांची धार्मिक संस्कारांच्या बाबतीतील जवळजवळ पक्की जडणघडण आधीच अटळपणे झालेली असते. शिक्षणशास्त्रच सांगते की मुलाच्या मनावर वयाच्या तिसऱ्या वर्षापर्यंत जे संस्कार झालेले असतात ते वज्रलेप असतात. आईबाप, जातीपातींच्या, धर्मभेदांच्या आधाराने घडलेल्या निवास–परिसरातच सामान्यपणे राहत असतात. सण, समारंभ, उत्सव, प्रार्थना आदि वातावरणातून घडणारे परिणाम त्या परिसराचेच होतात. रूढी, परंपरा, रागद्वेष हे या वातावरणातूनच आत्मसात केले जात असतात. शाळेत आल्यानंतरही त्याचा बहुतांश वेळ या वातावरणात जात असतो. ही परिस्थिती प्रथमदर्शनी नाउमेद करणारी आहे यात शंका नाही. परंतु फार नाउमेद होण्याचे कारण नाही. ही सर्व परिस्थिती वज्रलेप आहे, अशीच जर परिस्थिती असती, तर विविध धर्मांत झालेली धर्मांतर्गत परिवर्तनेही कधीच होऊ शकली नसती. तशी परिवर्तने कडव्या समजल्या जाणाऱ्या धर्मातून देखील जगाच्या इतिहासात घडून आलेली आपणा सर्वांना माहीत आहेत. सुधारणेची वास्तव परिस्थितीतून निर्माण झालेली निकड, या परिवर्तनासाठी निर्धाराने उभे राहणारे नेते, यथाकाल त्यांना मिळणारे समविचाराचे व समभाववृत्तीचे अनुयायी, व दीर्घकाळ प्रतिकूल परिस्थितीत प्रयत्न करीत राहण्यासाठी लागणारी सहनशीलता यांच्या एकत्रित मिलाफानेच ही सर्व परिवर्तने आजवर घडून आलेली आहेत. कोणतेही परिवर्तन कधी अंतिम पूर्णत्वाचे नसते. त्या त्या कालखंडातील ते एक प्रागतिक पुढचे पाऊल असते इतकेच.

हे सर्व लक्षात घेऊन भारतात शिक्षकांना व शिक्षणक्षेत्राला काय करता येईल?

### शिक्षणक्षेत्रातील मर्यादा आणि शक्यता

आत्तापर्यंतच्या विवेचनात "धर्म आणि शिक्षण" यांच्या परस्पर संबंधातील काही समस्यांची काही प्रमाणात तरी मांडणी झाली असेल असे वाटते. केवळ चर्चेसाठी म्हणूनच प्रामुख्याने ही मांडणी करण्यात आलेली आहे. "वादे








वादे जायते क्षुब्ध वादः" एवढेच न होता "वादे वादे जायते तत्त्वबोधः" असे फलीत अल्पप्रमाणात तरी हाती यावे अशी अपेक्षा आहे. या दृष्टीने पाहिल्यास आता सारांशरूपाने काय आढळते?

१) धर्मांचा समाजमानसावरचा पगडा हा अतिशय व्यापक आणि सखोल स्वरूपाचा आहे.

२) सर्व धर्मांत मानवतेला अनुकूल अशी मंगल तत्त्वे आहेत, त्याचप्रमाणे सर्व धर्मांत कालबाह्य झालेल्या व समाजधारणेला अहितकारक अशा गोष्टी आहेत.

३) आपण भर समान मंगलमूल्यांवर द्यावा व या आधारे सर्वधर्मसमभावाची जोपासना करावी. त्या त्या धर्मातील अहितकारक गोष्टींचे निराकरण करण्याचे काम त्या त्या धर्मातील भावनात्मक दृष्टीने सश्रद्ध परंतु बौद्धिक दृष्टीने जागृत अशा पुरोगामी सुधारकावर प्रामुख्याने सोपवावे. मात्र अन्यधर्मातील पुरोगाम्यांना त्यांच्या अडचणीच्या व कसोटीच्या काळात सहानुभूती दाखवावी व सहकार्यही करावे.

४) धर्माचा जनमानसावरील प्रभाव व्यक्तीच्या जन्मापासून सुरू होतो व, काही अपवादात्मक व्यक्ती सोडल्या तर, व्यक्तीच्या अंतकाळापर्यंत चालू राहतो. सर्व समाजाचे समाज या वातावरणात वावरत असतात. यासाठी धर्म आणि शिक्षण यांचा प्रभावी दुवा जोडावयाचा असेल तर तो शिक्षणक्षेत्राच्या व अनौपचारिक (परंतु तरीही औपचारिक) असलेल्या शिक्षणाच्याही बाहेर जाऊन जोडला पाहिजे. हे प्रत्यक्ष समाजप्रबोधनाचे कार्य आहे.

या परिस्थितीत शिक्षणक्षेत्राला काय करता येण्यासारखे आहे? या परिस्थितीत शिक्षणक्षेत्राच्या कार्याला मर्यादा पडत असल्या तरी प्रत्यक्ष कार्यांच्या शक्यताही खूप आहेत.

(१) मूळ स्वरूपात कोणताही धर्म कितीही जखडबंद असला तरी जगातील कडव्यातील कडवे धर्म देखील मूळ स्वरूपात होते तितके जखडबंद राहू शकलेले नाहीत. परिस्थितीच्या रेट्याने परिवर्तनाची गरज निर्माण झाली व प्रत्येक समाजात प्रत्येक पिढीत असणाऱ्या धाडसी, पुरोगामी लोकांनी या परिवर्तनाला गती देण्यासाठी आंदोलने केली. मानसिक जडता हा सर्वसामान्य जनतेचा साधारण समान गुण असला तरी प्रत्येक पिढीत क्रांतीकारकतेची वृत्ती व कुवत असणारी काही माणसे निसर्गतःच निर्माण होतात अशी जगातील सर्व समाजांच्या इतिहासाची साक्ष आहे.

(२) या वस्तुस्थितीत शिक्षणक्षेत्राला एक आश्वासन आहे, त्याचप्रमाणे एक निर्भयपणे स्वीकारावयाचे आव्हानही आहे. शिक्षणक्षेत्र हे एक दुधारी शस्त्र आहे. प्रतिगामी वृत्तीनेही त्याचा वापर करता येतो; पुरोगामी वृत्तीनेही ते परिवर्तनाचा मार्ग मोकळा करू शकते.

(३) शिक्षणक्षेत्र हे सामान्यपणे शासनाने घालून दिलेल्या मर्यादांच्या कक्षेत कार्य करीत असल्याने शासनाने स्वतःसाठी स्वीकारलेल्या मर्यादा या शिक्षणक्षेत्राच्याही सहजपणे मर्यादा होतात. परंतु कठोर हुकूमशाही अस्तित्वात नसेल तर शिक्षणक्षेत्राला व शिक्षकांनाही या मर्यादा इष्ट दिशेकडे वळविता येतात.

(४) भारतात आजवर अशी परिस्थिती आहे म्हणून, आपण या दृष्टीने संपूर्णतया उदासीन राहतो याचे खापर शासनाच्या माथी फोडून आपल्याला मोकळे होता येणार नाही. उदाहरणार्थ, लक्षावधी विद्यार्थी असलेल्या महाराष्ट्रातील एका शिक्षणसंस्थेच्या शाळांतून सर्व धर्मांविषयी आवर्जून आदर दाखवणारी प्रार्थना दरदिवशी म्हटली जाते. परंतु तिचा खरा सर्वधर्मभावाचा आशय किती विद्यार्थ्यांच्या पर्यंत पोचतो, निदान तो शिक्षकांच्या अंतःकरणापर्यंत तरी पोचला आहे का, हे दक्षतापूर्वक पाहिले गेले पाहिजे. तशी रचना करणे, तसे त्या त्या स्तरावरील प्रबोधन होणे आवश्यक आहे. हे उदाहरण तरी कशाला हवे? प्रत्येक पाठ्य-पुस्तकातील प्रतिज्ञेचे काय होते? तिच्यातील प्रागतिक आशय विद्यार्थ्यांच्या पर्यंत पोचविण्याच्या मार्गात कोण किंवा काय आड येते?

(५) हे सर्वत्र जर घडत नसेल तर यामागे केवळ आळस वा अज्ञान नसून तशीच काही विशेष कारणे असली पाहिजेत व त्यांचाही आपण साक्षेपाने शोध घेतला पाहिजे, हे मानावयासही माझी तयारी आहे. परंतु हा शोधही शिक्षण क्षेत्राने व प्रामुख्याने पुरोगामी वृत्तीच्या शिक्षकांनीच घेतला पाहिजे. 'शिक्षण क्षेत्र' ही तशी अमूर्त कल्पना आहे. प्रत्येक शिक्षक ही एक व्यक्तिगत शक्ती आहे. अशा काही व्यक्ती एकत्र झाल्या तर कामाचा प्रारंभ होऊ शकतो. प्रत्येक टप्पावरच्या कार्याचा तपशील सविस्तर चर्चेनेच ठरवावा लागेल.

♦♦♦

# शिक्षणाची समान संधी

देवदत्त दाभोलकर



आर्थिक विषमतेमुळे निर्माण होणाऱ्या शैक्षणिक संधीच्या विषमतेचे निराकरण करणे तुलनात्मक दृष्ट्या थोडेसे अधिक सोपे असते.

सामाजिक विषमतेमुळे निर्माण होणारी शैक्षणिक संधीची विषमता दूर करणे हे अधिक दुर्घट काम आहे. सर्वच राष्ट्रांतून आलेला व येत असलेला हा अनुभव आहे. जातिसंस्थेसारख्या सामाजिक संस्थेमुळे ज्या वेळी सामाजिक अभिसरणांचे प्रवाह अनेक शतके कुंठित झालेले असतात त्या ठिकाणी तर ह्या विषमतेचे परिणाम एखाद्या जुनाट दुर्धर रोगाप्रमाणे समाजाच्या हाडीमासी मुरलेले असतात. सामाजिक अभिसरण वाढवून ही विषमता कमी करण्याचे नैसर्गिक मार्ग मोकळे करून देणे हाच यावरील मुख्य उपाय आहे.

समाजाच्या पुनर्रचनेत अनेक प्रश्नांचा गुंता हा या पूर्वसुकृत-दुष्कृताशी येऊन अडकलेला असतो. हा गुंता आपण अधिक वाढवावयाचा की कमी करावयाचा एवढाच आपल्या-पुरता निर्णय सुजाण व्यक्तींना किंवा संघटनांना घ्यावयाचा असतो. एरवी सारे कर्मगतीप्रमाणे फिरतच असतात. शिक्षण क्षेत्रात 'संख्या की गुणवत्ता' या प्रश्नाच्या चर्चेत आढळून येणारा गुंता हे अशा प्रकारच्या गुत्यांचे एक सुस्पष्ट उदाहरण आहे.

या चर्चेत सामाजिक संघटनांचे रागलोभ प्रत्यक्ष–अप्रत्यक्ष वर उसळून येतात याचेही नवल वाटावयास नको. ते तसे उसळून वर न येतील तरच नवल. वरिष्ठ वर्गाने कनिष्ठ वर्गातील लोकांच्या मनात असलेल्या चिडीच्या भावनेला केवळ आत्मसंरक्षक चिडीच्या भावनेने उत्तर देणे हे शेवटी आत्म-संरक्षणाचेही ठरणार नाही, तर आत्मघाताचे ठरेल. कनिष्ठ वर्गाच्या मनात अशी चीड असावी याचे केवळ दुःख करूनही भागणार नाही. ती चीड असली तरी सामाजिक अन्यायाच्या विरुद्ध निर्माण झालेली चीड आहे हे वरिष्ठ वर्गाने समजून घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

परंतु समाजाचे झपाट्याने परिवर्तन व्हावे अशी इच्छा असेल तर केवळ एवढ्याने भागणार नाही. आम्ही आमच्यावर झालेला अन्याय तर सहन करणार नाहीच, परंतु सामर्थ्याच्या बळावर दुसऱ्यावर अन्याय करणार नाही; इतकेच नव्हे तर, ज्या ज्या ठिकाणी अन्याय घडत असेल तेथे तेथे त्याच्या विरुद्ध उभे राहू अशा क्रान्तिकारक वृत्तीच्या कार्यकर्त्यांच्या वर्गाची आज गरज आहे. हा कार्यकर्त्यांचा वर्ग समाजातील सर्व थरांतील सुजाण व्यक्तींचा मिळून असाच तयार होईल.

या वर्गाने शिक्षण क्षेत्रात आपल्यासमोर ठेवावयाचे अंतिम चित्र स्पष्ट आहे. इतर समाजाच्या, राज्यांच्या, राष्ट्रांच्या तुलनेत आपण युद्धकालात किंवा विकासकार्याच्या गतीत उणे ठरणार नाही इतकी गुणवत्तेची जोपासना आपण केलीच पाहिजे. परंतु गुणवत्ता ही काही कोणा वर्गाची मिरासदारी नाही. अशा मिरासदारीला शरीरशास्त्राचा, मानसशास्त्राचा, मानववंशशास्त्राचा काहीही आधार नाही. आज चालत आलेली मिरासदारी ही विशिष्ट सामाजिक इतिहासातून निर्माण झालेली मिरासदारी आहे. सर्वच देशांतून अशी मिरासदारी जवळजवळ पन्नास वर्षापूर्वीपर्यंतच्या काळात अस्तित्वात होती. श्रीमंत वर्ग, उमराव वर्ग, श्वेतवर्णीय अशा वर्गातील लोकच अधिक शिक्षण घेत व समाजात अधिक महत्त्वाच्या जागा पटकावीत. आज ही मिरासदारी रशिया, इंग्लड, अमेरिका या सारख्या राष्ट्रांतून पुष्कळशी दूर झालेली आहे. परंतु तरीही तेथे अद्यापिही संपूर्ण समान संधीचे वातावरण अस्तित्वात आलेले आहे असे म्हणता येणार नाही. या राष्ट्रांच्या गेल्या पन्नास वर्षांच्या इतिहासावरून आपल्याला दोन महत्त्वाचे निष्कर्ष काढता येतील. एक निष्कर्ष असा की मूळची विषमता कितीही शतकांची असली तरी चार-पाच दशकांच्या काळात तिचा प्रभावी निरास करता येतो. दुसरा महत्त्वाचा निष्कर्ष हा की राष्ट्राची आर्थिक प्रगती झपाट्याने चालू राहिली तरच कोणालाही मागे न ओढता आजवर मागे राहिलेल्यांना पुढे असलेल्यांच्या बरोबर आणण्याचा यशस्वी प्रयत्न करता येतो.

त्याच दिशेने आपल्याला वाटचाल करावयाची आहे.

♦♦♦

अनुक्रमणिका



विभाग तिसरा

# उद्या : मानवी ऊर्जेच्या शोधात

**चरैवेति। चरैवेति।**

**चर एव इति।**

*चालतच रहा - चालतच रहा*

*यात विचार मिळतील*
*प्रत्यक्ष अनुभव मिळतील*
*यातून काही नवे प्रयोग*
*सुचू शकतील.*
*अशा प्रयोगांच्या*
*प्रत्यक्ष कार्यवाहीसाठी*
*आवश्यक पूरक साहाय्याचे*
*आश्वासनही मिळेल.*










# आदर्श विद्यामंदिर विकास दिशा

प्र० द० पुराणिक

**प्रा. प्र.द. पुराणिक यांनी अशा स्वरूपाची योजना आपल्या विद्यालयात (हल्लीचे एस. एम. जोशी विद्यालय, पुणे) सुमारे ३०-३५ वर्षांपूर्वी समर्थपणे राबविली व यशस्वी केली.**

### 'विषयमित्र' योजनेचे स्वरूप

प्रत्येक वर्गामध्ये काही विद्यार्थी एखाद्या विपयात खूप हुशार असतात व काही विद्यार्थी हुशार नसतात. हुशार नसणाऱ्यांचे त्या त्या विपयातील ज्ञान अतिशय वेताचे असल्यामुळे त्यांच्या मनामध्ये वार्षिक परीक्षेच्या वेळी आपण नापास होऊ की काय अशी भीती असते. ही भीती घालवून त्यांच्या मनामध्ये त्या त्या विषयात पास होण्याइतपत आत्मविश्वास निर्माण करावा, जे हुशार विद्यार्थी असतील त्यांनी या भयग्रस्त मित्रांना तो तो विपय फावल्या वेळेत शिकवून त्यांना उत्तीर्ण होण्याइतपत मदत करणे, हे थोडक्यात या योजनेचे सार आहे.

### योजनेची उद्दिष्टे

योजनेची उद्दिष्टे पुढील प्रमाणे ठरवण्यात आली. विद्यार्थ्यांत स्वयंशिस्त असावी. शिक्षकांच्या भीतीमुळे लागलेली शिस्त नसावी. भीतीमुळे किंवा दंडामुळे अभ्यास करण्यासाठी प्रवृत्त करण्यापेक्षा मला स्वतः ज्ञान प्राप्त व्हावे ही वृत्ती विद्यार्थ्यांमध्ये निर्माण व्हावी.

माझ्या शेजारी असणाऱ्या माझ्या मित्राच्याही ज्ञानाचा स्तर वाढावा अशी प्रेरणा निर्माण व्हावी. विद्यार्थ्यांनी आपल्यामध्ये असलेल्या सुप्त गुणांना ओळखावे व त्याचा लाभ विद्यालयाला, देशाला करून द्यायला प्रवृत्त व्हावे. स्वतःची व देशाची कीर्ती वृद्धींगत करावी.

- समाजात सध्या दूरचित्रवाणीमुळे अनेक चित्रविचित्र आकर्पणे निर्माण झाली आहेत. त्यापासून अलिप्त रहायची वृत्ती विद्यार्थ्यांत वाढावी.
- चंगळवाद व व्यसनाविषयी विद्यार्थ्यांत घृणा निर्माण व्हावी. केवळ भौतिक सुखापेक्षा मानसिक सुखाचे आकर्पण वाढावे.
- भारतीय संस्कृतीची जाण निर्माण व्हावी.
- विद्यार्थीकेंद्रित अध्ययन, अध्यापन वाढावे.
- एकाग्रता साऱ्या यशाचे बीज आहे हे तत्त्व वृत्तीत यावे.
- अनेक कारणांमुळे विद्यालयातील ३-४ शिक्षक एकाच वेळी रजेवर असतात. अशावेळी त्या वर्गातील संबंधित विषयात प्रथम क्रमांक गुण प्राप्त करणाऱ्या विद्यार्थ्याने किंवा विपयमित्र असलेल्या विद्यार्थ्याने त्या तासातील संबंधित विषय समर्थपणे शिकवावा. (असा निश्चित अनुभव आहे की, विपयमित्र व प्रथम क्रमाकांचा हुशार विद्यार्थी अध्यापनाची ही जबाबदारी समर्थपणे हाताळतात.)

### विकास योजनेचे खालील प्रमाणे लाभ झाले

- विद्यार्थ्यांनी जबाबदारी स्वीकारल्यामुळे शिक्षकांचा कार्यभार (Workload) कमी व्हायला मोलाची मदत झाली.
- संपूर्ण विद्यालयाची शिस्त वाढली.
- विभिन्न विपयांचे अध्ययन विपयमित्रांच्या मार्गदर्शनामुळे सोपे झाले, उत्तीर्ण होण्याचे प्रमाण वाढले.
- विविध विपयांची समज वाढल्यामुळे साहजिकच विद्यार्थ्यांचा उत्साह वाढला.
- विद्यार्थ्यांमध्ये अध्ययनाची गोडी वाढली, त्यामुळे आपोआपच शिस्त निर्माण झाली.
- शिक्षकांची काही प्रमाणात चिंता कमी झाली व उत्साह वाढला.

### प्रेरणा

सुमारे ३०-३१ वर्षांपूर्वीची घटना. विद्यालयाच्या प्राचार्यपदी असताना, निरीक्षण करताना (एका वर्गामध्ये) असे आढळले की एक हुशार विद्यार्थी सर्व वर्गाला तळमळीने










शिकवत आहे, सर्व वर्ग अतिशय शांतपणे त्याचे शिकवणे ऐकत आहे. त्याच्या अध्यापनाची हातोटी फारच सरस होती. कोठारी आयोग इ. स. १९६६ साली स्थापन झाला. त्यात अत्यंत महत्वाची एक गोष्ट आहे. शक्य तेथे विद्यार्थीकेंद्रित शिक्षण केले तर शिक्षकांचा भार हलका होईल. या गोष्टीकडे शिक्षण क्षेत्रात आतापावेतो फार दुर्लक्ष झाले.

कार्यालयात आल्यानंतर या घटनेचा मी गंभीर विचार केला, चिंतन केले. असे लक्षात आले की, प्रत्येक वर्गात काही हुशार विद्यार्थी व काही सामान्य बुद्धीचे विद्यार्थी असणारच. सामान्य बुध्दीच्या विद्यार्थ्यांमध्ये आपण नापास होऊ की काय अशी भीती कायम असते. अशा विद्यार्थ्यांना हुशार विद्यार्थ्याने मार्गदर्शन केले तर त्यांच्या मनातील अनुत्तीर्ण होण्याची भीती कमी होईलच व त्यांना त्या विषयात उत्तीर्ण व्हायचा आत्मविश्वास वाढेल. हा विचार दृढ करून ही योजना निश्चित केली.

### अनुभव

ही योजना सुरू केली याचा परिणाम असा झाला की, प्रत्येक वर्गातील त्या त्या विषयामध्ये उत्तीर्ण व्हायचे प्रमाण समाधानकारक वाढले. या योजनेमुळे खालीलप्रमाणे प्रत्यक्ष गोष्टी घडतात.

- शिक्षकांना कमजोर विद्यार्थ्यांना नेहमीच मार्गदर्शन करायला पुरेसा वेळ असतोच असे नाही. मित्रांना शंका विचारताच विषयमित्र विद्यार्थी मार्गदर्शनाचे काम करतात.
- कमजोर विद्यार्थी आपल्या विषयमित्र विद्यार्थ्यांजवळ सहज शंका विचारतात व सहज त्यांच्याशी संपर्क साधतात.
- ज्या दिवशी एखादा शिक्षक रजेवर असतो तेव्हा विषय-मित्र विद्यार्थी जबाबदारपणे संपूर्ण वर्गाला मार्गदर्शन करू शकतो.
- विषयमित्र विद्यार्थ्यावर प्रारंभापासून जबाबदारी सोपवली तर तो आपल्या विषयाचे अधिक चिंतन करून मार्गदर्शन करीत असतो.
- त्याचा त्या विषयाचा अभ्यास वाढतो.
- विद्यार्थ्यांचे परस्पर सहकार्य वाढते.
- वेळ व्यर्थ जात नाही.
- परस्परसहकार्यामुळे आपोआप शिस्त निर्माण होते.
- इयत्ता पाचवी, सहावीच्या वर्गात मात्र या कार्यवाहीसाठी अधिक जागरूक राहिले पाहिजे.

### समस्या

या सर्व गोष्टी लक्षात आल्यानंतर श्री. के. केसरीमलजी जैन आदर्श विद्यामंदिर योजना विकास दिशा या कार्यासाठी ही योजना लागू करण्याची कल्पना (२००२-२००४) मला सुचली. तेव्हापासून ही योजना कार्यान्वित केली.

एस. एस. सी. परिक्षेत अनुत्तीर्ण व्हायची अनेक कारणे आहेत.

- विद्यार्थी स्वतः तळमळीने अभ्यास करीत नाहीत.
- काही विद्यार्थ्यांच्या घरी अभ्यासाला अनुकूल वातावरणही नसते.
- काही विद्यार्थ्यांना घरी साधे मार्गदर्शनसुद्धा मिळत नाही.
- अनेक वेळा त्यांना अनेक विषय प्रारंभापासून समजलेले नसतात. तरीदेखील अशा विद्यार्थ्यांना अनेक कारणांमुळे (ती येथे मुद्दाम दिलेली नाहीत) वरच्या वर्गात उत्तीर्ण म्हणून पाठविले जाते. असे विद्यार्थी उत्तम शिक्षकांनी उत्तम अध्यापन करूनसुद्धा त्या विषयात अनुत्तीर्ण का होतात व तो विषय मुळातच का समजला नाही याचा विचार शिक्षणक्षेत्रात झाला नाही असे वाटते. तो मूलगामी विचार मुद्दाम दिला आहे.

वर्गात असलेल्या सर्व विद्यार्थ्यांची घरची, सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक स्थिती समान नसते त्यामुळे त्या विद्यार्थ्यांचा बुद्ध्यांक (I.Q.) समान नसतो याचा परिणाम खालील चार बाबतीत होतो.

१. प्रत्येक विद्यार्थ्याची विषय धारणा करण्याची क्षमता व समज (Understanding & Capacity) भिन्न असते.

२. प्रत्येक विद्यार्थ्याची आकलन क्षमता (Grasping Capacity) भिन्न असते.

३. प्रत्येक विद्यार्थ्याची अवधारणा करण्याची क्षमता (Retention Capacity) भिन्न असते.




४. प्रत्येक विद्यार्थ्याची अभिव्यक्तीची क्षमता (Expression Capacity) समान नसते.

या सर्व भिन्न परिस्थितीमुळे चांगल्या अध्यापकांनी कितीही चांगले शिकविले तरी काही विद्यार्थी तो विषय पुरेसा समजू शकत नाही. ही स्थिती आठवी ते दहावी पर्यंत चालू राहिली तर विद्यार्थी, त्याचा विशेष दोष नसतानाही, त्या विषयात कमजोर राहतो व शेवटी अनुत्तीर्ण होतो.

**उत्तरासाठी**
**भगीरथा, शिक्षका, ये**

- प्रायः सर्व योजना अशा असतात की, जे, जे तयार आहे ते ते एकत्र करून जनतेसमोर मांडून आपण काही तरी निर्मिती केली असे दाखविले जाते. आपले तसे असता कामा नये.
- तळागाळापर्यंत पोहोचून ज्यांना सहसा कोणाचा आधार नाही त्यांना विकसित करायचा हा भगीरथ प्रयत्न आपण करावयास हवा.
- ग्रामीण भागातील विद्यालयांची स्थिती अतिशय नाजूक आहे. जिद्द आणि निष्ठा यांचा ग्रामीण भागात जेव्हा साक्षात्कार होतो, तेव्हा हाडाचा शिक्षक रोमांचित होतो, शिक्षकाचा तोच खरा आनंद आहे.
- विद्यार्थ्यांचे व विद्यार्थिनींचे डवे उघडून पहावे आणि त्या डव्यात जेव्हा सूर्यदर्शन घडते तेव्हा मन हेलावते व हृदय पिळवटून निघते.
- ही स्थिती वघून शिक्षकाचे मन म्हणते, "भगीरथा तू ये आमच्या मदतीला आणि ज्ञानगंगा प्रवाहित करण्याकरिता आम्हाला आशीर्वाद दे."
- घामाच्या थेंवातून सरस्वतीच्या चरणकमलाशी जेव्हा ग्रामीण मुले लीन होतात तेव्हा तिचा वरदहस्त त्यांच्या चेहऱ्यातून पाहणे हे आगळे भाग्य आहे.
- गुरूजनहो आपण अधिक विद्यार्थीनिष्ठ, ज्ञाननिष्ठ, समाजनिष्ठ होऊ या. शिक्षण क्षेत्र उजळवून टाकू या. भगीरथ शिक्षका, ये.

♦♦♦

**हे असेही घडू शकते**

वर्गात गेल्यावर 'कोणाकोणाचे पालक साक्षर नाहीत त्यांनी हात वर करा' असे विचारण्यात आले. या प्रश्नानंतर काही वेळ केवळ शांतता होती. पुन्हा एकदा विचारल्यानंतर काही मुलांनी भीत, भीत हात वर केले. हात वर करण्यापूर्वीची शांतताही खूप काही बोलून गेली. माझे वडील मी शिकावे म्हणून आवश्यक त्या सुविधा मिळविण्यासाठी कष्ट करीत असतात, पण मी मात्र आईवडिलांच्या अशिक्षितपणावद्दलचा विचारही केला नाही. पुन्हा एकदा काही काळ शांततेत गेल्यानंतर त्यातील काही विद्यार्थ्यांनी आम्ही आजपासून आमच्या आईवडिलांना साक्षर करण्यास सुरुवात करू असे सांगितले.

आम्ही जे चांगले वाचले, आम्हाला भावले ते आमच्या आईवडिलांना सांगू, यातून आमच्या आईवडिलांना ज्ञान मिळणार आहे व त्यातून आमचा अभ्यासही वाढणार आहे. थोडक्यात पालकांची ही शिकवणीच होती, आपण कोणाला तरी शिकवीत आहोत याचा मुलांना अभिमान वाटत होता व त्या गोष्टीचा आनंद मिळत होता, आनंदाची प्रतिक्रिया ही आनंददायी असते, शिक्षण ही आनंददायी घटना आहे, त्याची ही प्रचिती आहे.

त्याचप्रमाणे काहींनी हा उपक्रम सुरू केल्यावर इतर विद्यार्थ्यांनासुद्धा आपण असेच करावे असे आतून वाटू लागले. कोणीही आदेश न देता जेव्हा आपल्याला भावलं म्हणून ती गोष्ट आपण करतो तेव्हा ती नक्कीच दर्जेदार असते. यातून चांगुलपणाची लागण सुरू होते. विद्यार्थ्यांनी पालक साक्षर करायचे हे अभियान स्वयंस्फूर्तीने स्वीकारले. असे घडणे हीच या योजनेची यशस्विता आहे.

प्र० द० पुराणिक

**ज्या शिक्षकांना अशा प्रयोगांत रस असेल त्यांच्यासाठी एक शिबिर आयोजित करता येईल. प्रा. प्र. द. पुराणिक मार्गदर्शन करतील. इच्छुकांनी प्रा. देवदत्त दाभोलकर यांच्याशी संपर्क साधावा.**

अनुक्रमणिका

# सातारा जिल्हा माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा मुख्याध्यापकांचे शैक्षणिक उद्‌बोधन व चर्चासत्र - एक परामर्श

श्री० नी० कात्रे

१९७० पासून महाराष्ट्रात माध्यमिक शिक्षणाचा प्रसार फार वेगाने झाला आणि १९७८ मध्ये तत्कालीन मुख्यमंत्री वसंतरावदादा पाटील यांनी ग्रामीण भागातील अधिकात अधिक लोकांना शालेय शिक्षणाचा लाभ घेता यावा म्हणून 'विना अनुदान' तत्त्वावर शाळा काढण्यास परवानगी दिल्यानंतर तर प्रसाराचा वेग फारच झाला. अशा शाळांपैकी आवश्यक किती आणि अनावश्यक किती, त्यातून कोणत्या अनिष्ट गोष्टी शिक्षण-क्षेत्रात आल्या, हा एक चर्चेचा आणि चिंतेचा वेगळा विषय आहे. परंतु अशा शाळांमध्ये शालाप्रमुख म्हणून जे काम करू लागले ते शिक्षक अगदी अनुनभवी असे होते आणि आहेत. त्यांना मुख्याध्यापकपदाचा एकूण कार्यभार, जबाबदारीची व कामाची क्षेत्रे आणि त्यातील अनेक बारकावे माहीत करून देण्याची नितान्त आवश्यकता होती. सातारा जिल्हा परिषद शिक्षणविभाग (माध्यमिक) यांनी जिल्हा मुख्याध्यापक संघाच्या सहकार्याने पूर्ण दोन दिवसांचा उद्‌बोधन वर्ग समता विद्यालय, पाडेगाव ता. खंडाळा या ठिकाणी घेतला. या वर्गासाठी सुमारे साडेतीनशे मुख्याध्यापक बंधुभगिनींनी हजेरी लावली. दररोज सकाळच्या व दुपारच्या सत्रात मिळून सुमारे चौदा घड्याळी तासांची व्याख्याने झाली. व्याख्यात्यांनी आपापल्या विषयांच्या टिप्पणी प्रत्येक अभ्यासकाला व्याख्यानापूर्वी दिल्या होत्या. त्यामुळे नियोजनपूर्वक तास झाले.

उद्‌बोधन शिबिरामध्ये

१) शासकीय व इतर पत्र-व्यवहार

२) शालेय हिशोब-कीर्द, खतावणी

३) वेतनश्रेणी, वेतनवाढ

४) विद्यार्थ्यांचे कामाचे मूल्यमापन व गुणदान-श्रेणीदान

५) विद्यार्थ्यांची निकालपत्रके

६) शाळेतील कामाचे वेळापत्रक व विविध शालेय समित्या व त्यांचे कामकाज

७) शाळेतील प्रवेश, वगैरे विषयांवर तज्ज्ञ मार्गदर्शकांची व्याख्याने झाली. शंका समाधान असा उपक्रमही प्रत्येक तासानंतर असे. त्यामुळे 'हा उद्‌बोधन वर्ग उपयुक्त झाला' असे समाधानाचे उद्‌गार अनेक मुख्याध्यापकांकडून ऐकायलाही मिळाले.

या वर्गाला जोडूनच मुख्याध्यापक संघाचे वार्षिक चर्चासत्रही घेण्यात आले. यंदा ह्या चर्चासत्रासाठी दोन विषय ठेवलेले होते.

१. माध्यमिक शाळा शिक्षण सेवक ह्यांच्या नेमणुका आणि त्यामुळे उद्भवणाऱ्या अडचणी व त्यावरचे उपाय.

२. संगणक शिक्षण, शालेय गुणवत्ता व श्रेणीदान योजना.

या दोन विषयांवर लिहिलेले निबंध हे अपेक्षेपेक्षा खूपच कमी गुणवत्तेचे वाटले. वास्तविक या निबंधांमधून शालेय व्यवस्थापन व गुणवत्ता याविषयीचा सविस्तर ऊहापोह होईल, अशी अपेक्षा होती.

मध्यप्रदेश आणि गुजरात या राज्यांनी सुशिक्षित बेकारांची संख्या कमी व्हावी आणि कमी वेतनश्रेणीवर अगदी तुटपुंज्या वेतनावर शाळांमध्ये अध्यापक उपलब्ध व्हावेत, या निव्वळ व्यापारी दृष्टिकोनातून 'शिक्षण सेवक' ही नवी व्यवस्था शिक्षण क्षेत्रामध्ये आणली आणि महाराष्ट्र शासनानेही ती स्वीकारली. बारावी आणि पदवीपर्यंत महाविद्यालयीन शिक्षण चांगल्या गुणांसह पूर्ण करून आणि त्यानंतर शिक्षण पदविका किंवा पदवी घेतलेल्या तरुणांना रोजी शंभर-सव्वाशे रुपयांच्या रोजगारावर तीन वर्षे काम करण्यास सांगावयाचे (त्यांना उन्हाळी सुट्टीचा पगारही नाही), त्यांना फक्त आठ किरकोळ रजा, सेवा-सलगता नाही, असल्या अशैक्षणिक पद्धतीने नेमणूक द्यायची, त्यातून अध्यापक वर्गामध्येच एक वेगळा वर्ग तयार करायचा, वगैरे अनेक अनेक मुद्यांवर परखड विचार व्यक्त होतील अशी अपेक्षा होती. संगणक ह्या विषयाचीही व्याप्ती, अध्यापनाच्या पद्धती, आकारण्यात येणारे भरमसाठ शुल्क आणि त्याला मिळालेले अवास्तव महत्त्व, शालेय अध्यापनात आणि विद्यार्थ्यांच्या एकूण अभ्यासात या शिक्षणाचे स्थान, याबाबींचीही मांडणी व त्यावर चर्चा अपेक्षित होती. पण तिथेही फारसा गंभीरपणाने विचार झालेला दिसला नाही.

उद्‌बोधन वर्गाचा समारोप आणि चर्चासत्राचा आरंभ अशा संधिकाळात थोर विचारवंत आणि विद्यार्थ्यांच्या विकासाबाबत सतत जागरूक आणि कार्यरत असलेले प्राचार्य देवदत्त दाभोलकर यांनी नेमक्या शब्दांत मांडलेले विचार,

अनुक्रमणिका






मुख्याध्यापकांना अंतर्मुख करून गेले असावेत. शालेय शिक्षणाच्या क्षेत्रामध्ये उत्तम कामगिरी होण्याच्या दृष्टीने पुरेसे अनुदान हे हवे असतेच. परंतु केवळ अनुदानानेच विद्यार्थ्यांच्या गुणवत्तेचा सर्वांगीण विकास होतो असे नाही. यंत्र चालण्यासाठी इंधनाची आवश्यकता असतेच, परंतु त्या यंत्राची कामगिरी निर्दोष ठेवण्यासाठी आणि त्यामध्ये असलेल्या क्षमतेचा, सामर्थ्याचा पूर्णपणे आणि नियोजनपूर्वक उपयोग करून घेणे आवश्यक असते. शालेय विश्वात असलेल्या मानवी साधन-संपत्तीचा मानवी ऊर्जेचा-शोध, त्याची क्षेत्रे शोधणे आणि त्या ऊर्जेचा उपयोग करून व्यक्तीचा संपूर्ण विकास साधणे किती आवश्यक आहे, हा एक क्रांतिकारक विचार त्यांनी श्रोत्यांसमोर ठेवला.

१९८४ पासून सुरू झालेल्या 'नवे शैक्षणिक आव्हान' यामध्ये प्रमुख विचार आहे, तो विद्यार्थ्यांमधील क्षमतांचा विकास कसा व किती पद्धतशीरपणे करून घेता येईल, हा आहे.

आपल्या देशाची लोकसंख्या फार मोठी आहे, आणि दिवसेंदिवस ती अधिक वाढते आहे, म्हणून चिंता करीत बसण्यापेक्षा त्या मानवी ऊर्जेचा अगदी नियोजनपूर्वक आणि अधिकाधिक उपयोग कसा करून घेता येईल, याचा अग्रक्रमाने विचार होणे गरजेचे आहे. आणि त्या कार्याचा शुभारंभ करण्याचे उत्तम क्षेत्र म्हणजे प्राथमिक व माध्यमिक शाळा आणि त्यातील घटक.

सध्या कामाच्या प्रत्येक ठिकाणी, "काम फार आहे, ताप आणि मनःस्ताप फार आहेत, अगदी वैतागून गेलो आहोत," अशी तक्रार ऐकायला मिळते. शाळांमधील घटकाच्या चढत्या भाजणीप्रमाणे विचार केला, तर शिक्षक म्हणतात की 'हल्लीची मुलं काहीही करत नाहीत, अगदी आळशी झालेली आहेत.' मुलं म्हणतात 'शाळेत शिक्षक स्वतः फारसं शिकवत नाहीत, ऊठसूट काही लिखापढी सांगतात किंवा थातुर-मातुर करून वेळ काढतात.' शिक्षकांच्या मते 'मुख्याध्यापक काहीही करत नाहीत; सगळं आमच्याकडून करून घेतात ते घेतात आणि आम्ही काही विचारण्याआधीच काही उणिवांचे पाढे वाचू लागतात.' मुख्याध्यापकांचे मते, (स्वतःला वगळून) 'शाळेतले सर्वजण काम-टाळू (एस्केपिस्ट) आहेत. शिक्षक तास कसेभसे भरतात, मुले तर सांगकामी झालीत. पालकांच्या अपेक्षा नको इतक्या वाढल्या आहेत, त्यामुळे या सर्वातून शाळेचा गाडा पुढं ढकलणं हे माझं मीच करू जाणे.'

हे सर्व उद्‌गार अगदी खोटे आहेत असे नाही, परंतु आत्मसमर्थन आणि परनिंदा अधिक आहे. आपण स्वतः आपले कर्तव्य चोखपणे वजावतो आहोत का? असा प्रश्न यातील प्रत्येक घटकाने स्वतःला विचारला पाहिजे. सुरुवात मुख्याध्यापकांपासून केली, तर असे म्हणता येईल की ते स्वतः त्यापदाला पूर्णतः पात्र आहेत का? नसतील तर स्वतःमधील उणिवा दूर करण्याचे त्यांनी काही निश्चित वेळापत्रक आखले आहे का? अध्यापक म्हणून आणि मुख्याध्यापक म्हणून काम करताना त्यांच्या मनात केवळ नेमलेले काम करण्याचाच हेतू असतो, का आपण ज्या ठिकाणी काम करतो त्यातील सर्व घटकांना आपल्या सर्व सामर्थ्यानिशी प्रगतिपथावर नेणे हे आपले दायित्व आहे. असे काम करणे ही खरी समाजसेवा आहे; अशी सेवा-समर्पणाची भावना असते का? शालेय काम करताना त्यांना असे व्यावसायिक समाधान (जॉब सॅटिस्फॅक्शन) मिळते का? हा खरा प्रश्न आहे. शिक्षक म्हणजे कामगार नाहीत. त्यांच्या सुदैवाने त्यांच्यासमोर जे किशोर-कुमारवयोगटातले संस्कारक्षम छात्र असतात त्यांना ज्ञानाची भूक कशी लागेल? तशी भूक लागण्यासाठी त्यांना आपण ज्ञानग्रहणाचे कोणकोणते विषय-विभाग-कार्यक्षेत्रे-क्षमता विकासाची साधने उपलब्ध करून देऊ? याचा विचार शिक्षक-मुख्याध्यापकांसमोर सतत असेल तरच ते या क्षेत्रातले उपयुक्त घटक ठरू शकतील. भारतासारख्या खंडप्राय देशात सौरऊर्जेप्रमाणे मानवी ऊर्जेचीही उणीव नाही. मात्र या क्षेत्रातील प्रत्येक घटकाने आपली ऊर्जा स्वतःसाठी आणि आपल्या कुटुंबातील व परिसरातील प्रत्येक घटकांच्या विकासासाठी कशी उपयोगात आणता येईल, हे पाहिले पाहिजे.

आपण नोकरी करीत असताना आपल्या पगारासाठी केलेले काम करून समाजासाठी आपण तन-मन-धनाने काय करू शकतो? हा प्रश्न शालाप्रमुखांनी प्रथम स्वतःलाच विचारावा म्हणजे समाजोन्नती अनेक क्षितिजे त्यांना दिसतील. दिवसाचे सर्व तास कमी पडतील, परंतु काही उपयुक्त कार्य हातून झाल्याच्या समाधानाच्या अधीन होतील.

♦♦♦

**एक करुण हास्यकथा**

मुलगा अगदी कळवळून आईला सांगत होता.

'आई, तू काहीही म्हणालीस तरी मी अजिबात शाळेला जाणार नाही. सगळी मुले मला हसतात, शिक्षक माझी टिंगलटवाळी करतात. जीव नकोसा होतो. मी शाळेत नाहीच जाणार.'

आई म्हणाली, 'बाळ असं करून कसं चालेल. सगळ्यांना हे सहन करावच लागतं. त्याखेरीज का आपली प्रगती होते? तुला तर असं करून कसं चालेल? तू तर त्या शाळेचा मुख्याध्यापक आहेस. आता तुझ्या वयाला पन्नास वर्षं पूरी झाली. आता तुला दुसरी नोकरी तरी कोण देणार?'








अनुक्रमणिका

# चाकूर येथील लोकमान्य विद्यालयाचा प्रयत्न नकलाविरहित परीक्षा

बावासाहेब देशमुख

लोकमान्य माध्यमिक विद्यालय, चाकूर या विद्यालयात गेल्या दोन वर्षांपासून नवोदय प्रवेश परीक्षा, स्कॉलरशीप परीक्षा, सातवी बोर्ड व दहावी बोर्ड परीक्षा केंद्र देण्यात आलेले आहे. या परीक्षा केंद्रावर गैरप्रकार टाळण्यासाठी खालीप्रकारे नियेजन करण्यात येत होते.

प्रथम सर्व कर्मचाऱ्यांची बैठक बोलावून त्यांना मंडळ नियमावलीनुसार सर्व नियम समजावून सांगणे, पर्यवेक्षकांनी आपली भूमिका कशा प्रकारे पार पाडावी याबाबत मार्गदर्शन, परीक्षा सुरळीत पार पाडण्यासाठी सर्वांचे सहकार्य आवश्यक होते व या केंद्रावर कोणत्याही प्रकारचा गैरमार्ग होणार नाही किंवा गालबोट लागणार नाही यासाठी दक्ष राहून वेळोवेळी मार्गदर्शन केले.

पर्यवेक्षकांनी आपले पर्यवेक्षण हे प्रामाणिकपणे, निःपक्षपातीपणे व चोख होण्याच्या दृष्टीने मा. मुख्याध्यापक साहेबांनी पर्यवेक्षकांना मार्गदर्शन करीत असताना महाभारतातील कुरुक्षेत्रावरील कृष्णाने अर्जुनाला दिलेले उपदेश सांगून मानसिकता दृढ होण्याच्या दृष्टीने त्यांनी कुरू-क्षेत्रावरील प्रसंग सांगितला, यात कुरुक्षेत्रावर अर्जुनाला जवळचे नातेवाईक समोर दिसल्याने तो असमर्थता दर्शवू लागला. तेव्हा कृष्णाने उपदेश केला की हे एक धर्मयुद्ध आहे, ही लढाई असत्याविरुद्ध सत्याची, अन्यायाविरुद्ध न्यायाची आहे, अशा प्रकारे विविध दाखले, उदाहरणाद्वारे व मार्गदर्शनातून मानसिकतेत बदल घडवून आणला.

सन २००१-२००२ या शैक्षणिक वर्षी दहावी बोर्ड परीक्षेसाठी विद्यालयाची इमारत ताब्यात घेतली. त्या परीक्षेत केंद्रप्रमुख, सहकेंद्रप्रमुख बाहेरील देण्यात आले, तसेच पर्यवेक्षण करण्यासाठी बाहेरील शिक्षक व विद्यालयातील शिक्षक यांनी पर्यवेक्षणाची जबाबदारी घेतली. या वर्षी परीक्षेत थोडा त्रास झाला व यात तुरळक गैरप्रकार झाले.

वरील दोन्ही परीक्षेचा विचार करता असे लक्षात आले, की या परीक्षेसाठी पर्यवेक्षण करण्यासाठी बाहेरील शिक्षकांना घ्यावयाचे नाही, याच महाविद्यालयातील सर्व शिक्षक पर्यवेक्षणासाठी घेण्यात येणार असे निश्चित करण्यात आले. त्याप्रमाणे सन २००३-२००४ या वर्षी दहावी बोर्ड परीक्षेस केंद्र प्रमुख याच विद्यालयातील शिक्षक होते व सहकेंद्रप्रमुख म्हणून तालुक्याबाहेरील शिक्षक होते व पर्यवेक्षणासाठी याच विद्यालयातील शिक्षकांनाच घेण्यात आले. त्यांना परीक्षेबाबतचे सर्व नियम सांगण्यात आले. वेळोवेळी सूचना देण्यात आल्या. त्यांना प्रोत्साहन देऊन परीक्षा सुरळीत पार पाडल्या.

नवोदय परीक्षा केंद्र सन २००२-२००३ पासून याच विद्यालयात आहे. या परीक्षेस बाहेरील शिक्षकांना पर्यवेक्षणासाठी घेण्यात आले नव्हते. सर्व नियोजन याच विद्यालयाने केले होते. या परीक्षा बोर्ड परीक्षेप्रमाणेच गैरमार्गाचा अवलंब न होता सुरळितपणे पार पडल्या. या परीक्षेपासून कर्मचाऱ्यांची मानसिकता बदलून परीक्षा व्यवस्थित पार पाडण्यासाठी सर्वांनी सहकार्य करण्याचे ठरवले.

शिष्यवृत्ती परीक्षा याच पद्धतीने घेण्याचे ठरवले होते व त्याप्रमाणेच परीक्षा घेण्यात आल्या. कोणत्याही परीक्षेमध्ये गैरप्रकार झाला नाही.

गैरमार्गाचा अवलंब टाळण्यासाठी सर्वांची मानसिकता तयार झाली होती. परीक्षार्थी दालनात प्रवेश करण्यापूर्वी त्यांची कसून झडती घेण्यात येत होती. त्यांच्याजवळ असलेले साहित्य, कागद इत्यादी अगोदरच बाहेर काढण्यात येत होते. परत पर्यवेक्षक स्वतः वर्गात परीक्षार्थीला तपासत होते. त्यामुळे विद्यार्थ्यांची मानसिकता बदलली व त्यांनीही गैरमार्ग करण्याचा प्रयत्न केला नाही.

सर्व पर्यवेक्षकांना वेळोवेळी सूचना देण्यात येत होत्या, गैरमार्ग होणार नाही याची दक्षता घेण्यासाठी सांगण्यात येत होते. या सर्वांच्या मानसिकता बदलल्यामुळेच परीक्षा केंद्रावरील सर्व परीक्षा व्यवस्थित पार पडल्या.

वृत्तपत्रात परीक्षा केंद्रावर कॉपीचा सुळसुळाट असलेल्या बातम्या येत होत्या. पण येथील सर्व कर्मचाऱ्यांचा निर्धार पक्का व सर्वांनी एकच निर्णय घेतल्यामुळे या विद्यालयाने कॉपी दाखवा, हजार रुपये मिळवा असे आवाहन करणारे वृत्त वृत्तपत्रात आले.

अनुक्रमणिका

या सर्व बाबींचे नियोजन अगोदरच करण्यात आले होते. त्यामुळेच या केंद्रावर कोणताही अनुचित प्रकार किंवा गैरमार्गाचा अवलंब करण्यात आला नाही. याबाबतचे सर्व श्रेय मा. मुख्याध्यापक श्री. बाबासाहेब देशमुख यांनाच मिळते. कारण त्यांच्याच मार्गदर्शनाखाली परीक्षेचे नियोजन करण्यात येत होते. यासाठी सर्वांनी सहकार्य केले म्हणून त्यांचे वेळोवेळी अभिनंदन करण्यात आले. यापुढेही होणाऱ्या परीक्षा याच पद्धतीने घेण्याचा निर्धार सर्व कर्मचाऱ्यांनी केला आहे.

या केंद्रावर शिस्त व शांतता राहिल्यामुळेच परीक्षार्थी पूर्ण वेळ एकाग्रचित्ताने उत्तरपत्रिका लिहिण्यात मग्न दिसत होते.

विद्यालयातील कर्मचाऱ्याचे पाल्य परीक्षेस असताना त्या कर्मचाऱ्यांना त्या वेळेपुरती सुट्टी देण्यात आली. पर्यवेक्षण शिक्षकांची विषयानुसार बोर्डवर यादी लावण्यात येत होती. विषय शिक्षकास विषयाच्या पेपरला पर्यवेक्षण देण्यात आले नाही.

कायम स्वरूपी शाळेच्या गेटवर सेवक नियुक्त करण्यात आला होता. तो परीक्षेशी असंबंधितांना शाळेत प्रवेश करू देत नव्हता.

यासाठी सर्वांनी उत्तम प्रकारे सहकार्य केले म्हणूनच हे शक्य झाले. भावी काळातही यामध्ये अधिक सुधारणा करून ही सार्वत्रिक परीक्षेची गोपनीयता, विश्वासार्हता यामध्ये पारदर्शकता आणण्याचा आटोकाट प्रयत्न करण्याचा निर्धार केला आहे. शेवटच्या दिवशी केंद्रसंचालक, सहसंचालक, पर्यवेक्षक, इतर सर्व कर्मचारी यांना उत्कृष्ट पर्यवेक्षण कामे केल्याबद्दल प्रशस्तीपत्रक देऊन सत्कार करण्यात आला.

तसेच पुढील २००४-२००५ वर्षीसुद्धा कॉपी दाखवा - हजार रुपये मिळवा असे आवाहन करून परीक्षा व्यवस्थित पार पाडण्याचा निर्धार केला आहे.

♦♦♦

## एक विशेष यश
## मराठी शिक्षकाने शोधलेल्या भूमितीय उपकरणाचा जागतिक सन्मान

शालेय पातळीवर भौमितिक प्रमेयांचा उलगडा करणारे एक उपकरण शोधून काढणारे कामगार विभागातल्या एका मराठी शाळेतील शिक्षक वी.एस. शिंदे यांचा जागतिक पातळीवर गौरव करून शिक्षकांच्या आंतरराष्ट्रीय संघटनेने त्यांना 'कास्टमी' पुरस्कार दिला आहे. नायगावच्या सरस्वती हायस्कूलमध्ये शिकवणाऱ्या वी.एस. शिंदे सरांची ही गोष्ट आहे. नुकतेच ते सायप्रस येथे जाऊन तेथील शिक्षणमंत्री पेफ्किओज जॉर्जीयाडस यांच्या हस्ते 'कॉमनवेल्थ असोसिएशन ऑफ सायन्स, टेक्नॉलॉजी अँड मॅथमॅटिक्स एज्युकेटर्स', (कास्टमी) या जागतिक संस्थेचा पुरस्कार स्वीकारून परतले आहेत.

इयत्ता तिसरी ते दहावीपर्यंतच्या विद्यार्थ्यांना कोणाच्याही मदतीशिवाय रेषा, रेषाखंड, किरण, कोन, कोनाचे प्रकार, त्रिकोण, चौकोन, वर्तुळखंड, पाकळी या संकल्पना सहज समजतील, द्विमितीतल्या रचना, रेखाकृती तयार करता येऊ शकतील आणि अनेक क्लिष्ट प्रमेये सिद्ध करता येतील, असे भूमितीय उपकरण शिंदेसरांनी शोधून काढले आहे. केवळ छत्र्यांच्या काड्या आणि तवकडीच्या साह्याने अंतर्लिखित कोनाचे प्रमेय बारा वर्षांपूर्वी सिद्ध केल्यानंतर या पुढच्या प्रयोगाची वाट दिसू लागली, असे शिंदे सर सांगतात. त्यांनी शोधून काढलेल्या नव्या उपकरणाला त्यांनी 'जॉमेट्री ट्यूटर' असे नाव दिले आहे. हे उपकरण काही दिवसांपूर्वीच व्हिजिकॉन इनोव्हेशन्स इन्कॉर्पोरेशन या कंपनीतर्फे बाजारात विक्रीस आले आहे.

'कॉमनवेल्थ असोसिएशन ऑफ सायन्स, टेक्नॉलॉजी अँड मॅथमॅटिक्स एज्युकेटर्स' या युरोप, आशिया आणि आफ्रिका खंडात कार्यरत असलेल्या इंग्लंडच्या संस्थेने सायप्रसची राजधानी निकोशिया येथे शिक्षकांची आंतरराष्ट्रीय परिषद भरवली होती आणि त्यानिमित्ताने क्षिकांनी केलेल्या संशोधनात्मक कार्याची स्पर्धा घेतली होती. तीत ४०० पौंडाचे द्वितीय पारितोषिक वी.एस. तथा भाऊसाहेब शिंदे यांच्या 'जॉमेट्री ट्यूटर'ला मिळाले. पस्तीस देशांचे प्रतिनिधी उपस्थित असलेल्या तेथील शिक्षक परिषदेतही या उपकरणाची सर्वांनी वाखाणणी केली. नजीकच्या काळात या उपकरणाचा प्रसार युरोपातील इंग्लंड, सायप्रस, माल्टा येथे तसेच दक्षिण आफ्रिका, नायजेरिया व आशियात मॉरिशस आणि श्रीलंका या देशात होणार असल्याचे शिंदे यांनी सांगितले.

♦♦♦

**वरील दोन्ही :**
('शिक्षण संवर्धन' जुलै-ऑगस्ट २००४
मराठवाडा मुख्याध्यापक संघाचे मुखपत्र)





# शैक्षणिक नियोजनात शिक्षकांचा सहभाग

वि०गो० कुलकर्णी

**स्वतः केलेले संशोधन हवे**

आपले काही संकेत असतात. त्या संकेतांप्रमाणे आपण पेपर तपासतो. परीक्षा कशाला? कुठल्याही मूल्यमापनाचं असंच आहे. आपण केशवसुतांचे मूल्यमापन करूया आणि ते करत असताना त्यांना अग्रपूजेचा मान, कवी म्हणून आपण देतो, तो का देतो? काही मूल्ये ठरलेली आहेत. आणि त्यांनी काही नवीन मूल्ये आपल्या काव्यामध्ये आणलेली आहेत. 'स्तुती करावी परमेश्वराची, करू नये व्यर्थ कधी नराची' म्हणून रामायण, महाभारत, पुराण इ.गोष्टी आपल्या भाषेत सांगणे एवढाच हा एक काव्याचा किंवा सृजनशीलतेचा हेतू नाही तर मनामध्ये ज्या ज्या भावना उचंबळून येतील, त्या त्या भावना काव्यात्मक वृत्तीने प्रकट करता येतात. हा नवीन पायंडा त्यांनी पाडला हे लक्षात ठेवून, आपण केशवसुतांचे मूल्यमापन करतो. हे लक्षात जर आपण न ठेवू, तर कित्येक ठिकाणी त्यांची हेटाळणी करताना वघितल्यानंतर मुलेसुद्धा कधी कधी असं म्हणतात. 'सर, काय तुम्हीही स्तुती करता आहात? काय ही कविता आहे की काय? अगदी वोजड आणि हेंगाडी कविता आहे. यात स्तुती करण्यासारखे काय आहे? कित्येक ठिकाणी वृत्त दोष आहेत, ठिक-ठिकाणी चमत्कारिक शब्दरचना आहे. परंतु मूल्यमापन करीत असताना जे निकप असतात, ते जर स्पष्ट असतील तर मूल्यमापन हे कधी वेगळे होऊ शकत नाही. केशवसुतांचे मूल्यमापन करताना, ही दृष्टी आपल्या डोळ्यांसमोर सदैव असल्यामुळे वालकवींची सफाई आणि मुलायमता त्यात नाही म्हणून आपण त्यांना कमी दर्जाचे कवी असे कधीच मानत नाही. ही आमची मूल्ये कोणती, हे संशोधनाने आपण शिक्षकांनी ठरवावयाचे, ही एक गोष्ट झाली. दुसरी गोष्ट अशी की, जर शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार आपल्याला करायचा असेल तर, काही मतांमध्ये आपल्याला फरक करावा लागेल. जर आपण शैक्षणिक पुनर्रचनेविपयी काही वाचले असेल तर अलिकडे दुसरा एक विचार येऊ पहात आहे, तो मी थोडक्यात आपल्यापुढे मांडतो, की Aptitude test नावाची एक, म्हणजे फिजिक्स म्हणा, केमेस्ट्री म्हणा, कविता म्हणा, ड्रॉइंग म्हणा या विषयाची त्या मुलाला मूलभूत आवड किती आहे हे मोजण्याची एक टेस्ट असते. ती आपण कधी तयार केली नाही. ती तिकडून येते, आणि ती मुलांना आपण इथं देऊन त्याची फक्त कार्यवाही करीत असतो. या टेस्ट आपण आपल्या मुलांना देऊन मुलांमध्ये पदार्थविज्ञान, किंवा भौतिक या विषयांवद्दल आवड किती आहे हे आपण मोजतो. मोजल्यानंतर जर विद्यार्थी पुष्कळ असले तर आम्ही आमच्या सोयीसाठी गटवार विभागणी करून त्या घेतो.

आणि मग आपण असे म्हणतो की, जे उजव्या वाजूला आहेत, ते विद्यार्थी चांगले आहेत कारण, त्यांना याविपयीची फार आवड आहे. डाव्या वाजूला जे विद्यार्थी वसलेले आहेत ते विद्यार्थी त्यांना त्या विपयामध्ये तितकासा रस नाही. जर एक वर्षांनी ही परीक्षा घेतली तर त्या परीक्षेमध्ये सुद्धा असे आढळून येते की, ज्यांना त्या विपयांमध्ये रस आहे, त्यांनीच जास्त मार्क मिळविले आहेत. आणि ज्यांना त्या विषयामध्ये कमी रस आहे, त्यांनी कमी मार्क मिळविलेले आहेत. हे आढळल्यानंतर तावडतोव मी माझी पाठ थोपटून घेतो, आणि म्हणतो वकाप ! मी ही Aptitude Test घेतली तर ती वरोवर आहे की नाही? कारण ज्यांना त्या विपयाची आवड होती त्यांना मार्क जास्त मिळाले. ज्यांना आवड नव्हती त्यांना मार्क कमी मिळाले. याचा अर्थ असा की, माझी टेस्ट ही शास्त्रीय होती. जरा थांवा, पाठ थोपटण्यापूर्वी मला एक प्रश्न विचारावयाचा आहे की, अशी जी काही Normal Curve येते याला statistics मध्ये, म्हणजे संख्याशास्त्रामध्ये, Ramdom Distribution असे म्हणतात. शिक्षण हे Random आहे का? का पूर्वनियोजित आहे? पूर्वनियोजित जर असेल तर ज्याला त्या विपयात रस होता, त्याने आपली प्रगती केली. ज्याला त्यात रस नव्हता, त्याने प्रगती केली नाही. मग मला पगार घेण्याचा अधिकार काय? निसर्गामध्ये ज्याला वुद्धिमत्ता होती, आणि ज्याला त्या विपयात रस होता त्याने प्रगती केली. वाकीच्यांना रस नव्हता ते मागे राहिले. हे चित्र असेच राहणार असेल तर, शिक्षक म्हणून मी काय केले? तर शिक्षक म्हणून माझे कर्तव्य काय? तर शिक्षक म्हणून माझे कर्तव्य असे, की ज्याला आपण शिक्षणाची समान संधी असे म्हणतो, त्या शिक्षणाच्या समान संधीचा सामाजिक अन्वयार्थ हाही मी माझ्या वुद्धीने लावला पाहिजे. समान संधी म्हणजे काय? समान संधी










याचा अर्थ, सर्वांना खुश करावयाचा असा आहे काय? गोंधळ नको, टॉलस्टॉयची एक गोष्ट आहे.

एक जंगल होते. आणि तिथल्या वसाहतवाल्यांनी असे ठरविले की, विषमता नष्ट झाली पाहिजे. सर्वांना समान संधी दिली पाहिजे आणि त्यांनी असा एक वटहुकूम काढला की, हे जे जंगल आहे ना, ते सार्वजनिक आहे. ज्याला जेवढी लाकडे हवी असतील, तेवढी त्याने न्यावी, कोणताही मज्जाव करण्यात येणार नाही. आणि कोणालाही मज्जाव करता येणार नाही. सर्वांना त्या जंगलाचा दरवाजा उघडा आहे. याचा अर्थ सर्वांना समान संधी दिली. त्यानंतर काही वसाहतवाले असे सांगावयास लागले की, काय हा सगळा गोंधळ चालला आहे. ज्यांच्याकडे कुऱ्हाड होती त्यांनी लाकडे भरपूर तोडली आहेत. आमच्या कुऱ्हाडी नसल्याने आम्हांला या संधीचा फायदा घेता येत नाही. मग सर्वांना कुऱ्हाडी द्यावयाच्या असे ठरले. त्यानंतर दोन दिवसांनी लोक असे म्हणायला लागले की, ज्यांच्याजवळ बैलगाड्या होत्या त्यांनी बैलगाड्या नेल्या आणि गाडीभर लाकडे त्यात घातली, आणि घरी आणली. आम्हाला मात्र झाड तोडायचे, त्याची मोठी मोळी करायची, डोक्यावरून आणायची म्हणजे आम्हाला आमचा वाटा कमी मिळतो. मग समान संधीचा अर्थ काय? समान संधी याचा अर्थ महाभारतात सांगितला आहे. कुंती समान संधी आपल्या मुलांना देत असे. ती कशी, तर पांडव वनवासात भिक्षा मागून जेव्हा काही आणत, तेव्हा ती त्याचे दोन हिस्से करत असे. एक हिस्सा भिमाला खायला देत असे, आणि उरलेल्या अर्ध्या हिश्यामध्ये बाकीची सर्व मंडळी गुजराण करीत असत. तेव्हा समान संधी याचा अर्थ, दरवाजे सर्वांना उघडे असा असून शिक्षणाची जी उद्दिष्टे आहेत, तिथपर्यंत जाण्याची सर्वांची समान पात्रता. मग आत येणाऱ्या मुलांची पात्रता असमान असली तरीही समान करणे व त्या दृष्टीने प्रयत्न करणे हे आमचे निःसंशय कर्तव्य आहे. नाहीतर समान संधी यालाही अर्थ राहणार नाही. मग असं जर असेल तर, वर्गामध्ये ज्यांना फिजिक्सच्या विषयामध्ये रस नाही त्यांच्यासाठी मी अधिक वेळ दिला, आणि ज्यांना अधिक रस आहे, त्यांच्याकडे किंचित दुर्लक्ष केले, तर असे चित्र मला उभे करता येईल काय, की एक वर्षानंतर परीक्षेमध्ये बहुसंख्य मुलांना चांगले मार्क मिळालेले आहेत. आणि हे जे काय Normal Distribution म्हणतात ते तसे न येता, पुष्कळशा मुलांना चांगले मार्क मिळालेले आहेत, असे दृश्य, अशी व्यवस्था मी करू शकतो का? तशी जर मी करणार असेन तर याचा अर्थ शिक्षणाची समान संधी मी उपलब्ध करून दिली, असा होऊशकेल. हे करता येईल का? हा प्रयोग आपल्याला करता येईल. आणि या प्रयोगाचे जर निष्कर्ष मांडले तर घटक नियोजन, चाचण्या या विषयावर अधिकारवाणीने बोलण्याचा अधिकार आपल्याला संस्था व संघटना म्हणून प्राप्त होऊ शकेल. आणि हा अधिकार प्राप्त झाल्यानंतर मग वरपर्यंत आपला आवाज जाईल की नाही याची शंका बाळगण्याचे कारण नाही. हे मी स्वानुभवाने एक प्रकल्पाचे द्वारे आपल्याला थोडक्यात सांगतो. तो प्रकल्प असा की, आमच्याकडे एक शिक्षक आहेत, ते बी. एस्सी. बी. एड्. झालेले. शिक्षक, म्हणजे तुमच्यासारखेच एक शिक्षक. या शिक्षकांनी आमच्याकडे आल्यावर एक प्रकल्प असा हाती घेतला की, आपण सामान्य विज्ञान म्हणून जी काही विज्ञानाची पुस्तके लावलेली आहेत, त्या पुस्तकांची भाषा सोपी आहे का अवघड आहे? तेव्हा मोठा असा प्रसंग आला की, भाषा सोपी किंवा अवघड याची मोजपट्टी कोणती? ही मोजपट्टी कशी काय तयार करायची? उदा., नको तिथं Passive Voice आणणे. I write a letter हे वाक्य A letter was written by me असे लिहिले की संबोधाच्या दृष्टीने थोडा फरक पडतो.

नको तिथे Double Negative आहेत काय? उदा., पुढील विधान पहा. 'असे म्हणणे धारिष्ट्याचे होईल' असे विधान केले असता संबंधित विधान वक्त्याला करावयाचे आहे की नाही, याचा बोध होत नाही. आणि इंग्रजी भाषा येत असली तर अशा प्रकारे लिहावयाचा मोह फार होतो. उदाहरणार्थ, हे विधान पहा. 'The importance of this factor cannot be overestimated.' म्हणजे अमेरिकन भाषेत त्याचे भाषांतर असे होते की, This factor is important. अमेरिकन आपल्या स्पष्ट निवेदन शैलीमुळे पुढे गेले. आणि आपल्या Victorian English च्या आग्रहामुळे ब्रिटिश मागे पडले.

मराठीमध्ये शास्त्रीय परिभाषा बनविताना संस्कृतोत्पन्न क्लिष्ट शब्द वापरण्यामुळे विद्यार्थ्यांना ती परिभाषा समजत नाही. मराठीमध्ये जर अशी परिभाषा तयार करावयाची असेल तर संस्कृतकडे वळून चालणार नाही. एकदा आपण सुबोध मराठी शब्द निवडला की त्या शब्दावरूनच आनुषंगिक शब्द बनविणे लाभदायक असते. उदा., उष्णता या शब्दापासून उष्णतामापक किंवा तापमापक हे शब्द ओघानेच येतात. तुम्ही तिसरीचे पुस्तक पहा, दातांचा उपयोग काय? तर घास तोडण्यासाठी होतो. पण घास तोडण्यासाठी होतो, हे गावंढळ वाटते. दातांचा उपयोग अन्न चर्वणासाठी होतो, असा वाक्यातील अर्थ म्हणून पुस्तकात लिहितो. पुस्तकात लिहिल्यानंतर मला शंका अशी येते, दुसऱ्या एका तज्ज्ञांनी जर

दातांचा तिसराच एखादा उपयोग सांगितला तर, तर कोर्टात माझ्यावर केस होत नाही. म्हणून मी असे वाक्य लिहितो की, दातांचा उपयोग प्रामुख्याने अन्नचर्वणासाठी होतो. यामध्ये प्रामुख्याने नुकसान विद्यार्थ्यांचे होते. कारण त्यांना एक तर ही भाषा शिकावी लागते, आणि ही भाषा ज्याला आपण बहुजन समाज म्हणतो, ज्यांच्यासाठी आपण दरवाजे खुले केले त्यांना ही भाषा अपरिचित आहे. शिक्षक वर्गामध्ये प्रश्न विचारतात, 'आपण कशासाठी अन्न खातो?' अन्न ही कल्पना अमूर्त आहे. मला भाकरी समजते, मला भात समजतो, मला पेज समजते, ताक, दूध समजते. अन्न म्हणजे काय मुलांना समजू शकत नाही. मोटार, बैलगाडी, सायकल, रिक्षा कळते. रहदारी हा अमूर्त शब्द आहे. हा कळायला जरा अवघड वाटतो.

आपण कशासाठी अन्न खातो? मुलं सांगतात की, भूक लागली म्हणजे खावंसं वाटतं. खाल्लं नाही तर मरगळल्यासारखं होतं. आणि आई रागवते म्हणून खातो. पोटात कससं होतं म्हणून खाल्ल्यावर वरं वाटतं. ही सगळी उत्तरं, ठीक आहेत. ही उत्तरे इन्स्पेक्शन चालू असेल तर वरं, ठीक आहे. परंपरेने ज्याच्या घरामध्ये शिक्षण अनेक पिढ्या चालत आलेले आहे असा एक मुलगा उभा राहतो, त्याच्या आईने किंवा वडिलांनी हा धडा आदल्या दिवशी घेतलेला असतो, आणि ते मूल सांगते की अन्न कशासाठी, तर शरीराची झीज भरून काढण्यासाठी आणि नवीन पेशी निर्माण करण्यासाठी अन्न ग्रहणाची आवश्यकता असते. आणि हे उत्तर आपण बरोबर म्हणून सांगतो. इतरांच्या उत्तरात काय चुकले? बाकीच्या उत्तरांत चुकले हे की, ती उत्तरे अपेक्षित नव्हती, आणि आपली अपेक्षा काय? की, हे पुस्तक ज्या भाषेमध्ये लिहिलेले आहे त्या भाषेत विद्यार्थ्यांनी बोलावे. ही अपेक्षा जर आपण बदलली, तर आपल्याला असे दिसून येईल की, पुस्तकाची ही भाषा बदलायला पाहिजे. तर आमच्या या शिक्षक सहकाऱ्यांनी ५ वी, ६वी, ७ वीचं काही उतारे हे वेगळ्या साध्या भाषेमध्ये लिहून काढावेत. 'दृष्टोत्पत्तीस येते' असे लिहिले होते तेथे साधे 'दिसते' असे लिहावे. त्याच्या चाचण्या महाराष्ट्रातल्या चार जिल्ह्यांमध्ये घेतल्या तेव्हा दोन गोष्टी आढळून आल्या. एक गोष्ट अशी आढळून आली की, बहुसंख्य मुलांना भरपूर मार्क मिळतात व संबोध कळण्यास काहीही अडचण येत नाही. ही curve तुम्ही बघाल तर किती मुलांना किती मार्क मिळाले, तर ६० च्या वर गुण घेणाऱ्यांची संख्या दुप्पट, अडीचपट हा एक निष्कर्ष. दुसरा निष्कर्ष असा की, काही objective प्रश्न विचारले जातात. त्यात काही मुले धूर्त असतात. बुद्धिमान मुले जशी असतात ना तशी अलिकडे धूर्त मुले पण असतात. प्रश्न विचारला की त्यातला एखादा शब्द बघतात, तो उताऱ्यामध्ये दिलेल्या वाक्यात आलेला आहे. ते वाक्य काढून उत्तर म्हणून ठेवून देतात. आता काय करणार? दोना पैकी शून्य मार्क देता येत नाही. कारण संशयाचा फायदा मुलांना दिला पाहिजे. एक तरी मार्क हा द्यावाच लागतो. मग आमची Range कमी होते. दोन देववत नाहीत, कारण त्यांनी ठोकून दिलेले असते. अशा रीतीने त्या सगळ्या मूल्यमापनाचा विचका होतो. म्युनिसिपालिटीमध्ये प्रयोग करीत असताना, एकदा चूक झाली. छपाईची चूक अशी झाली की, 'प्रकाश सरळ रेषेत जातो' असे विधान करावयाचे होते. त्याऐवजी 'प्रकाश सरळ रेषेत का जातो?' असा प्रश्न विचारला गेला. प्रकाश सरळ रेषेत जात नाही तर प्रकाश ज्या रेषेत जातो त्याला आपण सरळ रेषा म्हणतो हे उत्तर देणारा मुलगा मध्यमवर्गातला, चांगल्या सुशिक्षित घरातला मुलगा होता. मुंबईच्या कॉर्पोरेशनमध्ये शिकणारी बहुसंख्य मुले ही रत्नागिरी जिल्ह्यातील आहेत. आणि त्यातल्या काही मुलांनी असे उत्तर लिहिलेले होते. पाच सहा मुले अशी निघाली आणि मुंबई हे शहर तसे फार मोठे आहे. म्हणजे बोरिवली पासून कुलाब्यापर्यंत. त्यांनी कोणी कॉपी केली असेल असे मी म्हणू शकत नाही. कारण बोरिवलीचा मुलगा हा काही भायखळ्याच्या मुलाचे बघून लिहू शकत नाही. एक उत्तर असे होते की, प्रकाश हा वेगाने जातो म्हणून तर तो सरळ जातो. जेव्हा बैल रस्त्याने डुलत डुलत चालतो, तेव्हा तो नागमोडी किंवा कसाही चालतो. तो जेव्हा अंगावर धावून येतो, तेव्हा तो सरळ रेषेत जातो. अनुभवाने निघालेली विद्यार्थ्यांच्या तोंडची ही उत्तरे आहेत. तर आपण जर ही भाषा सोपी केली, तर तितका विद्यार्थ्यांच्या आकलनशक्तीत फरक पडू शकतो. हा निष्कर्ष शासनाला दिल्यानंतर शासनाने महाराष्ट्र शासनाची पुस्तके सोप्या भाषेत लिहून त्याची पाचहजारांची आवृत्ती काढून त्यांचे मोठ्या प्रमाणावर Testing करण्याची आम्हाला लेखी परवानगी दिली. एवढेच नव्हे तर, शासनाने असे केले की, भाषाखेरीज दुसरा काहीही बदल त्या प्रयोगासाठी करावयाचा नसल्यामुळे चित्रे वगैरे जशीच्या तशी राहिली. म्हणून पाठ्यपुस्तक मंडळाने अडगळीत हरवलेले ब्लॉक्स् हुडकून काढून आम्हांला दिले. तेव्हा शासन म्हणजे जिथे कोणाचा पायपोस कोणाच्या पायात नाही, कितीही शंख करा कोणीही ऐकत नाही असा आमचा अनुभव नाही. जर आपण आपले संशोधनाच्या आधारावर केलेले काही निष्कर्ष तिथे देऊ शकलो, तर शासनाचा पूर्ण पाठिंबा मिळू शकतो.

♦♦♦










# शिक्षकांनी स्वतः बदलावयास हवे

ग० पि० मनूरकर

विनोवाजी म्हणतात, आपले शिक्षण वर्तुळाकार फिरत आहे. वर्तुळाकार फिरणाऱ्याला मुक्कामाची जागा नसते. अथवा तो वसतो तिथंच ती असते. या वर्तुळाकार फेऱ्यात आज शिक्षकाच्या जवळच्या बऱ्याच गोष्टी गहाळ झाल्या आहेत. म्हणून तो 'आहे...नाही' च्या चक्रात सापडला आहे.

वाव आहे पण सराव नाही.
ठाव आहे पण धाव नाही;
व्यसन आहे पण व्यासंग नाही;
चरित्र आहे पण चारित्र्य नाही;
सृष्टी आहे पण दृष्टी नाही;
शक्ती आहे पण भक्ती नाही;
अनुदान आहे पण ज्ञानदान नाही;
दर्शन आहे पण मार्गदर्शन नाही;
गर्दी आहे पण रांग नाही;
संधी आहे पण सांधा नाही;

असा सारा वांधा होऊन वसलाय. या अवस्थेतून शिक्षकाला वाहेर पडायचं आहे. पडावं लागेल. यासाठी शिक्षकानं स्वतःला वदलायला हवं. काही गुण आत्मसात करायला हवेत.

१. अध्ययन व अध्यापन : मुलांचं अध्ययनं परिणामकारक होण्यासाठी शिक्षकाचं अध्यापन प्रभावी झालं पाहिजे. अध्ययनक्रियेला चालना देऊन तिच्यात गतिमानता आणण्याचं काम अध्यापनाचं. अध्ययन व अध्यापन या दोहोमध्ये अध्ययन अधिक महत्त्वाचे मानले जाते. मी माझा विषय शिकविला. माझे कर्तव्य मी केले. विद्यार्थ्यांना येत नाही त्याला मी काय करू? असं शिक्षकाला म्हणता येणार नाही. म्हणूनच अध्यापनाची परिणामकारकता विद्यार्थ्यांच्या अध्ययनाच्या संदर्भात ठरविली गेली पाहिजे असे शिक्षण शास्त्रज्ञ सांगतात.

Successful teaching is that which brings about effective Learning असं मर्सेल हा शिक्षण शास्त्रज्ञ म्हणतो. सध्या वर्गाच्या अध्ययन-अध्यापनात सर्वच विषयात Active - Passive चा खेळ चालू आहे. शिक्षक वक्ता; विद्यार्थी श्रोता असं चालू आहे. विद्यार्थ्यांना ॲक्टिव्ह वनवणं हे अध्यापनाचं खरं कार्य आहे. पण इथंही उलटंच घडत आहे. अध्ययन मुकं आणि निर्जीव; अध्यापन वाचाळ आणि रटाळ. आजचं अध्यापन म्हणजे आंधळ्याचं दळण!

२. कडून ..... कडे : शिक्षण शास्त्रज्ञांनी अध्यापनाची काही महत्त्वाची सूत्रं सांगितली आहेत. ज्ञाताकडून अज्ञाताकडे, सोप्याकडून कठिणाकडे, पूर्णाकडून अपूर्णाकडे, विशिष्टाकडून सामान्याकडे इ. इ... या सूत्रांप्रमाणे शिकवा अथवा दुसरे सूत्र वापरा. या कडून...कडे मध्ये अडकून पडून विद्यार्थ्यांची कड लागू नये एवढंच शिक्षकानं पहावं.

हे कडून .... कडे
जिथे आपोआप घडे
तिथे विद्यार्थ्यांचे मन जडे

असं असायला हवं. असं घडायला हवं. तंत्र कोणतंही वापरलं तरी चालेल; परंतु शिक्षकानं मंत्र मात्र सोडता कामा नये. या तंत्रा-मंत्राची बांधणी संत्र्याच्या फोडीप्रमाणे असावी.

३. व्यसन- व्यासंगः शिक्षकानं व्यासंगी असावं, व्यसनी नसावं. व्यसनानं शिक्षका दुवळा वनतो. व्यासंगानं तो शक्तिमान वनतो. व्यसनानं शरीराची पाजगत होते, तर व्यासंगानं मनाची मशागत होते. व्यसनानं माणूस शून्यावर येतो, तर व्यासंगानं तो शून्यातून स्वर्ग निर्माण करतो. व्यसनानं शिक्षक मास्तर वनतो, तर व्यासंगानं तो आचार्य वनतो. असा महिमा आहे व्यासंगाचा. व्यासंगानं विषयाचे अनेक अंगांनी दर्शन घडवता येतं. व्यासंग हे विषयाला पैलू पाडणारं शस्त्र आहे. व्यासंगानं विषयात ताजेपणा येतो. हा ताजेपणा टिकविण्यासाठी शिक्षकाला नेहमीच विद्यार्थी म्हणून राहावं लागतं. पेशा शिक्षकाचा पण वृत्ती विद्यार्थ्याची हे शिक्षकाचं व्रत असायला हवं.

४. आचार- विचार : आचार-विचाराचं नातं चिखला-पाण्याचं असावं. विचार वेगळे, आचार वेगळे असं वेगळेपण विद्यार्थ्यांना दिसू नये. शिक्षक सांगतात एक, करतात दुसरंच अशी तफावत असू नये. त्याचा विद्यार्थ्यांच्या मनावर विपरीत परिणाम होतो. म्हणून शिक्षकांचे विचार सर्वस्पर्शी असावेत; आचार सत्वदर्शी असावेत. वोले तैसा चाले.... ही संतवाणी शिक्षकाच्या अंगळवणी पडावी.

५. श्रद्धा व संस्कार : चांगल्या संस्कारातून श्रद्धा

निर्माण होतात. चांगल्याविषयी श्रद्धा निर्माण करणे ही मानवतेची पूजा आहे. संस्काराशिवाय माणूसपण येत नाही. कोवळ्या मनावर सुसंस्कार केले तर चांगले नागरिक तयार होतात. महाभारतातला कर्ण म्हणतो,

'सुसंस्काराच्या संघातांनी सामान्याचा असामान्य होतो, उलट कुसंस्कारांच्या कर्दमात कमलपुष्पाच्या पाकळ्यांचही घृणामय शेवाळ होतं.'

एकाने म्हटलंय, 'कुणी कसं दिसावं यापेक्षा कसं असावं याला महत्त्व आहे. हे शक्य नसेल तर जास्तीत जास्त कसं नसावं याला तर नक्कीच महत्त्व आहे.'

संस्कार ही सांगून करण्यासारखी गोष्ट नाही. ते होत असतात. शिक्षकाच्या बोलण्यातून वागण्यातून, त्याच्या व्यक्तिमत्वातून संस्कार मुलांमध्ये संक्रमित होत असतात. 'मी संस्कार करीत आहे, वाजवा हो वाजवा!' असे ओरडून सांगण्याची आवश्यकता नाही. एक उदाहरण देतो.

एक मुलगा शाळेच्या वार्षिक परीक्षेत पहिल्या पाच क्रमांकात आला आणि आनंदाने दादांना (पू.पांडुरंगशास्त्री आठवले) पुष्पहार अर्पण करायला गेला. दादा त्याला म्हणाले, "परीक्षेच्या दिवसात तुझ्याबरोबर कोण होतं? तुला वेळेवर जेवण देणं, तुझी शाळेची तयारी करून देणं हे कोण करीत असे?" मुलगा उत्तरला, "माझी आई हे सगळं करायची." यावर दादा म्हणाले, "मग हा हारही आईलाच घाल बेटा. आधी तिच्या पाया पड." संस्कार असे होतात.

६. घडवणे-बिघडवणे : शिक्षकाचं काम घडवण्याचं आहे. बिघडवणारे खूप आहेत. घडवण्यास त्रास होतो हे सत्य स्वीकारूनच शिक्षकाने हे काम निष्ठेनं केलं पाहिजे. 'तोडणं सोपं; जोडणं अवघड' हे त्रिकालाबाधित सत्य आहे म्हणून शिक्षकाने कष्टाला न घाबरता हे घडवण्याचं काम केलं पाहिजे. घडवणाऱ्यांनी घडवीत जावे, बिघडवणाऱ्यांनी घडवणाऱ्यांकडे बघून एकवार लज्जित व्हावे' या उक्तीचा प्रत्यय येईल.

७. समता-विषमता : देशात समतेचा नारा आहे. विषमतेचा झरा आहे. समता नावाला, विषमता गावाला अशी अवस्था आहे. ही विषमता टिकून राहील अशी व्यवस्थाही आहे. अशी ही विषमता विष ओकत आहे. शिक्षकांनी या आगीत तेल ओतू नये.

८. सत्य-असत्य : शिक्षकांनी विद्यार्थ्यांना सत्य द्यावे. असत्याला आश्रय देऊ नये. सत्य हे सर्वश्रेष्ठ मूल्य आहे. शिक्षकांनी विद्यार्थ्यांना सत्याचे प्रयोग शिकवावेत. असत्याला धुमाकूळ घालण्यासाठी राजकारणाचे रान मोकळे आहे.

९. वापरणे-वापरू देणे : शिक्षकांनी चांगल्या गोष्टी वापराव्यात. स्वतःला वापरू देऊ नये. स्वतःचा वापर करू देणं ही गुलामगिरी आहे. सुरेश भट म्हणतात,

हा ठोकरून गेला, तो वापरून गेला,
जो भेटला मला, तो वांधा करू गेला।

१०. धर्म-अधर्म : शिक्षक धार्मिक असावा. पण धार्मिकता वेगळी असावी. दुसऱ्याच्या सुखाची चिंता वाहिली की आपण धार्मिक होतो. कारण दुसऱ्याच्या सुखाच्या विचारातूनच धर्माचा जन्म झाला. दुसऱ्याचे सुख हिरावून घेऊन स्वार्थ साधला की अधर्म होतो. शिक्षकाला जात नसते. शिक्षण हाच त्याचा धर्म होय.

**शिक्षकाचे व्यक्तिमत्त्व**

वर सांगितलेल्या सर्व गोष्टी आचरणात आणण्यासाठी शिक्षकाचे व्यक्तिमत्त्व आदरणीय असावे. "शिक्षक हा विद्यार्थ्यापुढे आदर्श स्वरूपात उभा असतो. पुष्कळदा आई-वडिलांपेक्षाही शिक्षकाच्या व्यक्तिमत्त्वाचा परिणाम विद्यार्थ्यावर अधिक होतो. म्हणून शिक्षकाचे चारित्र्य शुद्ध व निष्कलंक असावे."

'चारित्र्य विकस म्हणजे शिक्षण' असं गांधीजी म्हणत. वहिणाबाईंनी चारित्र्य संवर्धनावर अधिक भर दिला आहे. त्या म्हणतात,

"जग जग माझ्या जिवा, असं जगणं तोलाचं
उंच आकाशाएवढं, धरित्रीच्या रं मोलाचं।"

शिक्षक हा सागरासारखा दाता असावा. त्याने शिक्षणाचे दान उदार हस्ते द्यावे. विद्यादान देताना त्याने हात आखडता घेऊ नये. नसता, 'आखडला दानाला, त्याले हात म्हणू नये' हा वहिणाबाईंचा आरोप त्यांच्यावर येईल. म्हणून जे द्यायचे ते शिक्षकाने सर्वसमर्पण भावनेने द्यावे. When I give, I give all अशा वृत्तीनं विद्येचं दान द्यावं. विद्यादानातील अपूर्वता ही की, दिल्याने ती वाढते, शिलकीत ठेवली तर नाहीशी होते. वृंद कवीने म्हटले आहे,

"सरस्वती के भण्डार की वडी अपुरव वात,
ज्यों खर्चे त्यों त्यों वढे, विनखर्चे घटी जात।।"

स्वतः शिकायचं आणि विद्यार्थ्यांना भरभरून शिकवायचं हे शिक्षणाचं सारमर्म आहे. म्हणूनच शिक्षकाला स्वतःची identity असावी. 'My life-my message' हीच त्याची खरी identity आहे. धन्यवाद!

('शिक्षण संवर्धन' जुलै-ऑगस्ट २००४
मराठवाडा मुख्याध्यापक संघाचे मुखपत्र)

◆◆◆







अनुक्रमणिका

# महाराष्ट्र विवेक वाहिनी : स्वरूप व कार्य

नरेंद्र दाभोलकर

लातूर येथे तीन वर्षापूर्वी महाराष्ट्रातील शिक्षण क्षेत्राची वैज्ञानिक जाणिवा कृती परिषद झाली. त्याला उत्तम उपस्थिती होती. या परिषदेत महाराष्ट्रातील विवेक वाहिनी हे संघटन चालू करण्याचा निर्णय झाला. विवेकी विचाराच्या आधारे स्वतःचा विकास करू इच्छिणाऱ्या व स्वतःला आणि समाजाला वदलू इच्छिणाऱ्या विद्यार्थी व प्राध्यापकांचे हे संघटन असावे अशी त्यामागील धारणा होती. त्यानंतर पुढे वर्षाभरात मी नंदुरवार ते सिंधुदुर्ग अशा महाराष्ट्रातील सुमारे वीस जिल्ह्यातील ऐंशी महाविद्यालयात या वावत विद्यार्थी प्राध्यापकांसमोर भाषणे दिली. भाषणात मी मांडत असलेला मुद्दा पुढीलप्रमाणे असे. - माणूस हा संपूर्ण सृष्टीत असा एकच प्राणी आहे की ज्याला विकसित वुद्धी लाभली आहे. ही बुद्धी अचूकपणे कशी वापरावी याची पद्धत म्हणजे वैज्ञानिक दृष्टिकोण. याचाच अर्थ प्रत्येक घटनेमागील कार्यकारणभाव तपासणे. प्रत्येक कार्यामागे ते कार्य भौतिक असो वा सामाजिक त्याला कारण असतेच व मानवी बुद्धीस ते समजू शकते. हे समजल्याने माणसाला नवीन जीवन दृष्टी लाभली तर स्वतःचे आयुष्य नियतीच्या हाती नसून कार्यकारणभाव समजावून घेऊन आपण ते स्वतः कर्तृत्वाने घडवू शकतो, असा आत्मविश्वास मिळतो. मानवी इतिहासात ही फार महत्त्वाची वाव आहे. म्हणूनच भारतीय घटनेत तसेच शिक्षणात वैज्ञानिक दृष्टीकोण महत्त्वाचा व नागरिकाचे कर्तव्य असे मानले आहे. या विचार पद्धतीतून माणूस चांगले काय? वाईट काय? या मूल्यांचा निर्णय घेऊ शकतो. विवेक म्हणजे मूल्यविचार लाभलेला वैज्ञानिक दृष्टिकोण. मानवाच्या इतिहासात आता-पर्यंत मूल्य देण्याची कामगिरी धर्मावर होती. ती स्वतःच्या सद्सद्विवेकबुद्धीने विवेकी माणूस स्वतःच्या खांद्यावर घेतो. विवेकी व्यक्तीला समाज नीतिमान करण्यात रूची आहे. तो स्वतः विवेकाच्या सहाय्याने हे काम करतो. परंतु कोणी धर्माच्या नावाने हे करत असल्यास त्यावावत आदर वाळगतो. या वैचारिक मांडणी सोवतच विद्यार्थी जीवनाशी संवंधीत असलेल्या हुंडा, जात, धर्म, श्रमाची प्रतिष्ठा, स्त्री पुरूष विषमता या वावी पण चर्चेत आणल्या जात असत.

विवेक वाहिनीचे सभासद होण्यासाठी असलेले निकष वेगळे आहेत. १) रोज अर्धा तास व्यायाम करणे. २) वा. ले. चि. - वा - वाचन, ले - लेखन, चि - चिंतन. याचा अर्थ रोज तीन मिनिटे कसदार ललित अथवा वैचारिक वाचावयाचेच. त्यावर पाच मिनिटे चिंतन करावयाचे आणि आठवड्यातून एकदा जे वाचले व ज्यावर चिंतन केले त्यावर काही ना काही लेखन करावयाचे. ३) वर्षातून खादीचा एक पोषाख विकत घ्यावयाचा. ४) निर्व्यसनी रहावयाचे.

भाषणाच्या प्रभावाखाली उपस्थितांपैकी दहा टक्के विद्यार्थी तरी तसेच दोन-तीन प्राध्यापकही पुढील विवेक वाहिनी स्थापना वैठकीसाठी थांबत. मात्र या स्वरूपाच्या चालू झालेल्या केंद्रात पुरेसे सातत्य राहिले नाही. दुसरे वर्षी विवेक वाहिनीचे पहिले अधिवेशन अहमदनगर जि. लातूर येथे झाले. त्याला सुमारे चाळीस महाविद्यालयातून प्राध्यापक व विद्यार्थी उपस्थित होते. मागील वर्षी मोहोळ येथे विवेक जागर कृति परिषद झाली त्यालाही साधारण एवढीच उपस्थिती होती. मागील वर्षी महाराष्ट्राच्या पंचवीस जिल्ह्यात विवेक वाहिनी साठी विद्यार्थी - प्राध्यापकांची शिबिरे घेण्यात आली. त्या शिविराला सुमारे दोनशे महाविद्यालयातील प्राध्यापक त्या त्या ठिकाणी आले. मात्र त्याचा फायदा संघटना वाढीसाठी झाला नाही.

यावर्षीच्या मे महिन्यात पुणे येथे विवेकवाहिनीसाठी कार्य करू इच्छिणाऱ्या सुमारे दहा जिल्ह्यातील तीस प्राध्यापकांचे शिवीर झाले. या सर्वांनी उत्साहाने आपापल्या जिल्ह्यात विवेकवाहिनीची काही अधिक केंद्रे स्वप्रयत्नातून उभारण्याचे ठरवले आहे. या दिवाळीपर्यंत याबाबतच्या कार्यवाहीची कल्पना येईल.

विवेक वाहिनीची उपयुक्तता लक्षात घेऊन तीन वर्षापूर्वी त्यावेळचे उच्च शिक्षणाचे मंत्री दिलीप वळसे-पाटील

अनुक्रमणिका

यांनी या उपक्रमास अनुकूलता दर्शविली. मागील वर्षी उच्च शिक्षणाचे मंत्री लक्ष्मणराव ढोवळे यांनी संचालकामार्फत एक परिपत्रक काढले. त्याद्वारे विवेक वाहिनीच्या उपक्रमात सहभागी होणा-या प्राध्यापकास तीन दिवसाची कार्य रजा वर्षभरात मिळण्याची शक्यता निर्माण झाली. यावर्षी या कामाला अधिक नेमके रूप देण्यासाठी पहिल्या सत्रातच महाविद्यालयातील इच्छुक प्राध्यापकांची दोन दिवसांची शिविरे घेण्याचे ठरवण्यात आले होते. याबाबत उत्तर महाराष्ट्र विद्यापीठाचे कुलगुरू आर. एस. माळी यांनी विद्यापीठामार्फत दोन दिवसाचे हे शिवीर घेतले. निवास, प्रवास, भोजन ही प्राध्यापकांची व्यवस्था विद्यापीठाने केली. विद्यापीठाने एकूण अठ्ठावन्न महाविद्यालयांना पत्रे पाठवली. असे असूनही बत्तीस महाविद्यालयांचे प्राध्यापक आले. मात्र या सर्वांनी आपापल्या महाविद्यालयात विवेक वाहिनीचे कार्य चालू करण्याचे स्वयंस्फूर्तीने मान्य केले. याच स्वरूपाची शिविरे अन्य विद्यापीठांनी घ्यावीत असा प्रयत्न चालू आहे.

विवेक वाहिनीच्या शिविरात वैज्ञानिक दृष्टिकोण, विवेकवाद, व्यक्तिमत्त्व विकास, व्यसनमुक्ती, सामाजिक न्याय व राखीव जागा, धर्मनिरपेक्षता विचार व व्यवहार एवढे विषय तरी घेतले जातातच. चमत्काराची प्रात्यक्षिके दाखवून ते शिकवले जातात. प्रश्नोत्तरे होतात. संघटना बांधणी व काही उपक्रम याची चर्चा होते. उपक्रम करताना अन्य संघटना जो उपक्रम करतात ते उपक्रम टाळून विवेकी विचारासाठी उपयुक्त ठरणारे व तरूणांना आकर्षित करणारे उपक्रम करावेत अशी कल्पना असते. अशा उपक्रमांची यादी केंद्रांना दिलेली असते. त्यांच्या इच्छेनुसार ते यामध्ये भरही घालू शकतात. या सर्व कामासाठी आज कोणतीही आर्थिक तरतूद नाही. छोट्या छोट्या पावत्या फाडून पैसे गोळा करावयाचे नाहीत असा निर्णय आहे. स्वतःचे सहभाग शुल्क, प्रायोजक, स्वयं अध्ययन, वैज्ञानिक जाणिवा प्रकल्पाद्वारे निधी गोळा करणे असे पर्याय देण्यात आले आहेत.

विवेक वाहिनी हा मूल्य परिवर्तनाचा कृतिशील संवाद विद्यार्थी प्राध्यापकांशी साधण्याचा उपक्रम आहे. अनुभव असा येतो की हिंदु – मुस्लिम प्रश्नांचे आकलन, धर्मनिरपेक्षता, राखीव जागा, यासारख्या महत्त्वाच्या व संवेदनशील विषयावर प्राध्यापकांना माहिती नाही. अनेक गैरसमज आहेत. ते वर्षानुवर्षे तसेच आहेत. त्याबाबत कोणतेही प्रबोधन झालेले नाही. बहुसंख्य प्राध्यापकांची ही स्थिती असेल तर विद्यार्थ्यांच्या बाबत न बोललेले बरे. अशा वेळी दर आठवड्याला विवेक वाहिनीच्या साप्ताहिक बैठकीत काही ना काही वैचारिक विषयावर चर्चा होणे, विद्यार्थ्यांनी नियमितपणे काही वाचणे या गोष्टींचे महत्त्व अधिकच जाणवते. तसेच ही रचना अस्तित्वात असूनही एकूण वैचारिक आळस लक्षात घेता उपक्रमांच्या द्वारे विद्यार्थ्यांचा उत्साह टिकवणे आणि त्यामधूनच प्रकट - अप्रकटपणे त्यांच्यातील मूल्य विचाराला चालना देणे उपयुक्त ठरणारे आहे. विवेक वाहिनीच्या अनेक केंद्रांमध्ये विद्यार्थीनींचा सहभाग अधिक जाणवतो याचे कारण आजही मनमोकळी वैचारिक चर्चा व कृतीतील सहभाग याबबतची त्यांची भूक अधिक आहे असा लावता येईल. शिक्षणाचे उद्दिष्टच विचाराच्या आधारे प्रत्यक्ष वर्तन बदल हे आहे. हा बदल कोणत्या दिशेने व्हावा याचे सुस्पष्ट मार्गदर्शन संविधानाने केले आहे. खरे तर विवेकवाहिनी जो परिणाम साधू इच्छिते तो अधिक प्रभावीपणे महाविद्यालयीन प्राध्यापक सहजपणे साधू शकतात. मात्र हे प्रत्यक्षात घडताना दिसत नाही. विवेक वाहिनीचे कार्य अजून पाच वर्षे योग्यप्रकारे चालल्यास याबाबतचा एक कृति-आराखडा मिळण्याची शक्यता निर्माण होऊ शकेल.

♦♦♦

भारत वैफल्याच्या वाटेनं आज अराजकाच्या उंबरठ्यावर येऊन पोहोचला आहे.

अशा वेळी सर्व प्रश्नांचा वस्तुनिष्ठ दृष्टीने सांगोपांग अभ्यास करून समाजाला निर्लेप वृत्तीने मार्गदर्शन करण्याचे आपले व्रत शिक्षकांनी पुन्हा एकदा ओळखायला हवे व नैष्ठिकतेने पाळायला हवे; पाठ्यक्रमाच्या कुंपणाबाहेर आपली खरी शाळा आहे. आपल्या बौद्धिक नेतृत्वाची तिथे खरी गरज आहे. विधिज्ञ, न्यायाधीश, पत्रकार व साहित्यिक हेही व्यापक अर्थाने लोकशिक्षकच आहेत. अनाथ समाजाला विश्वासार्ह वाटणारे वैचारिक नेतृत्वच स्वार्थांध बनून आत्ममग्न झाले तर भविष्यकाळ कुणाच्या बळावर या बरबटलेल्या जगामध्ये आपली कोवळी पावले टाकायला धजावेल ?

**- राम शेवाळकर (२००३)**






# केल्याने होत आहे रे

समरेंद्र - उल्का - मिलिंद

'Know your self, society and system' हे आपल्या स्पर्धा परीक्षा केंद्राचे ब्रीद. व्यक्ती विकसनाची वाटचाल आपण या त्रिसूत्रीमध्ये गृहीत धरलेली आहे. अधिकारी होणं हे स्पर्धा परीक्षेचं एक प्राथमिक फलित. पण अधिकारी झाल्यानंतर 'कार्यकर्ता अधिकारी' होणं, 'प्रशासन स्वच्छ आणि लोकाभिमुख असावे' या ध्येयाला जागणं हे खऱ्या अर्थानं आपल्या केंद्राचं ध्येय, आपल्या अधिकाऱ्यांचं ध्येय.

पण यंत्रणेमध्ये गेल्यावर या ध्येयाला जागताना, उपासना मंदिरात घेतलेल्या शपथेला आठवताना कितीतरी प्रसंग येतात, येऊ शकतात. प्रशासनाची बिनचेहऱ्याची यंत्रणा, काम करताना येणारे ताणतणाव. गांधीजींच्या भाषेत 'last man' पर्यंत पोहचणं आणि विकास पोहचवणं. सामाजिक न्यायाचे बदलते आयाम, जागतिकीकरण, आपल्या कुटुंबातील ताणतणाव, वैयक्तिक जीवनातील आशा-निराशेचे उन्हाळे-पावसाळे... आणि असं बरंच काही संमिश्र स्वरूपातलं आयुष्य.

या कमालीच्या गुंतागुंतीच्या, वेग असणाऱ्या आपल्या जीवनाचं उद्दिष्ट, 'Mission statement' नेमकं काय? प्रशासन, पत्रकारिता, राजकारण किंवा आगामी IT तलंही आपली 'Mission' म्हणून, ज्या विचारांची आपण बांधिलकी स्वीकारतो तो वारसा म्हणून, आपली मुळं शोधण्याचा प्रयत्न म्हणून आपण काही करतोय का? स्वतःकडं पाहण्याची, समाजाकडं पाहण्याची 'दृष्टी' घेऊन नवं आत्मभान घेऊन आपण सज्ज होतोय का?

या सगळ्या पार्श्वभूमीवर इथं आम्ही एक उपक्रम करत आहोत. पहिल्या दोन सत्रांमध्ये आपण घेतलेल्या शपथेचा किंवा जी वैचारिक बांधिलकी आपण मानतो, त्या बांधिलकीचा, वारशाचा शोध घेणं, त्यावर चर्चा घडवून आणणं, करणं. त्यानंतर स्वतःचं 'mission statement' तयार करण्यासाठी एकमेकांना सहाय्य करणं. आपले आदर्श, आपली ध्येयं, त्याच्यासाठी निवडलेले मार्ग, साधनं, त्यांच्यावर सखोल विचार, त्या विचारांना छोट्या कृतींची जोड देणं याविषयी विचार झाला.

तिसऱ्या सत्रामध्ये ज्यांनी खऱ्या अर्थाने समृद्ध आणि आनंदी जीवन जगलं, अशी व्यक्तिमत्त्वं आजही आहेत, त्यांच्याशी हितगुज. काही शिकणं, संघर्षाचे त्यांचे अनुभव ऐकणं. त्या समृद्ध जीवनाशी मैत्री. चिरंतन मानवी मूल्यांशी, आनंद वाटा, प्रकाश वाटांशी मैत्री.

चौथ्या सत्रामध्ये प्रशासनातील अनुभव ऐकणं, प्रशासकीय अधिकाऱ्यांशी, पत्रकारांशी निर्विवाद कर्तृत्व असणाऱ्या 'system' मधील लोकांशी संवाद, गप्पा, देवणघेवाण.

अंतिम टप्प्यामध्ये 'आधुनिक तीर्थक्षेत्रां'ना भेटीगाठी. राळेगणसिद्धी, हिवरे बाजार, आनंदवन, हेमलकसा, शोधग्राम आणि अशी कित्येक महाराष्ट्रातील आधुनिक तीर्थं. जिथं सावळा विठू कमरेवर हात ठेवून उभा नाही, तर या जीवनयात्रींच्या घामातून, कामातून सर्वत्र नांदतोय आनंद. त्या विठोबाची वारी आणि दर्शन... त्यावर कदाचित अभ्यास प्रकल्प.

हा छोटासा प्रयत्न. एक छोटासा उपक्रम. आत्मभान, प्रचीती येण्यासाठीचा. या व्यस्त काळात 'स्थिर' दृष्टी येण्यासाठीचा. हा कोणीही, कुठेही कोणत्याही गावात N.S.S., N.C.C. मधून किंवा तशा वृत्तीच्या कोणत्याही युवा गटांसाठी करू शकतो. अट एकच, हे फक्त-

अशा हातांसाठी ज्यांना निर्माणाची ओढ आहे,
अशा पायांसाठी ज्यांना नव्या वाटांची खोड आहे,
आणि अशा नजरांसाठी,
ज्यांची 'दृष्टी' भविष्यावर खिळणार आहे -
स्वार होण्यासाठी!!

'संवाद' स्पर्धा परीक्षा केंद्र
ज्ञान प्रबोधिनी, पुणे ३०
१५ ऑगस्ट २००४

♦♦♦








अनुक्रमणिका

# विद्येच्या माहेरघरी

## पुणे तिथे काय उणे? सर्वच!

निर्मल भालेराव

एकेकाळी शांत, सुंदर, सुरक्षित असणारं पुणं, विद्येचं माहेरघर पुणं, सांस्कृतिक केंद्र असणारं पुणं आणि आजचं पुणं. ही अधोगती कशामुळे झाली? आणि एवढी झपाट्याने का झाली? या समस्येकडे पाहण्याचा प्रत्येकाचा दृष्टिकोन वेगळा आहे. कारण या समस्येची कारणेही अनेक आहेत. मी माझ्या दृष्टिकोनातून या समस्येकडे पाहणार आहे. तो सर्वंकष असणार नाही याची मला खात्री आहे.

मी एक प्राध्यापिका असून गेली २५ वर्षे या क्षेत्रात आहे आणि अस्सल पुणेकरही आहे. तरुण वर्गाला अगदी जवळून पाहण्याची आणि अभ्यासण्याची संधी मला माझ्या व्यवसायाने दिली आहे. राष्ट्रीय एकात्मता, समानता इ. मूल्यांचे मला भान आहे आणि त्यांची गरजही मला ठाऊक आहे. एक शिक्षक म्हणून मी ते मान्यही करते. 'पुण्याची आजची समस्या' या विषयाचा अभ्यास करताना मी शिक्षणालाच प्राधान्य दिले आहे.

१९७० च्या दशकात मी जेव्हा फर्ग्युसन महाविद्यालयात शिकत होते तेव्हा आमच्या वर्गात १०० पैकी १० ते १५ परप्रांतीय विद्यार्थी असत. आज मी जेव्हा हजेरी घेते तेव्हा त्याच्या बरोबर उलट चित्र दिसते. १०० पैकी १० ते १५ मराठी मुलं दिसतात. गेल्या १५-२० वर्षांत तर परप्रांतीय विद्यार्थ्यांचा पुण्यातील लोंढा वाढतच आहे. कोण कारणीभूत आहे याला? पुणे परिसरात स्थापन झालेली आणि झपाट्याने फोफावलेली विनाअनुदानित अभियांत्रिकी महाविद्यालये? व्यवस्थापन महाविद्यालये? अधिक फी घेता येते म्हणून इतर कोणत्याही परिणामांचा विचार न करता परप्रांतीयांना प्रवेश देणारे विद्यापीठाचे धोरण? महाराष्ट्र शासनाचे धोरण? माझ्यामते हे सर्वच घटक पुण्यातील विद्यार्थीसंख्या वाढविण्यास कारणीभूत आहेत. आमचे विद्यार्थी जेव्हा दिल्लीला जवाहरलाल नेहरू विद्यापीठात प्रवेश घ्यायला जातात तेव्हा ३० टक्के कोटा हा दिल्लीकरांसाठी आहे असं त्यांना सांगितलं जातं. आमच्याकडे प्रथम वर्षाच्या प्रवेशासाठी असा कोणताही कोटा नाही. बाहेरून आलेले सर्वच विद्यार्थी वाईट आहेत असं माझं मुळीच म्हणणं नाही आणि जे वाईट आहेत त्यांनाही मी दोष देत नाही. कारण तरुण वय, बहुतांशी परप्रांतीय श्रीमंत घरातून आलेले, त्यामुळे हातात खुळखुळणारा पैसा, अचानक मिळालेलं स्वातंत्र्य आणि पुणे शहराची सुरक्षितता या परिस्थितीत विद्यार्थी न बिघडले तरच नवल! पण त्याची लागण झपाट्याने स्थानिक मुलांना होते त्यांचं काय? रात्री अपरात्री वाहनांचे आवाज करत हिंडणारी मुलं, त्यांचे कट्टे, रस्त्यावर चालणारे त्यांचे चाळे, रहिवाशांना याच्या होणाऱ्या त्रासाचं काय? आपण जेव्हा घरी परततो त्यावेळी म्हणजे उतरत्या संध्याकाळी सिंहगड, खडकवासला इ. सहलीच्या ठिकाणी जाणाऱ्या तरुणांच्या झुंडी दिसतात. यात पुण्यात नवीन आलेली 'बुरखा संस्कृती' ठळकपणे दिसते. तोंड झाकावंसं वाटावं अशी कामं या मुली का करतात? खऱ्या बुरख्याला विरोध करण्याचं धाडस आपल्यात नाही. निदान या नव्या बुरखा-संस्कृतीला तरी विरोध करूया. आपण कुणीच वाईटाला वाईट म्हणण्याचं धाडस का करत नाही? आपली मुखदुर्बलता सोडल्याखेरीज या वहकलेल्या तरुणाईला शिस्त लागणार नाही. यातून मग घराकडून येणारा पैसा कमी पडू लागतो व झटपट पैसा मिळवण्याचे अवैध मार्ग स्वीकारले जाऊ लागतात. 'अंधार पडायच्या आत मुलींनी घरी परतणे' हा पुण्याचा एकेकाळचा नियम होता हे आजच्या पिढीला पटेल काय? रात्री १० नंतर हिंडणाऱ्या मुलींमध्ये परप्रांतीय आणि त्यातही पेईंग गेस्ट म्हणून राहणाऱ्या मुलींचाच भरणा आहे. (लेडीज होस्टेलला वेळेचे बंधन असते.) आणि हे सर्व मी अभ्यास करूनच लिहिते आहे. पेईंग गेस्टवर घरमालकांचे कोणतेच बंधन नसते. हे ही सर्वजण आजच्या समस्येला काही प्रमाणात जबाबदार नाहीत काय? पेईंग गेस्ट ठेवताना काही नियम-अटी घालणं, त्यांचं पालन होत आहे की नाही यावर लक्ष ठेवणं, वेळेचं बंधन घालणं नक्कीच आपल्या हातात आहे. बरं, हे सर्व विद्यार्थी गरजू मंडळी आहेत. पुणेकर एकत्रित आले व संघटित प्रयत्न झाले तर या उधळलेल्या वासरांना लगाम घालणं अवघड नाही. पण त्यासाठी 'मला काय त्याचं' ही वृत्ती सोडली पाहिजे. पुण्यात पेईंग गेस्ट ठेवून नामानिराळे राहणारे मुंबईकर व इतर यांच्यावर कडक कारवाई करणे सोसायट्यांना सहज शक्य आहे आणि आज अनेक सोसायट्यांत तसे नियमही होत आहेत ही स्वागतार्ह बाब आहे. पुण्यात शिकायला राहायचं असेल आणि इथल्या सोई-सुविधांचा फायदा उठवायचा असेल तर शहराच्या चौकटीत राहूनच तुम्हाला शिकावं लागेल असं ठणकावून सांगण्याइतपत आपण संघटित होणं शक्य आहे.

अनुक्रमणिका

यातही सर्वात वाईट अनुभव विहारहून आलेल्या विद्यार्थ्यांचा आहे. त्यात त्यांचा तरी काय दोष? समाजाचे काही कायदेकानून असतात व ते पाळायचे असतात हे त्यांना कुणी शिकवलंच नसावं. गुन्हेगारी, खंडण्या अशा गंभीर गुन्ह्यां-बरोबरच गुटखा खाऊन रस्ते व इमारती खराब करणाऱ्यांमध्ये या महाभागांचीच संख्या जास्त आहे. मध्यंतरी एका पाहणीनंतर पोलिसांनी घरगडी ठेवताना विहारी ठेवू नका असा फतवा काढल्याचं माझ्या वाचनात आलं. अर्थात त्यावर गहजब झालाच! हे विहारीसुद्धा आपले भावी नागरिकच आहेत, त्यांना योग्य दिशा दाखवणं आपलं सामाजिक कर्तव्यच नाही काय? पण त्यासाठी समाजानं संघटित झालं पाहिजे आणि अशा संघटनांना मोठे अधिकार दिले पाहिजेत.

इथे अधःपतनाचं एक उदाहरण मला घालावंसं वाटतं. एका अप्रकाशित आकडेवारीनुसार पुण्यात गर्भपाताचं प्रमाणही फार मोठ्या प्रमाणात वाढलंय. त्याचबरोबर गर्भपात करणारी सेंटर्सही फोफावली आहेत. अशा अनेक केंद्रांना मी भेटी दिल्या. तिथले डॉक्टर्स, नर्सेस कितपत प्रशिक्षित असतात याबद्दल मला दाट शंका आहे. कुणीही माझ्या प्रश्नांना उत्तर देण्यास तयार नव्हतं. विशीच्या आतल्या तिथे नंबर लावून बसलेल्या मुलींकडे बघून मला जितकं दुःख झालं तितकीच चीडही आली. स्वतःचा स्वार्थही या मुलींना कळू नये? आणि या सर्व भारताच्या भावी माता? माझ्या एका डॉक्टर मैत्रिणीनं अशाच काही मुलींना सल्ला देण्याचा प्रयत्न केला, की बायांनो पुरुष नामानिराळा राहतो आणि त्रास तुम्हाला होतो. याचा तरी विचार करा. कदाचित तुम्हाला कधीच आई होता येणार नाही. यावरची प्रतिक्रिया काय असेल? तुम्ही आम्हाला लेक्चर देणार असाल तर आम्ही दुसरीकडे जाऊ. पैसा व त्यातून मिळणारी मौज-मजा यासाठी इतकं अधःपतन? यामध्ये महाराष्ट्रीयन मुलींचं प्रमाण अत्यल्प आहे. इथे महाराष्ट्रीयन म्हणजे महाराष्ट्रात 'जन्मलेले वाढलेले सर्व' इतकी विस्तृत व्याख्या आहे. आजही मराठी मुलांचा दंगा हा एका विशिष्ठ चौकटीतच आहे. उदा. महाविद्यालयीन निवडणुका, तासांची गैरहजेरी, सहली ठरविणे आरडाओरडा इ. या सर्वांची वकिली मी करत आहे असा गैरसमज कृपया नसावा. मात्र परप्रांतातून आलेले बहुतांश विद्यार्थी ज्या गुन्ह्यात ओढले जातात ते सेक्स, ड्रग्ज, ब्लॅकमेल व खून या स्वरूपाचे असतात. जे अत्यंत धोकादायक आहे. रोजची वर्तमानपत्रेच याचे साक्षीदार आहेत. अशा वाईट गोष्टींची लागण पसरायला वेळ लागत नाही. ही गोष्ट लक्षात घेऊन आपण वेळीच हे थांबवायला हवं. कोणतीही चांगली गोष्ट अंगी बाणायला कष्ट पडतात व चिकाटी लागते. जी आजच्या तरुण वर्गाकडे कमी आहे हे लक्षात घेऊन कडक उपाय करणे गरजेचे आहे

ही पुण्यात शिक्षणासाठी येणारी तरुण मंडळी येतात तरी कोणत्या घरांतून? बहुसंख्य अतिशय चांगल्या घरांतून. त्यांचेही आईवडील त्यांना घराबाहेर पडताना हजार सूचना देतात, काळजी करतात. पण पालक तिकडे बिहार, जमशेदपूर, कलकत्ता, नाहीतर आसामात. ते काय नियंत्रण ठेवणार? आमच्या लेडीज होस्टेलच्या रेक्टरशी बोलल्यावर लक्षात येते की बहुतांशी पालक जाताना सांगून जातात की तुमची शिस्त आमच्या मुलीला मोडू देऊ नका, हवी ती शिक्षा द्या. पण दृष्टिआड सृष्टी! अनेकदा मुली घालत असलेले कपडे आम्ही कधीच घेऊन दिलेले नाहीत असं सांगणाऱ्या पालकांची संख्या मोठी आहे. स्त्री नऊवारीतून पाचवारीत आली तेव्हा तिच्यावर टीकेचे झोड उठवणाऱ्या पुण्याची काय ही अवस्था? बरं आज टीका करायची तर समोर हजार संघटना! आज कोणताही विचार मोकळेपणाने मांडताना मनावर एक दडपण असतं आणि याचीच पुढची पायरी म्हणजे स्वभावात येणारी तटस्थता! आपण सर्वांनीच ही तटस्थता सोडून दिल्याखेरीज समाजस्वास्थ्य येणार नाही हे निदान सुशिक्षित मंडळींना तरी समजायला हवं. मात्र आज 'निर्धार'सारख्या संस्थेचं काम पाहताना मनात कुठेतरी आशेचा किरण निर्माण होतो.

पुण्याच्या या समस्येवर उपाय काय? काय करता येईल? एक सर्वंकष समिती स्थापन केली जावी. यात या तरुण मंडळींशी संबंधित सर्वांना प्रतिनिधित्व असावं. उदा. महा-विद्यालये, विद्यापीठे, होस्टेलचे रेक्टर्स (खाजगी होस्टेलसुद्धा), गृहसंस्थांचे सेक्रेटरी, पोलिसांचे प्रतिनिधी, हॉटेलवाल्यांचे प्रतिनिधी, पेईंगगेस्ट ठेवणाऱ्यांचे प्रतिनिधी इ. आणि सर्वांनी मिळून पुण्यातील बिघडत चालणाऱ्या परिस्थितीवर चर्चा करून कडक उपाययोजना कराव्यात व त्याची तितक्यात कडकपणे अंमलबजावणी केली जावी. यासाठी पुण्यातील सर्व रहिवाश्यांचं कृतिशील सहकार्य हवं. आमची तटस्थता सोडून जर आम्हीच हा प्रश्न सोडवला नाही तर पुढील काही वर्षातच पुणे हे गुन्हेगारीचं, अपघाताचं, आणि एड्सचं केंद्र म्हणून ओळखलं जाऊ लागेल आणि त्यावेळी 'अरेरे आपण वेळीच जागं व्हायला हवं होतं' असं म्हणण्याखेरीज आपल्या हातात काहीच असणार नाही.

♦♦♦

या समस्येचे उत्तर शोधण्यात रस असणाऱ्या व्यक्ती-संघटना यांच्या प्रयत्न-उद्योगात सक्रिय सहभाग घ्यावयास मला आनंद होईल.

- देवदत्त दाभोलकर

मानवी ऊर्जेच्या शोधात

# काही प्रतिसाद

देवदत्त दाभोलकर

### अगदी खेडेगावातील एका प्राथमिक शिक्षकाचे पत्र

दि. १५-८-२००४

आदरणीय प्रा. देवदत्त दाभोलकर सर

मी सातारा जिल्ह्यातील जावली तालुक्यात एका डोंगरावरील गावात राहतो. भालेघर (ता. जावली) येथील जिल्हा परिषदेच्या प्राथमिक शाळेत मी शिक्षक म्हणून काम करतो.

माझ्या शाळेत इ. १ ते ७ पर्यंतचे वर्ग आहेत. पुढच्या शिक्षणासाठी मुले शेजारच्या गावात ५ कि.मी. अंतर चालून जातात. रस्त्याची सोय (विशेषतः पावसाळ्यात) नसल्यामुळे दररोजची दैनिके वाचायला मिळत नाहीत. पालकांची (व शिक्षकांचीही) आर्थिक स्थिती बेताची असल्याने मासिके, साप्ताहिके घेणे नेहमीच शक्य होत नाही.

मी स्वतः तुमच्या व्यक्तिगत ग्रंथसंग्रहाचा भरपूर फायदा घेतला आहे. साधना, पालकनीती, अंतर्नाद, आजचा सुधारक, नवभारत इत्यादिंचे अंक मी तुमच्याकडून नेहमी नेतोच. त्यामुळे मला चालू जगाशी आपला काहीतरी संबंध आहे याची जाणीव राहते. माझ्या विद्यार्थ्यांचा देखील अशा नवीन व ताज्या विचारांच्या पुस्तकांशी संबंध यावा ही इच्छा आहे. लहान मुलांसाठीची तेराशे रुपये किंमतीची तीस उत्कृष्ट पुस्तके तुम्ही आमच्या गावच्या ग्रंथालयाला सहा महिने नीट वापरून परत करण्याच्या व त्याऐवजी नवी पुस्तके नेण्याच्या अटीवर, भेट म्हणून यापूर्वीच दिलेली आहेत आणि त्याबद्दल आम्ही सदैव ऋणी आहोत.

आतासुद्धा आपण मुलांसाठीची काही पुस्तके, मासिके, साप्ताहिके (उदा. अमृत, किशोर, चांदोवा) आम्हाला द्यावीत अशी आमची मागणी आहे. ती पुस्तके नेणे, मुलांना वाचायला देणे, ठराविक मुदतीत, सुस्थितीत तुम्हाला परत आणून देणे ही जबाबदारी माझी. माझ्या विद्यार्थ्यांना हळूहळू वाचनाची सवय लागते आहे. ती जोपासण्यासाठी तुम्ही सकस पुस्तके आम्हाला पुरवावीत असा आमचा हट्ट आहे. तो तुम्ही पुरवावा.

तुमचा विद्यार्थी<br>
नवनाथ ज्ञानदेव लोखंडे<br>
जि.प. प्राथमिक शाळा, वालेघर, ता. जावली<br>
पिन - ४१५५१४.

♦♦♦

### एक 'यूथ क्लब'

सातारकर - दाभोलकरांचे मूळ छोटे खेडेगाव दाभोली, तालुका वेंगुर्ले, जिल्हा सिंधुदुर्ग. माझे वडील १९२२ मध्ये वकिली करावयास सातारा येथे आले व आमचे कुटुंब सातारलाच स्थायिक झाले. त्या भागातही काही शैक्षणिक प्रयोगशीलतेचे प्रयत्न चालू आहेत.

मुक्तांगण यूथ क्लब या नावाने वेंगुर्ले येथील दहावी-बारावीच्या आसपास असलेल्या मुलांनी एक प्रयत्न स्वतंत्रपणे सुरू केला आहे. त्यांचे एक पत्र मला नुकतेच आले आहे. बाहेरून सहज उपलब्ध होणाऱ्या मार्गदर्शकांची, व्याख्यात्यांची व्याख्याने व त्यावर चर्चा, सद्यःस्थितीवर चर्चागट, समूह गीते, खेळ, चांगले चित्रपट व त्यावर चर्चा, युवा मेळावे असे त्यांच्या आयोजित कार्यक्रमांचे सध्याचे स्वरूप आहे. महाराष्ट्रात या वर्षी दहावीच्या परीक्षेत अप्रतिम यश मिळविलेले व तिकडच्याच महाविद्यालयात शिकत असलेले विद्यार्थीही या गटात आहेत याचा मला विशेष आनंद झाला.

♦♦♦

अनुक्रमणिका

# मानवी ऊर्जेच्या शोधात - यापुढे

देवदत्त दाभोलकर

आदरणीय मामा क्षीरसागर यांच्या जन्म-शताब्दी निमित्त २३ सप्टेंबर २००३ रोजी सुरू झालेला हा प्रयोग गतवर्षी मर्यादित स्वरूपात यशस्वी झाला. परंतु माझा उत्साह टिकवून धरण्यासाठी ते यश पुरेसे आहे. त्यामुळे पुढील वर्षीही हा प्रयोग तसाच व काहीशा विस्ताराने चालू ठेवण्यात येईल.

संस्थाचालक, मुख्याध्यापक, शिक्षक, विद्यार्थी यापैकी कोणालाही आपल्याकडे असलेल्या मानवी ऊर्जेचा पुरेपूर कस पाहण्यात व तो वाढविण्यात रस व आनंद वाटत असेल तर त्यांना व्यक्तिगत रीत्या वा संघटित रीत्या तसा प्रयत्न-प्रयोग करता येईल. त्यासाठी स्वतःची शक्ती अपुरी पडते असे वाटेल तेथे पूरक साहाय्याची तरतूद केली जाईल. या कार्यक्रमासाठी विनाअट कोणाचे साहाय्य मिळाल्यास त्याचे स्वागतच आहे. परंतु तो त्यावर अवलंबून राहणार नाही. २००५ अखेर ती संपूर्ण आर्थिक जबाबदारी मी घेत आहे.

आजवरच्या अनुभवावरून लक्षात आलेल्या काही गोष्टी :

१. संस्थाचालकांना उत्साह असला तर असे प्रयोग सहजपणे होऊ शकतात.

२. मुख्याध्यापकांना उत्साह असेल तरी काही वैशिष्ट्यपूर्ण प्रयोग सहज करता येतात. ते त्या शाळेचे एक ठळक वैशिष्ट्यच बनून जातात.

३. असे काही शिक्षक प्राध्यापकही आहेत. त्यांना एकत्रित आणण्याचे काम करावयाचे आहे.

४. तुरळक काही विद्यार्थी वा विद्यार्थ्यांचे असे छोटे गटही आढळतात.

५. एकेका परिसरातील शाळांनी, महाविद्यालयाने असे काही कार्यक्रम एकत्र राबवावयाचे ठरवले तर परिसरात अधिक प्रभावी होऊ शकतात. यात स्पर्धेपेक्षा सहकार्याची व 'एकमेका साह्य करू' अशी वृत्ती हवी.

आजवर शाळांनी केलेले यशस्वी प्रयोग असे :

१. सर्व विद्यार्थ्यांचे हस्ताक्षर सुधारणे.

२. वाचनाची गती वाढवणे.

३. शुद्धलेखन, स्पेलिंग सुधारणे.

हे सर्व स्वतः अधिक श्रम न करता कसे करता येते याचे प्रशिक्षण शिक्षकांना दोन तासात देता येऊ शकते.

४. वाचले त्याचे आकलन व आकलन झाले त्याचे लेखन हे कौशल्य कसे शिकवावे त्याचे प्रशिक्षण शिक्षकाला तीन तासात देता येऊ शकते.

५. आपली अध्ययन अध्यापनातील क्षमता व विद्यार्थीप्रियता कशी वाढवता येते याचे प्रशिक्षण सुटीच्या एका दिवसात देता येऊ शकते.

६. विद्यार्थ्यांतील नेतृत्वगुण कसे हेरावेत व त्यांच्या विकासाला कसा वाव द्यावा याचे प्रशिक्षण अर्ध्या दिवसात देता येऊ शकते.

७. सुटीच्या दिवसांत विद्यार्थ्यांची एक ते तीन दिवसांची शिबिरे सहज आयोजित करता येतात.

८. विद्यार्थ्यांत सामाजिक बांधिलकीची भावना विविध प्रकल्पांतून सहजपणे रुजवता येते.

९. याखेरीजही अन्य अनेक कल्पना इतरांना सुटणे शक्य आहे. त्यांचाही विचार करता येईल.

भारतात मानवी ऊर्जेचा शोध सर्वच क्षेत्रात व्यावयास हवा. २००४ च्या ऑलिम्पिक क्रीडाक्षेत्रातील कामगिरी याची साक्ष आहे. प्रत्येकाने आपापल्यापुरता व आपापल्या क्षेत्रात हा शोध घ्यावयाचा आहे, इतकेच.

♦♦♦

ONE STEP ENOUGH FOR ME

मी दूरचीच दृश्यें पाहावया न वांछी
भूमी पुढे दिसावी एकाच पाऊलाची

ज्योत से ज्योत जगाते चलो।

अनुक्रमणिका

# प्रिय विद्यार्थी मित्रांनो

देवदत्त दाभोलकर

प्रिय विद्यार्थी मित्रांनो,

जवळजवळ सत्तर वर्षे उलटत आली. जून १९३६ मध्ये मी मुंबईत एलफिन्स्टन महाविद्यालयातील वसतिगृहात पाऊल ठेवले.

तुम्ही म्हणाल ही तर पुरातन काळची घटना झाली. यात काय ऐकायचं. म्हटली तर केवळ पुरातन नव्हे तर प्राचीनतम व म्हटले तर अगदी आजची - अद्यतन, अद्ययावत्.

गेल्या अडीच हजार वर्षात तर यात काहीही फरक पडलेला नाही. कदाचित् त्याहूनही अधिक काळ. तरुण मने कशी रसरसलेली, नवे नवे शोधणारी, जुने मोडीत काढू पाहणारी व न्यायाची उभारणी करण्याची अदम्य आशा आणि उत्साह बाळगणारी असतात याचे वर्णन अगदी वेदकाळापासून आपल्याला आढळते. नचिकेत हा त्या सर्वांचा प्रतिनिधी ठरावा. ॲरिस्टॉटलनेही उत्साही उच्छृंखल युवावर्गाचे वर्णन केले आहे. आश्रमनिवासी सत्त्वशील परंतु हूड विद्यार्थीवर्गाचे चित्रण उत्तररामचरित्रात आहे, टिळक-आगरकरांच्या डेक्कन कॉलेजमधील वसतिगृहाच्या वातावरणात आहे आणि नंतरच्यांही कितीतरी वाङ्मयात आहे. कॉलेज वसतिगृहातील जीवनाचे हलकेफुलके वर्णन करणारी व त्यामुळे मला त्या काळात (व काही प्रामाणात आजही) आवडणारी ना.सी. फडके यांची कादंबरी म्हणजे 'कलंकशोभा'.

प्रवाहातले पाणी बदलते परंतु प्रवाह बदलत नाही, असे हे आहे. कारण असंख्य शतके उलटली तरी मानवाचा मूलभूत जीवनप्रवाह तसाच राहिला आहे. प्रचंड उलथापालथ झालेली दिसते ती बाह्य भौतिक प्रगतीत. परंतु मानवाची मूलभूत मनोरचना आहे तशीच आहे. बाल्य, कुमार, किशोर, युवक, मध्यमवयीन, प्रौढ, वृद्ध या शारीरिक अवस्था पूर्वी होत्या तशाच आहेत. त्यातील, आशा-निराशा, ताणतणावही पूर्वी शंभर पिढ्यांपूर्वी होते तसेच आहेत, सर्वच मानवांचे.

यामुळे सर्व कालखंडातील किशोर-किशोरी, युवक-युवती तशाच मानसिक, भावनात्मक व बौद्धिक प्रेरणांच्या आढळतात याचे खरे तर आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. याचे आपल्याला आश्चर्य वाटावे हेच खरे आश्चर्य आहे. सगळ्यात मनोरंजक आश्चर्य म्हणजे ज्या कारणासाठी आपण युवकांवर भडकतो त्यांच गोष्टी आपणही आपल्या वयाच्या त्या कालखंडात केलेल्या असतात हेही आपण पूर्णपणे विसरून गेलेलो असतो. हे लक्षात राहिले तर कितीतरी अकारण ताण-तणाव दूर होतील. मनातील अनेक काळज्याही मिटतील.

सतत काळजी घेण्याची गरज मात्र मिटणार नाही. परंतु काळजी न करता घेतलेली ती काळजी असेल. कारण किशोर-युवक हा वयोगटाचा कालच एक विशेष असतो. 'मुग्धावस्था,' हे नाव यामुळे या कालखंडाला शोभून दिसेल.

तुम्ही तुमच्या मनात डोकावून पाहिलेत तरी ही विशेषतः तुमच्या लक्षात येईल. बालपणाचे सुरक्षित जग मागे सरकलेले आहे, नव्या जगाची क्षितिजे तर दिसत आहेत परंतु त्यात आपण कुठे आणि कसे असणार हे तर लक्षात येत नाही. आपल्या हातून काही नेत्रदीपक घडावे अशी असोशी तर असते परंतु साहजिकपणेच बहुतेकांना ते शक्य नसते. मग विशेष काही करता येत नाही, तर साधेही काही करावयाचा प्रयत्न करावयाचा नाही अशी नकारात्मक, निरुत्साही वृत्ती तयार होते. आपण काही करावयाचे नाही व दुसरा कोणी धडपडत असेल तर त्याला मदत करण्याऐवजी त्याचे पाय ओढण्यात, टवाळी करण्यात समाधान मिळवावयाचे अशी एक करंटी वृत्ती तयार होते. या वृत्तीच्या आहारी जाणे म्हणजे जन्मभर न्यूनगंडाने पछाडलेले राहणे. धडपडत राहणे म्हणजे आत्मविश्वासाचा विकास आणि आत्मविश्वासच सर्व यशाचा पाया असतो.

या यशाची साधना सर्वत्र करता येते परंतु महाविद्यालयीन स्तरांच्या विद्यार्थी वसतिगृहात विशेष करता येते. कारण त्याच वयोगटातील एक निकटचे मित्रमंडळ याच

अनुक्रमणिका

ठिकाणी सहजपणे तयार होऊ शकते. ही मित्रमंडळे घडवायची म्हणून घडत नसतात. समवृत्तीचे लोक सहजपणेच अधिक एकत्र येतात. परंतु यासाठीच प्रत्येकाने आपल्या वर्तुळाविषयी दक्ष राहिले पाहिजे. समवृत्तीच्या गटाचा प्रभाव हा चांगलाही असू शकतो तसा अपायकारकही असू शकतो. अशा अपायकारक प्रभावामुळेच आपला न्यूनगंड लपविण्यासाठी विद्यार्थी व्यसनांच्या आहारी जातात. याविषयी दक्षता घेण्याची गरज सर्व कालखंडात होती परंतु आज ती जितक्या तीव्रपणे भासते तितकी पूर्वीच्या कालखंडात नव्हती ही गोष्ट खरी आहे. चांगले युवक बघता बघता व्यसनांच्या जाळ्यात ओढले जातात व त्यांचा सर्वनाश टळू शकत नाही हे पाहिले की उद्विग्न व्हावयास होते. वसतिगृहातील विद्यार्थ्यांनी स्वतःच्या बाबतीत व आपल्या मित्रांच्या बाबतीत ही दक्षता कटाक्षाने घेतली पाहिजे.

गंमत म्हणून Peer group pressure म्हणून, न्यूनगंड लपविण्याचा प्रयत्न म्हणून युवक अनेकदा व्यसनाकडे वळतो. आपल्यातील उणिवा विसरण्याचा प्रयत्न करतो. असे करणे म्हणजे उणिवांचे प्रमाण वाढविणे आहे हे त्याच्या लक्षात येत नाही आणि आले तरी उणिवा वाढल्या की व्यसनांचे प्रमाण वाढविणे हे उत्तर तो वापरू लागतो. नंतर सर्वनाश दूर रहात नाही.

यातून वाचण्याचा व वसतिगृहातील आपले जीवन अधिक संपन्न करण्याचा एक सोपा मार्ग आहे आणि तो म्हणजे स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास. आपल्या संपूर्ण क्षमतांचा संपूर्ण विकास साध्य केलेल्या व्यक्ती फारच क्वचित् आढळतात. परंतु आपल्यापैकी बहुतेकांनी आपल्या क्षमतांच्या साध्य असलेल्या शक्यतेचाही केवळ दहा टक्के विकास साध्य केलेला असतो व त्यातच ते इतिकर्तव्यता मानत असतात. सर्वसामान्य आणि असाधारण यातील फरक हा प्रामुख्याने यामुळे घडत असतो.

आपल्यातील उणिवा सामान्यपणे आपल्याला जाणवत असतात. त्यासाठी मानसशास्त्र-तज्ज्ञांची आवश्यकता नसते. काही उणिवा कमी करणे हे परीक्षेतील यशाच्या दृष्टीनेही उपयोगी होऊ शकते. परीक्षेतील यश हेच कोणी विद्यार्थ्यांनी आपले ध्येय ठरवले तरी आजच्या परिस्थितीत मी त्यांना दोषी ठरवणार नाही. त्यांना मी एवढेच म्हणेन की तुम्ही यशस्वी झालात तर मला आनंदच आहे, परंतु तुम्ही तुम्हाला हवेसे वाटते तितके यश परीक्षेत मिळवू शकला नाहीत तरी नाउमेद होऊ नका. या सर्व अपयशांच्या पार जाता येते. हिम्मत हवी, धडपड हवी. आणि हा प्रयत्न अभ्यासाव्यतिरिक्तच्या इतर वेळातही विद्यार्थीदशेतील (महाविद्यालयीन) चार वर्षात करता येतो.

उणीव कमी करणे म्हणजे काही नवे ज्ञान, कर्तृत्व मिळवणे. थोड्याश्या मार्गदर्शनानंतर हे विद्यार्थी आपली प्रगती स्वतंत्रपणे करू शकतात असा माझा अनुभव आहे. याला मी 'एकलव्याची साधना' म्हणतो. 'मी हे ज्ञान मिळवणारच' ही वृत्ती ही एकलव्याची जिद्द आहे. प्रतिकूल परिस्थिती त्याला नमवू शकली नाही.

असा एक विद्यार्थी चालेल; गटानेही चालतील. कोणत्याही महाविद्यालयातील चालतील.

पहिल्या बैठकीनंतर वर्षभरात या विकासासाठी आपण तीनशे तास देणार आहोत एवढी विद्यार्थ्याची जिद्द असली पाहिजे. वर्षअखेर जेवढे तास कमी पडतील तेवढ्याच तासांचा तासाला दहा रुपयेप्रमाणे दंड भरावा लागेल. हा त्याने स्वतः मिळवू लागल्यानंतर द्यावयाचा आहे. प्रत्यक्ष चर्चेनंतर जितके यश मिळण्याची शक्यता आहे असे ठरले असेल त्यात उणीव राहिल्यास प्रत्येक टक्का उणिवेमागे मी दहा रुपये देईन. उदाहरणार्थ ठरल्यापैकी ८० टक्के यश मिळाले. म्हणजे वीस टक्के उणीव राहिली तर मी दोनशे रुपये द्यावयाचे. **तीनशे तास पूर्ण केल्यास काहीही फी नाही.** आपल्याला किती टक्के यश मिळाले असे वाटते हेही विद्यार्थ्याने स्वतःचे स्वतःच ठरवायचे. ते मूल्यमापन मी करीत नाही.

असे विद्यार्थी मिळतच नाहीत असं नाही. परंतु दुर्दैवाने ही जिद्दच आपल्याकडे कमी असल्यामुळे कमीजण येतात असा माझा आजवरचा अनुभव आहे.

परंतु अधिक कितीहीजण आले तरी त्यांनी त्यांचे तीनशे तास पूर्ण केल्यास मला आनंदच होईल.

♦♦♦

उद्धरावे तुला तूच आत्मनाश करू नये
तुझा तूच खरा मित्र तुझा शत्रूहि तूच रे ।

- गीता








## लेखक परिचय

**देवदत्त दाभोलकर** : 'नवभारत'शी दीर्घकाल संबंधित. सध्या 'मानवी ऊर्जेचा शोध : शैक्षणिक क्षेत्रातील प्रयोग' यात विशेष रस. **पत्ता** : 'शान्तिनिकेतन' ४३, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१. दूरध्वनी (०२१६२) २२०३७८ फॅक्स : (०२१६२) २३७२३४ इ-मेल : ddevdatta123@yahoo.co.in (कृपया इ-मेल केल्याचे फोनवर कळवावे.)

**रमेश पानसे** : अकराव्या विचारवेध संमेलनाचे अध्यक्ष; बालशिक्षणक्षेत्रात प्रयोगशील; कृतिशील; 'ग्राममंगल'चे प्रवर्तक-संचालक; संपादक 'अर्थबोध पत्रिका' **पत्ता** : 'अर्थबोध' सेनापती बापट मार्ग, पुणे ४११०१६.

**लीला पाटील** : शिक्षणक्षेत्रात महत्त्वाच्या पदावर आजीवन कार्य. आग्रही प्रयोगशील; विशेषतः प्राथमिक शिक्षणक्षेत्रात. 'सृजन-आनंद' या कोल्हापूरच्या प्रख्यात प्राथमिक शाळेच्या प्रवर्तक व प्रमुख. **पत्ता** : 'सौरभ', रुईकर वसाहत, कोल्हापूर.

**प्र० द० पुराणिक** : आदर्श शाला योजना मुख्याध्यापक म्हणून आपल्या शाळेत (सध्याचे एस.एम. जोशी विद्यालय, पुणे) तीन दशकांहून अधिक काळ राबविली व समर्थपणे यशस्वी केली. सध्या त्या प्रयोगाच्या इतर शाळांतून प्रवर्तनात कार्यरत. सध्या 'आदर्श विद्यामंदीर योजना विकास दिशा' या प्रकल्पाचे प्रवर्तक, चिंतक, संचालक. **पत्ता** : 'आदर्श विद्यामंदिर योजना'; भोसले-शिंदे आर्केड, दुसरा मजला, ऑ.नं. १३/३६, पुणे ४.

**चित्रा नाईक** : राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर सुविख्यात शिक्षणशास्त्रज्ञ, **पत्ता** : इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ एज्युकेशन, जे.पी.नाईक पथ, कोथरूड, पुणे २९.

**कृष्णकुमार** : शिक्षणक्षेत्रातील मान्यताप्राप्त तत्त्वचिंतक. **पत्ता** : संचालक, NCERT (National Council of Educational Research and Training) दिल्ली.

**वि० गो० कुलकर्णी (स्मृतिगत)** : प्रकल्प संचालक, होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्र, टाटा इन्स्टिट्यूट ऑफ फंडामेंटल रिसर्च, मुंबई.

**वसंत पळशीकर** : 'नवभारत'चे माजी संपादक. प्रमुख विचारवंत म्हणून सार्वत्रिक मान्यता. **पत्ता** : लौकिक सदन, मधली आळी, वाई (जि. सातारा)

**वेणू पळशीकर** : निवृत्त प्राध्यापक/प्राचार्य. विविध प्रयोगशील. One Straw Revolution चा अनुवाद : एका काडाची क्रांती. **पत्ता** : लौकिक सदन, मधली आळी, वाई (जि. सातारा)

**श्री० नी० कात्रे** : शिक्षणक्षेत्रातील आस्थाशील नवविचारांचे स्वागतशील निवृत्त मुख्याध्यापक. **पत्ता** : कोरेगाव (जि. सातारा).

**निर्मल भालेराव** : प्राध्यापक, फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे ४.

**नरेंद्र दाभोलकर** : अंधश्रद्धा निर्मूलन, समाज परिवर्तन **पत्ता** : १९, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१.

**ग० प० मनूरकर** : मुख्याध्यापक संघ, मराठवाडा. **द्वारा** : श्री० शं० दे० मंडलिक, संपादक - शिक्षण संवर्धन (मासिक) सेलू (मराठवाडा) ४३१५०३.

**बाबासाहेब देशमुख** : मुख्याध्यापक संघ, मराठवाडा. **द्वारा** : श्री० शं० दे० मंडलिक, संपादक - शिक्षण संवर्धन (मासिक) सेलू (मराठवाडा) ४३१५०३.

**समरेंद्र-उल्का-मिलिंद** : 'ज्ञानप्रबोधिनी' पुणे ३० स्पर्धा परीक्षा केंद्राचे यशस्वी विद्यार्थी.

## ऋणनिर्देश

शिवाजी विद्यापीठ, समाजप्रबोधन संस्था, विचारवेध संमेलन, मुख्याध्यापक संघ, रत्नागिरी जिल्हा, मुख्याध्यापक संघ, सातारा जिल्हा, मुख्याध्यापक संघ, मराठवाडा, फर्ग्युसन महाविद्यालय, ज्ञानप्रबोधिनी यांच्या सौजन्याने.

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

# प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

सुधारित किंमत :
१ एप्रिल १९९७
पासून लागू

| | |
|---|---|
| ❑ **वैदिक संस्कृतीचा विकास** (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु. |
| ❑ **अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर** (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु. |
| ❑ **पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास** । डॉ. सुमंत मुरंजन | ६० रु. |
| ❑ **हिंदी साहित्यविचार** । प्रा. प्यारेलाल गोहेल | ५ रु. |
| ❑ **श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ** | ६० रु. |
| ❑ **संशोधन साधना** । डॉ. वसंत स. जोशी | ४० रु. |
| ❑ **तरंगयामिक व पुंजयामिक** । मा. ग. टोळे | १० रु. |
| ❑ **आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास** । ऋग्वेदी | ८० रु. |
| ❑ **वागीश्वरी** । डॉ. गो. के. भट | ४० रु. |
| ❑ **प्रस्थानभेद** (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. वा. लेले | २५ रु. |
| ❑ **गिर्यारोहण परिचय** । अच्युत खोडवे | १० रु. |
| ❑ **इतिहासाचे तत्त्वज्ञान** (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | ८० रु. |
| ❑ **दासशूद्रांची गुलामगिरी** (भाग २) । शरद पाटील | १०० रु. |
| ❑ **शाहीर हैबती** । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु. |
| ❑ **गीताचिकित्सा** । भाऊ धर्माधिकारी | १०५ रु. |
| ❑ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी** (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु. |
| ❑ **बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार** । प. ल. वैद्य | ३० रु. |
| ❑ **हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन** (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु. |
| ❑ **पाच पुस्तक-परीक्षणे** । वा. म. कुलकर्णी | ४० रु. |
| ❑ **भेदविलोपन : एक आकलन** । अशोक केळकर | २० रु. |
| ❑ **कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य** । रा. भा. पाटणकर | ८० रु. |
| ❑ **धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार** । दि.के. बेडेकर | १५ रु. |
| ❑ **आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार** | १०० रु. |
| ❑ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार** | १५० रु. |
| ❑ **इहवाद आणि सर्वधर्मसमभाव** । मे. पुं. रेगे | ८० रु. |
| ❑ **प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा** | २०० रु. |
| ❑ **चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान** (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | ८० रु. |
| ❑ **विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे** (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु. |
| ❑ **नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन** । द.ना. धनागरे | ४० रु. |
| ❑ **प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती** (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु. |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता* : **चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)**






## मानवी ऊर्जेच्या शोधात
### शैक्षणिक क्षेत्रांतील प्रयोगशीलता

भारतात दोन ऊर्जा प्रचंड प्रमाणात उपलब्ध आहेत. परंतु त्यांचा पूर्ण उपयोग करून घेण्याच्या बाबत आपण अद्याप खरी वाटचाल केलेली नाही. एक सौर ऊर्जा व दुसरी मानवी ऊर्जा.

शिक्षणक्षेत्रातील प्रयोगशीलांनी मानवी ऊर्जेच्या क्षेत्रात हे आव्हान स्वीकारले पाहिजे.

कमीअधिक प्रमाणात भारतात (व जगातही) काही व्यक्ती, काही औपचारिक - अनौपचारिक संघटना, संस्था शिक्षणक्षेत्राच्या आत व त्या चौकटीच्या बाहेरही विविध स्तरांवर कार्य करीत आहेत. परंतु त्यांचे बहुतांश स्वरूप फुटकळ आहे; काही ठिकाणी आकर्षक असले तरी भारतीय प्रश्नाला उत्तर म्हणून त्याचे सार्वत्रिकीकरण करण्याची शक्यता नसलेले असे आहे. या साऱ्यांसाठी विचारविनिमयाचे वार्षिक, द्वैवार्षिक, निदान त्रैवार्षिक असे प्रभावी व्यासपीठही आपण अद्याप उभे करू शकलेलो नाही.

या दिशेने प्रारंभ म्हणून आदरणीय मामासाहेब क्षीरसागर यांच्या जन्मशताब्दी निमित्त मी एक रचना गतवर्षी सुचविली होती व तसे एक प्रकटनही केले होते व ते अनेक वर्तमानपत्रांतून, नियतकालिकांतून छापूनही आले होते. प्रतिसाद मर्यादित होता. **परंतु माझा आशावाद चिवट आहे म्हणून त्याच पद्धतीने हा कार्यक्रम या वर्षीही दि. २३ सप्टेंबर २००४ ते २३ सप्टेंबर २००५ पर्यंत चालू राहील.**

### कार्य व कार्यपद्धती

१. आपल्या हाताशी उपलब्ध असलेल्या साधनांचाच योग्य व परिपूर्ण उपयोग करून अधिक किती कार्य पार पाडता येईल याचा शोध घेण्याचे प्रयोग करणे. सामान्यपणे किमान २० टक्के तरी अशी वाढ करता येईल असा माझा अंदाज आहे; काही प्रमाणात अनुभवही आहे.

२. अशा प्रयोगांसाठी काही पूरक साहाय्य हवे असल्यास ते कसे देता येईल याचा विचार करणे. अन्यत्र या संदर्भात मी प्रकटपणे केलेली मांडणी खालीलप्रमाणे आहे.

अ. अशा व्यक्तीने दिवसातून सरासरी एक तास निवडलेल्या कामासाठी द्यावयाची वर्षभरात तयारी ठेवली पाहिजे.

ब. आपल्या वार्षिक उत्पन्नातून पाच टक्के रक्कम आपण निवडलेल्या कामासाठी द्यावयाची तयारी ठेवली पाहिजे. यात अडचण आल्यास तसाही विचार करता येईल.

क. व्यक्तिगत चर्चेनंतर प्रयोगाचे स्वरूप निश्चित होईल. पूरक साहाय्याची तरतूद केली जाईल. त्याविषयीचा लेखी MoU (Memorandum of Understanding) केला जाईल. मुदत MoU च्या तारखेपासून वर्षभराची राहील.

या संदर्भात प्रत्यक्ष चर्चेसाठी कोणाला यावयाचे असल्यास अशा सर्वांचे निवासभोजनाची साधी पण अगत्यशील व्यवस्था असेल. वर्षभरात आपापल्या सोयीप्रमाणे केव्हाही येता येईल. मात्र आधी माझ्याकडून त्या दिवशी मी सातारा येथे असल्याची खात्री करून घ्यावी.

येण्याजाण्याचा खर्च प्रत्येकजण आपापला करील अशी अपेक्षा आहे. परंतु कोणाची विशेष अडचण असल्यास मला आधी कळवावे व माझ्या प्रतिसादाची वाट पाहावी. त्या दिशेनेही विचार करता येईल. मला सोयीची वेळ : सकाळी ९.०० ते ११.०० दुपारी ३.०० ते ५.००.

**- देवदत्त दाभोलकर**

(निवास पत्ता : लेखक परिचय पहावा)

हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




